॥ श्री ॥

# कवि चरित्र

द्वितीय खंडापैकीं

## भाग दुसरा.

---

लेखक

दत्तात्रेय अनंत आपटे—खेड-पुणे.

प्रकाशक

दत्तात्रेय गोविंद सडेकर 'धनंजय' छा० मालक—खानापूर.

शके १८२९—सन १९०७ इसवी.



किंमत १० आणे.

॥ श्रीशंवन्दे ॥

# लेखकाचे दोन शब्द.

जो ऐकतांच गर्व गळे । कां ते भ्रांतीच मावळे ॥
ना तरी एक सरीं बोळे । या नांव ग्रंथ ॥ १ ॥
जेणें होय उपरती । अवगुण अवघे पालटती ॥
जेणें चुके अधोगति । त्या नांव ग्रंथ ॥ २ ॥
जेणें धारिष्ट चढे । जेणें परोपकार घडे ॥
जेणें विषयवासना मोडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३ ॥

रामदास.

श्रीहरिकृपेनें वाचकांचे हातीं आज कविचरित्राच्या द्वितीयखंडाचा दुसरा भाग पडत आहे. पहिला भाग वाचकांस मिळून एक वर्ष झालें! त्याचवेळीं हा भागहि लिहून तयार झालेला होता; व गेल्यावर्षी प्रकाशकांनीं आपल्या प्रस्तावनेंत ह्मटल्याप्रमाणें त्यांना लोकांनीं हातभार लाविला असता तर कदाचित् हा भाग मागेंच प्रसिद्ध होऊन आज वाचकांस तृतीय भागाचा लाभ झाला असता परंतु—या परंतु रामायणामुळेंच सर्व कांहीं बिघडतें आहे—दुर्दैव कीं, वाचकवर्गाकडून मिळावा तसा यास आश्रय मिळाला नाहीं. आश्रयाशिवाय अशीं मोठीं कामें बाहेर पडणें दुरापास्त आहे. पुन्हां गंमत ही कीं प्रकाशकानें एवढा मोठा ग्रंथ लोकमित्राचे वर्गणीदारांस फुकट ठेविला असूनही मासिकाचे कांहींच वर्गणीदार वाढले नाहींत; इतकेंच नाहीं परंतु कित्येक तर असे हरीचे लाल भेटले कीं, त्यांनीं चार पांच अंक घेऊन मग बंग्या परत केल्या. अशा स्थितींत प्रकाशकानें तरी काय करावें? वस्तुतः अशा प्रकारामुळें हा भाग वाचकांचे हातीं पडतो कीं नाहीं ही शंकाच होती. परंतु प्रकाशकाच्या रसज्ञतेमुळें वाचकांना आज ह्या भागाचा मोठा लाभ होत आहे. आतां यंदा तरी गेल्यावर्षीची उजळणी होणार नाहीं अशी आशा आहे.

आतां कदाचित् वाचकांना असें वाटण्याचा संभव आहे कीं, कवींचीं चरित्रें पुष्कळ प्रसिद्ध झालीं आहेत तेव्हां यात नवें तें काय असणार? त्यांनीं या खालील कालिदासाच्या.—

"पुराणमित्येव न साधु सर्वं । नचापि काव्यं नवमित्यवद्यम् ॥"
"सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते । मूढः परप्रत्ययनेय बुद्धिः ॥ १ ॥"

[जुनी आहे ह्मणून प्रत्येक गोष्ट चांगली नव्हे अथवा नवी आहे ह्मणून त्याज्य नव्हे. मूर्ख लोक दुसऱ्याच्या बुद्धीनें चालणारे असतात परंतु समंजस लोक स्वतः परीक्षा करून नव्या अथवा जुन्या गोष्टी ग्रहण करतात.]"

'—श्लोकाकडे दृष्टि दिल्यास त्यांच्यानें असें ह्मणवणार नाहीं असें वाटतें. असो.

या खंडाचे आणखी एवढालेच दोन किंवहुना तीन भाग होतील असा अजमास आहे. पुढील ह्मणजे तिसऱ्या भागांत आणखी राहिलेल्या जुन्या महाराष्ट्र कवींचीं चरित्रें येतील. तिसऱ्यांत पुरीं न झाल्यास तीं चवथ्या भागात घालून पांचव्या भागांत अधुनीक महाराष्ट्र

कवींचीं चरित्रें देण्याचा विचार आहे. परंतु हें सर्व घडवून आणणें किंवा न आणणें वर लिहिल्याप्रमाणें वाचकांचे हातीं आहे. त्यांनीं उदार आश्रय दिल्यास ते भाग प्रकाशक लवकर छापतील नाहीं तर चाललें आहे असेंच चालणार; ह्मणजे हा खंड पुरा होण्यास आणखी दोन किंवा तीन वर्षें लागून प्रथम खंडाला आणखी काय चारदोन वर्षें लागतील हीं वेगळींच.

सदरहु प्रकरणांत रा. रा. भीडे यांच्या वामनकवीवरील निबंधाचा व श्रीमयूरभक्त पांगारकर यांच्या मोरोपंती वेंच्यांचा बराच उपयोग करून घेतला आहे व त्याबद्दल त्या ग्रंथकारांचा हा लेखक फार आभारी आहे. प्रकाशकांचे आभार मानण्यास तर त्याजजवळ शब्दच नाहीत !

असो. ज्या दयाघन चालकानें लेखकास हा भाग लिहिण्याची व प्रकाशकास छापून काढण्याची इच्छा व शक्ति दिली त्याची एकवार अनन्यभावानें क्षमा भाकून हा खुलासा पुरा करतों.

| | |
|---|---|
| खेड. | आपला कृपाकांक्षी |
| आषाढ वद्य ६ शके १८२९ | दत्तात्रेय अनंत आपटे. |

---

## प्रकाशकाचे दोन शब्द.

गुदस्तसालीं मित्राच्या आश्रयदात्यांस १६ वी भेट ह्मणून कवि चरित्राचा पहिला भाग फुकट दिला आहे. त्यांत **मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, दासोपंत, मुक्तेश्वर,** आणि **रामदास** असे सात कवि आले असून पृष्ठसंख्या १२८ झाली आहे. या भागात तीन कवि जास्त आले असून पृष्ठसंख्याही बरीच वाढली आहे.

विचारपूर्वक पाहिलें असतां अशाप्रकारचीं सारभूत चरित्रें लोकांना आवडलीं पाहिजेत पण बरेच लोक या आमच्या कृतीबद्दल नाकें मुरडतात तरी अशा लोकांनीं लक्ष्यपूर्वक हा भाग अवलोकन करावा ह्मणजे त्यांची खात्री पटेल व त्यांना यांतली रसिकता कळूं लागेल असा आह्मांस भरंवसा आहे.

मित्रहो, हा ग्रंथ ह्मणजे एक महत्वाचा इतिहास आहे. तरी याच्या संरक्षणाकरितां आपणाकडून होईल ती मदत करण्यास आळस करूं नका. यापासून पुष्कळ फायदे आहेत ते आज ना उद्यां आपणास कळूं लागतील. या ग्रंथाचें अवलोकन आपण अनेकवेळां करा असेंही आपणास आमचें सांगणें आहे,

हा भाग मित्राच्या सर्व वाचकांस आवडून त्यांनीं मित्रावर कृपा केली ह्मणजे केवळ वाचकांच्या सेवेकरितां देह झिजविणाऱ्या मित्राच्या संपादकास आनंदीआनंद होणार आहे. ईश्वरानें सर्वांस सुखी राखावें अशी त्याजकडे प्रार्थना भाकून मित्राच्या गुणज्ञ वाचकांस चरित्रभागाकडे लक्ष्य देण्यास विनंति करितों.

| | |
|---|---|
| खानापूर | आज्ञांकित. |
| ता. २८।७।७. | द. गो. सडेकर. |

कवि चरित्र भाग २ रा

# अनुक्रमणिका.





ॐ नमो भागवते वासुदेवाय.

# कवि चरित्र



## ( भाग २ रा. )

## तुकाराम.



शस्त्रास्त्रें जशीं वीरपुरुषास, अलंकार जसे तरुण व सुंदर युवतींस, तसीं सविचार भूषणें ज्ञानेच्छुंस व मोक्षप्राप्तीची इच्छा करणारांस होत. शस्त्रास्त्रें सज्ज करून व अश्वारूढ होऊन युद्धास निघालेला योद्धा, सुंदरालंकारांनीं भूषित होऊन प्रियकरास भेटण्याकरितां अभिसारिका वेषानें निघालेली गजगति सुंदरा, सुविचार भूषणांची लालसा मनांत धरून तत्प्राप्तीस्तव धडपडणारा ज्ञानेच्छु किंवा मोक्षेच्छु हे त्या त्या दृष्टीनें पाहणारांस मनोरम असेच दिसतात! योद्धा आपल्या शस्त्रास्त्रांनीं शत्रूंचा धुव्वा उडवितो, सुंदर तरुणी आपल्या अलंकारसंमिश्र सौंदर्याचें जाळें पसरून लोकांना भुरळ पाडिते व त्यांच्या मनोविहंगास बद्ध करून टाकते पण ज्ञानेच्छु किंवा मोक्षेच्छु वरील दोघांचीं कामें एकटाच करून टाकतो, अर्थात् तीं कामें तो इतक्या कौशल्यानें करतो कीं त्याचें वर्णन करवत नाहीं! " आपणासारिखे करिती तात्काळ, नाहीं काळ वेळ तयांलागीं, " या सुंदर तत्वाचा प्रादुर्भाव केवळ अशा पुरुषांच्या ठायींच संभवतो. अशा करणीचा आव घालणारे इतर पुरुष हे यांची नक्कल होत! अशा पुरुषांच्या कुटुंबांतील व्यक्ति तरी कोण कोण असतात! धैर्य हा त्यांचा पिता, क्षमा ही जननी, शांति ही देवब्राह्मणाग्नी समक्ष वरलेली पत्नी, सत्य हा पुत्र, दया ही भगिनी, आत्मसंयमन हा बंधु, भूमितल ही शेज, दिशा हेंच वस्त्र व ज्ञानामृत हें भोजन! अशा विभूतीं पैकींच तुकारामबोवा हे होत!

ज्यांनीं भक्तीचा अखंड दीप पाजळून अविद्यांधकारानें आवृत झालेल्या जगतीतलावरून स्वर्भुवनाचा मार्ग लोकांना सुकर करून दिला, ज्यांनीं भक्तिमार्गाच्या सोज्वल पताका कोट्यावधि लोकांच्या हातीं देऊन त्यांस हा संसारसागर तरून जाण्यास प्रभुनाम नौका हवालीं केली, ज्यांनीं आपल्या

अतुल भक्तितेजानें व प्रासादिक अभंगवाणीनें संपूर्ण महाराष्ट्रियांस आपलें कायमचें ऋणी करून ठेविलें, ज्यांनीं अनंत दुःखें व यातना सोसून 'सुख पाहतां जवापाडें दुःख पर्वता एवढें' हें अबाधित तत्त्व जनांच्या अंतःकरणावर चांगलें बिंबविलें, कर्मक्षयाची पहांट फुटून व गुरुकृपेचा उषःकाल होऊन ज्ञानरवीचें कोंवळें ऊन पडतांच ज्यांना समदृष्टीचें वैभव दिसूं लागलें, ज्यांनीं प्रथम विषययात्रेच्या भगवत्प्रेम सूर्यानें भूषित झालेल्या अरण्यांतून आसपासच्या गिरिगव्हरांत कामक्रोधादि वनपशूंच्या भयंकर-हृदयाचें पाणी करून सोडणाऱ्या-डुरकण्या व गर्जना चालल्या असतां, चित्त शैलासारख्या उंच्या सुळक्याच्या पहाडावरील मनोवासनांच्या व संकल्पविकल्पांच्या दूरवर पसरलेल्या जाळ्या व गुंफा, लोभाच्या दऱ्या व खोरीं, तृष्णामहत्वाकांक्षादि बिकट धों धों वाहणाऱ्या नद्या, मोहरूपी भयंकर दलदल, मदमत्सरादि प्राणघातकी सर्पांचे फुत्कार, अहंकारासारख्या मधून हळूंच 'घूं घूं' करणाऱ्या घुबडांचे घुत्कार यांना भिऊन न डगमगतां सद्वासनांच्या पर्वतावर आरोहण केलें. पुढें ज्यांनीं आत्मसंयमनाची वहाण पायांत घालून, हरिपदवासनारूप शिधोरी पाठीशीं बांधून व ईश्वरावरील दृढनिष्ठा ही काठी हातीं घेऊन गुरुउपदेशाच्या मदतीनें असत्कर्मांच्या मोहक वाटा चुकवून व पोकळ डौलांसारख्या चकव्यांना व दुष्ट दृष्टीसारख्या वाटमाऱ्यांना दटावून भक्तिरसाचे मधुर घुटके आकंठ प्राशन करीत-करीत देहासकट सर्वांसमक्ष स्वर्गारोहण केलें व ज्यांनीं एका हातांत भगवन्नामाचें महातीव्र असें दिव्य खड्ग घेऊन व एका हातांत वैराग्याची अभंग ढाल धरून तिजवर दांभिक कर्मठाचे शब्दप्रहार सोशीत सोशीत त्यांच्याशीं भयंकर संग्राम केला ते महा वैष्णववीर श्री तुकोबाराय पुण्यापासून आठ कोसांवर असलेल्या देहूनामक गांवीं शके १४९० ह्मणजे इ. स. १५६८ त जन्मले. तुकारामबोवांच्या या जन्मशकाबद्दल बराच मतभेद आहे परंतु हा जन्मशक तुकारामबोवाचे पंढरपुरांत जे वंशज आहेत त्यांच्या जवळील वंशावळींतून घेतला आहे; त्यावरून हाच बरोबर असावा असें वाटतें. तुकाराम महाराज जातीनें कुणबवाणी होते असें कोणी ह्मणतात, परंतु त्यांच्या पूर्वजांचे, त्यांचे स्वतःचे व त्यांच्या हल्लींच्या वंशजांचे जे सोईरसंबंध झालेले आहेत, त्यावरून ते चांगल्या थोर मराठा कुळांतले होते, ह्याविषयीं कांहीं शंकाच राहत नाहीं. त्यांचें उपनांव 'मोरे' असें होतें.

त्यांच्या कुलांत संतमालिका बरीच दिसून येते. त्यांच्या सातव्या पूर्व-

त्याचें नांव विश्वंभर होतें. हे महा भगवद्भक्त असून ते साधुसंत, अतिथि अभ्यागत वगैरे भक्तिमार्गांतील लोकांची चांगली सुश्रूषा करीत असत. त्यांच्या कुटुंबाचें नांव अमाबाई असें होतें. ही साध्वी आपल्या पतीप्रमाणेंच श्रीविठ्ठलाचें नामस्मरण व पूजाअर्चा करीत असे. यांना देहूगांवीं राहण्याबद्दल श्रीविठ्ठलांनीं दृष्टांत दिला होता व तेथें स्थापण्याकरितां आपली एक स्वयंभूमूर्तिही दिली होती. त्यांस हरि व मुकुंद असे दोन पुत्र झाले; परंतु त्या दोघांचाही ओढा परंपरागत चालत आलेल्या भक्तिमार्गाकडे नसून क्षात्रधर्माकडे होता. ते दोघेहीजण देवगिरीच्या राजावर आलेल्या परचक्राचे तावडींत सापडून लढाईंत मारले गेले. इ. स. १२४० त मुबारिकाची व हरपाळाची देवगिरीजवळ जी लढाई झाली ती ही असावी असें वाटतें. मुकुंदरावाची बायको त्याचेबरोबर सती गेली. हरीची बायको गरोदर असल्यामुळें ती आपल्या सासूजवळ देहू येथें येऊन राहिली. पुढें तिला मुलगा झाल्यावर त्याचें नांव 'विठोबा' असें ठेविलें. त्यानें आपल्या बापाचा क्षात्रधर्म सोडून वाडवडिलांचा भक्तिमार्ग पुढें चालविला. ह्यास पदाजी नांवाचा मुलगा होता. पदाजीचा मुलगा शंकर, शंकराचा कान्हया व कान्हयाचा बोल्होबा ह्याप्रमाणें तुकाराम महाराजांच्या बापापर्यंत वंशपरंपरा होय. या सर्व पुरुषांनीं आपला वडिलोपार्जित धंदा स्वीकारून भगवद्भक्तींत आपला काळ घालविला.

तुकाराम महाराजांचा बाप बोल्होबा व आई कनकाई हीं दोघेंही भाविक असून विठ्ठलनामस्मरणांत व साधुसंतांच्या समागमात आपला काळ सुखानें घालवीत असत. बोल्होबानें आपल्या कुळाचाराप्रमाणें आषाढी कार्तिकीची वारी चालविली होती. त्यास फार वर्षें संतान झालें नव्हतें म्हणून तो व त्याची पत्नी कनकाई हीं आपल्या परमपूज्य विठोबाजवळ मुलाविषयीं प्रार्थना करीत. विठोबाच्या कृपाप्रसादामुळें त्यांस वयाचे चाळीसावेवर्षीं पहिला पुत्र झाला. त्याचें नांव सावजी असें ठेविलें होतें. दुसऱ्यावेळेस कनकाईस तुकोबा झाले; व तिसऱ्या खेपेस कान्होबा झाले. या तिघांसही बाळपणापासून विठ्ठलभक्तीचा छंद होता. यास एक बहीण होती असें म्हणतात. पुढें बोल्होबास दुकानदारींत दोन पैसे मिळूं लागले. मुलांचीं लग्नें झालीं. याप्रमाणें त्या वृद्ध दंपत्यानें सुखाचा यथेच्छ उपभोग घेऊन सावजीस संसारभार घेण्यास सांगितलें. पण तो संसार असार मानणारा होता म्हणून त्यानें दुकानदारी व संसार चालविण्याचें साफ

नाकारिलें इतकेंच नाहीं तर त्यानें श्रीविठ्ठलरूप तीव्र कात्रीचे साह्यानें मायापाशाचीं बंधनें तटातट कातरून आपलें सर्व राहिलेलें आयुष्य भगवच्चिंतनांत घालविलें. मग अर्थातच संसाराचा गाडा सुरळीत चालविण्याचा असह्य भार तुकाराम महाराजांस पतकरावा लागला. यानंतर तुकाराम महाराजांच्या पहिल्या बायकोस दम्याचा आजार असल्यामुळें त्यांनी पुण्याचे धनाढ्य सावकार आप्पाजी गुळवे यांची उपवर कन्या अवलाई उर्फ जिजाई इच्याशीं दुसरें लग्न लावलें. त्यांच्या पहिल्या बायकोचें नांव रखुमाबाई होतें. ती जरी वडील बायको होती तरी घरांतील सर्व कारभार जिजाबाईच पहात असे.

असो. तुकोबारायांच्या बाळपणाचा इतिहास कोठें फारसा उपलब्ध नाहीं व त्यामुळें त्याचें बालचरित्र कांहींच देतां येत नाहीं. वयाच्या तेराव्यावर्षी दुकानदारी व संसार त्यांच्या गळ्यांत पडला. तेव्हांपासून सतरा वर्षांचें वय होईपर्यंत त्यांनीं आपला धंदा वडिलांच्या देखरेखीखालीं मोठ्या दक्षतेनें व प्रामाणिकपणानें चालविला. ही मुलाची हुशारी व कर्तबगारी पाहून बोल्होबास व कनकाईस फार समाधान वाटे. याप्रमाणें इहलोकचें पूर्णसुख अनुभवीत असतां त्या वृद्ध दंपत्यास पांचसहा महिन्यांचे अंतरानें देवाज्ञा झाली. आपल्या सात्वीक व प्रिय मातापितरांच्या मृत्यूनें तुकारामबोवांस पराकाष्टेचें दुःख झालें. आपल्या लहान भावंडांचा शोक व दीन वदनें पाहून तर त्यांचें हृदय फाटून जाई. निरापेक्षवृत्तीनें तीर्थयात्रा करीत फिरणाऱ्या साधुसंतांच्या मुखानें, मानवी प्राण्यांचें जीवित किती क्षणभंगुर आहे, त्यांची संपत्ति व सौख्य मिळविण्याची हाव किती व्यर्थ आहे व मरणसमयीं स्वकष्टार्जित संपत्तीकडे आणि प्रियपत्नी व मुलें यांजकडे केविलवाण्या मुद्रेनें पहात पहात त्यांस सोडून एकटेंच कसें जावें लागतें, इत्यादि गोष्टींविषयीं तुकोबांनीं नेहमीं वैराग्यपर उपदेश ऐकिला होता व त्यांच्या कोंवळ्या मनावर त्याचा ठसा खोल उमटत चालला असतां त्या गोष्टीचा त्यांस प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें त्यांचें चित्त संसाराविषयीं व व्यापाराविषयीं उदासीन होत चाललें. आईबापांस एक वर्ष लोटतें न लोटतें तोंच त्यांचा वडील भाऊ जो सावजी त्याची बायको निवर्तली. आधींच संसाराविषयीं विरक्त झालेला सावजी ईश्वरीसंकेताप्रमाणें संसार त्याग करून राख फासून लंगोटी लावून व गोसावी बनून तीर्थाटणाला निघून गेला. वरील एकामागून एक घडून आलेल्या गोष्टींमुळें तुकाराम

महाराजांचे औदासिन्यास चांगली भर पडत गेली. पहिल्यानें व्यापार चांगला चालून दोन पैसे मिळूं लागले, पण पुढें अधिक नफा घेऊन जिन्नस देणें ह्मणजे गिऱ्हाइकांस नाडणें व उधारीसाठीं लोकांस तसदी लावणें ह्मणजे त्यांच्या अडचणी व गरीबी यांविषयीं परवा न करितां त्यांस छळणें अशी त्यांची समजूत झाल्यामुळें त्यांस कोणत्याही धंद्यांत फायदा झाला नाहीं. ह्या त्यांच्या चमत्कारिक वृत्तीमुळें अर्थातच त्यांची वडिलोपार्जीत संपत्ति तेव्हांच नाहींची झाली. तेव्हां ते घरांतील बायकांचे अंगावरील होती नव्हती तेवढी चीजवस्त मोडून व त्याचा कांहीं वाणसवदा घेऊन गांवोगांव व्यापारी होऊन फिरूं लागले पण त्यांतही त्यांस यश आलें नाहीं. आपण कोठें चुकतों ह्मणून आपल्यास नुकसान लागतें हें कांहीं त्यांच्या लक्षांत येईना, अथवा त्यांस आपली चूक समजत असली तरी त्यांचा सात्विक व उदार स्वभाव त्यांस ती सुधारण्यास बिलकूल संवड देईना. पुढें त्यांनीं सावकाराचें कर्ज काढून अनेक धंदे केले परंतु ते सर्व आंत बट्ट्याचेच व्यापार झाले. शेवटीं पुनः एक वार नशीबाची परीक्षा पहावी ह्मणून जिजाबाईनें आपल्या नांवानें सावकारास रोखा लिहून देऊन २०० दोनशें रुपये कर्जाऊ आणिले व तुकारामबोवांस चांगल्या व्यापाऱ्यांच्या संगतीनें धंद्यास पाठविलें. या मिठाच्या धंद्यांत त्यांस अडीचशें रुपये मिळाले. मिळालेली रक्कम तुकोबा घरीं घेऊन येत असतां वाटेंत त्यांच्या कर्मानें त्यांस गांठलेंच! रस्त्यांत त्यांना एक उघडा बोडका ब्राह्मण भेटला. त्याची ती विपन्नअवस्था पाहून आमच्या तुकोबांच्या अंतःकरणाला प्रेमाचे पाझर फुटले व त्यांनीं त्या ब्राह्मणास सर्व रुपये देऊन टाकून त्याचें दारिद्र्य दूर केलें व आपणही वाटेनें पैसे संभाळण्याच्या काळजींतून एकदांचे मुक्त झाले.

तुकोबांची ही वृत्ति घरच्या माणसांस फारच जाचली. या त्यांच्या स्वभावामुळें पुढें त्यांस कोणी पैशाची मदत करीना. ह्यामुळें कुटुंबाचे फार हाल होऊं लागले. तशांत त्या सालीं दुष्काळही पडला. मग त्यांच्या बायका मुलाच्या व इतर माणसांच्या हालअपेष्टेस काय पारावार! दोन दोन चार चार दिवस त्यांना उपास पडूं लागले. शेवटीं त्यांची थोरली बायको रखुमाबाई अन्न अन्न करीत मेली व तिचा एकुलता एक व तुकारामबोवांचा आवडता मुलगा संतोबा हाही मागाहून लवकरच उपासमारीनें वारला. यावेळीं त्यांचें वय केवळ एकवीस वर्षांचें ऐन उमेदीचें होतें! अशा पोरवयांत वरच्यांसारखे पुऱ्या कसोटीस लावणारे संसारांतील बिकट प्रसंग व

दुःखाचे डोंगर त्यांच्यावर एकामागून एक कोसळल्यामुळें व त्यांत पुनः चारचौघांत छीः थूः झाल्यामुळें ते पूर्ण विरागी बनले व संसाराचा त्याग सोडून एकांतवासांत ईश्वरप्राप्तीचें साधन करून जन्माचें सार्थक करण्याकरिता बुवांची स्वारी भामनाथ ऊर्फ भंडारा नांवाच्या देहू नजीक तीन चार कोसांवर असलेल्या डोंगरावर जाऊन बसली!

भांडार डोंगरावर एकांतवासांत ईश्वरचिंतन करण्याचा क्रम चालला असतां तुकाराम महाराजांस धर्मग्रंथांचें परिशीलन व मनन करण्याची इच्छा झाली. त्यांनीं ज्ञानदेव, नामदेव, कबीर वगैरे साधुपुरुषांच्या अभंगांचीं व पदांचीं बाडे, ज्ञानेश्वरी, योगवाशिष्ठ, अमृतानुभव, वगैरे अध्यात्मपर ग्रंथ, व एकनाथी भागवत, भावार्थ रामायण वगैरे पुराणें मिळविलीं व त्यांचें एकसारखें पठण व मनन चालविलें. त्यांची स्मरणशक्ति मोठी तीव्र असल्यामुळें व एकांतांत एकाग्रतेनें त्यांचें पठण झाल्यामुळें त्यांस ह्या ग्रंथांतील, अभंग, पदें, ओंव्या व कथानकें तोंडपाठ झालीं. अशा या एकांतवासाचें महत्व कोठवर वर्णन करावें! रा. रा वि. य. मोकाशी आपल्या मालेंत ह्मणतातः—" महात्म्यांच्या महतीपटाचें मूळसूत्र जेथून निघतें, कल्पकाच्या कल्पकतेस जें आदिकारण असतें, कलेचें बीं ज्या रोप्यांतून निवतें, समाजरचनेचें मांडणीचित्र प्रथम ज्या पाटावर तयार होतें, तो पट, तो रोपा, तें आदिकारण, तें मूळसूत्र, ह्मणजे एकांतवास होय." ज्या एकांतवासानें अज्ञानपटल दूर होऊन ज्ञानाचा चष्मा लागतो, ज्यानें दुष्ट मनोविकारांची खळबळ बंद होऊन मनांत शांतिसुखाचा निर्मळ झरा वाहूं लागतो, ज्यानें विकारी देह निर्विकार होतो, एवंच नर नारायणस्वरूपीं मिळतो, अशा या एकांतवासाची इच्छा कोण ह्मणून करीत नाहीं! अर्थात् सर्व करतात. या एकांत ठिकाणींच तुकोबारायांना कीर्तन व कविता करण्याची स्फूर्ति झाली-भजनाविषयीं व कीर्तनाविषयीं त्यांचा प्रेमभाव अतिशय असे.

असो. याठिकाणीं जिजाबाई रोज बोवांस भाकर व भोपळाभर पाणी नेऊन पोंचवीत असे. एकेदिवशीं पतीची भोजनसामुग्री घेऊन जात असतां एक मोठा करवंदीचा कांटा तिच्या पायांत इतक्या जोरानें बोंचला कीं, तो तळव्यांतून वर निघाला. दोनप्रहरचा वेळ असून ऊन कडक पडलें होतें, त्यामुळें जिजाईचा जीव कासावीस होऊन ती मूर्छित झाली. असो. पुढें ही हकीकत तुकोबांस बायको अति संतप्त झाल्यामुळें व भान न राहिल्यामुळें देवाचावाकड्या शब्दांनीं ऐकण्यास मिळाली व आपला पोटाला मार

जिभाईवर पडून शिवाय आपल्याला अन्न पोंचविण्याचाही तिला ताप होतो हें लक्ष्यांत आणून व ईश्वर सर्वत्र भरला आहे, त्याची प्राप्ति करून घेण्यासाठीं इतक्या लांब अडचणींत येऊन बसण्याचें कांहीं कारण नाहीं असा विचार करून गांवांत आले. गांवांत आल्यावर लोक त्यांच्या फार मागें लागत असत. एकदां एका वृद्ध बाईला त्यांनीं तेल स्वतः जाऊन आणून दिलें हें पाहून व त्याचप्रमाणें त्या बाईनें भाविकपणानें 'तुक्यानें आणून दिलेलें तेल फार दिवस पुरतें असें लोकांना सांगितल्यावरून गांवातील सर्व लोक आपापले तेलाचे नळे व पैसे देऊन तुकोबांकरवीं काम करून घेत. तात्पर्य गांवांतील एखाद्या वेड्याची वाटेल त्यानें वाटेल तशी चेष्टा करावी व त्यास वाटेल तसें काम सांगावें, त्याप्रमाणें देहू गांवांतील लोक तुकारामबावांस समजून वागवीत असत,

इकडे तुकाराममहाराजांच्या बायकोची जी कांहीं स्थिति झाली ती सांगतां पुरवत नाहीं! ती श्रीमान् मातापितरांच्या लडिवाळपणांत वाढलेली असून चांगल्या अब्रूदार घराण्यात पडली होती. यामुळें तिला घरांतलें काम करण्याची संवय नव्हती. पदरीं चार चिल्यापिल्यांची पाटी असून त्यांच्या पोषणाची व त्याचप्रमाणें आपल्या व नवऱ्याच्याहि पोटाची काळजी तिच्यावरच पडली. बरें बायकोनें मोलमजूरी करून इकडून तिकडून धान्य आणावें तों बोवानें अतिथिअभ्यंगतास देऊन त्याचा फन्ना उडवावा. एकदां तर त्यांनीं तिचें एकचें एक लुगडेंही देऊन टाकिलें!

तुकारामबोवांनीं संसार चालविण्यासाठीं आतां इतःपर कोणताही धंदा म्हणून करावयाचा नाहीं असा निर्धार केला होता, तथापि भगवद्भक्तींत व्यत्यय न येतां एखादा चरितार्थाचा धंदा करण्यास मिळाला असतां तो करण्यास ते तयार असत; म्हणून त्यांनीं एकदां अर्धे मण दाण्याच्या बोलीवर एका कुणब्याचें शेत राखण्याचें काम पतकरिलें. ते शेतांतील माळ्यावर भजन करीत खुशाल बसून रहात व इकडे पाखरें खुशालपणें जोंधळ्यावर बसून दाणे खात. हे ईश्वरानें निर्माण केलेले जीव, पोटापुरतें खाण्यासाठीं येथें येतात व पोट भरलें म्हणजे उडून चालते होतात, ते संग्रह करण्याकरितां बरोबर कांहीं नेत नाहींत, अशा प्राण्यांच्या पोटावर मारणें योग्य नाहीं असें मनांत आणून तुकाराम त्यांना हांकीत नसत. या त्यांच्या हलगर्जीपणामुळें बाह्यदृष्ट्या शेताची अगदीं खराबी झाली, म्हणून त्या शेताच्या मालकानें तें शेत तुकोबाचे अंगावर टाकिलें आणि त्याबद्दल त्यांजपासून

दोन खंडी धान्याचा रोखा लिहून घेतला. पुढें असा चमत्कार झाला कीं, त्याच शेतांतून मळणीचेवेळीं सत्रा खंडी धान्य निघालें. त्यांपैकीं दोन खंडी धान्य कराराप्रमाणें शेताच्या मालकास देऊन बाकी राहिलेलें धान्य तुकाराम महाराजांनीं घरांत न घेतां विश्वंभरबुवांनीं बांधलेल्या श्रीविठ्ठलाच्या मंदिराच्या जीर्णोद्धाराकडे खर्च केलें.

एकेवेळीं तुकारामबोवा व त्यांचे कनिष्ट बंधु कान्होबा या उभयतांमध्यें घरप्रपंचाविषयीं बोलणें झालें, त्यावेळीं आपल्याला हा असार संसार कर्तव्य नाहीं असें तुकाराम महाराजांनीं त्यास सांगितलें व त्याजकडून वडिलांच्या वेळचीं लोकांकडे येणें असल्यासंबंधी जीं कांहीं कागदपत्रें व खतें होतीं तीं त्यांनीं मागविलीं. तीं हातीं घेऊन तुकारामबुवा कान्होबास ह्मणाले कीं, हीं दुःखाला कारण आहेत, ह्याकरितां हीं मी इंद्रायणींत बुडवितों. कान्होबानें विनंति केली कीं, महाराज, आपण एक प्रपंच सोडून विरागी बनलां, परंतु माझ्यामागें पोरेंबाळें आहेत, मी कसें करावें ? यावर तुकारामबोवांनीं त्या खतपत्रांचे दोन हिस्से केले व एक कान्होबास देऊन ह्मणाले "माझ्या हिश्शाचीं मी नदींत बुडवितों; कारण मला त्यांची जरूर नाहीं. तुझ्या हिश्शाचीं तूं घे व खुशाल वेगळा संसार कर. ह्याप्रमाणें तुकाराम महाराजांनीं अगदीं उघडपणें आपल्या भावाची व त्या बरोबरच संसाराच्या काळजीची फारकत करून त्यांनीं परमार्थाचा मार्ग धरिला.

अशाप्रकारें तुकोबारायांनीं आत्मोन्नतीचा प्रयत्न सुरू केला होता, परंतु लोकांना त्याची काय किंमत ? ‘ ज्यांच्या अंगीं पूर्ण विरक्ती बाणली होती, जे मानापमानाच्या लिगाडापासून मोकळे झाले होते, ज्यांच्या अंगीं भेदभाव उरला नव्हता, साधुसंतांच्या संगतीनें व ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, वगैरे महापुरुषांच्या ग्रंथपठणानें ज्यांस आध्यात्मज्ञानाचें पूर्ण रहस्य समजलें होतें, ज्यांच्या अंगीं भजन व कीर्तन करून इतरांना भगवद्भक्तीला लावण्याची योग्यता आली होती त्या महापुरुषाची योग्यता लोकांस कळूं नये हें त्यांचेंच दुर्भाग्य होय ! असो. पूर्वोक्तप्रकारें तुकारामबोवांस ईश्वरभक्तीचा निदिध्यास लागल्यामुळें त्यांस झोंपेमध्यें देखील भजन, कीर्तन, विठोबाची मूर्ति वगैरे प्रकार दिसावे यांत मोठेंसें नवल नाहीं. एकेदिवशीं श्रीविठ्ठलानीं तुकोबारायांस स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, नामदेवाच्या प्रतिज्ञेप्रमाणें पांच कोटी एकावन लक्ष अभंग करावयाचे राहिले आहेत ते तूं पुरे कर, मी तुला कवित्वशक्ति व तत्संबंधीं ज्ञान देतों व तूं जें

कवितेंत वर्णन करशील तें प्रसादवचन होईल.' या वेळेपासून तुकोबा-रायांना कवित्व करण्याची स्फूर्ति झाली. त्यांनीं पहिल्यानें बाळक्रीडेचे अभंग केले व पुढें त्यांची कवित्वशक्ति इतकी वाढली कीं, ते अभंग सहज करीत. कथाकीर्तनांत त्यांनीं स्वतःचेच अभंग ह्मणण्याचा परिपाठ ठेविला होता. त्यांची शब्दयोजना सोपी, सरळ व बोधप्रद असे. भजनास व कीर्तनास येणारी मंडळी त्यांचे स्वकृत अभंग ऐकून प्रेमभावानें डोलत असे. या त्यांच्या अनुपम कवित्वशक्तीनें व उपदेश करण्याच्या शैलीनें लोकांचा त्यांच्यावर भाव बसत चालला. याप्रमाणें ज्यांस लोक उपहासानें 'वेडा तुक्या' असें ह्मणत असत, त्यांचीच लोक आतां कीर्ति गाऊं लागले व त्यांस साधुपुरुष असें मानूं लागले.'

साधुपुरुषाप्रमाणें तुकोबारायांचे अंगीं, दया, क्षमा, शांति, सहनशीलता, वैराग्य, निरपेक्षबुद्धि वगैरे सद्गुण पूर्णपणें वसत होते, ह्मणून त्यांचें तेज लोकांवर दिवसेंदिवस अधिक पडत चाललें. हें पाहून कांहीं साधु गोसावी ह्मणविणारांस त्यांच्याविषयीं मत्सर वाटूं लागला. मंबाजी ह्मणून एक चिंचवडचा ब्राह्मण महंत बनून शिष्यवर्गासह देहूस रहात होता. त्यानें देवळाचे मागें कांहीं झाडें लावून कांट्यांचें कुंपण केलें. आपण केलेल्या कुंपणाच्या कांट्या तुकारामांनीं उपटल्या हें त्यास कळतांच तेथीलच एक काठी घेऊन तो तुकारामास झोडपत सुटला. मारितां मारितां काठी पिंजली, तेव्हां दुसरी, तिसरी याप्रमाणें दहापांच काठ्या तुकारामबोवांच्या अंगावर त्यानें मोडल्या. पुढें जिजाबाईनें ते कांटे काढिले. मंबाजीस तुकारामानें नेहमींप्रमाणें आपले कीर्तनास बोलाविलें तरी तो येईना व अंग दुखत असल्याची सबब सांगूं लागला, तेव्हां तुकोबाराय स्वतः त्याचें अंग रगडून ह्मणाले, "मीच कांट्या उपटल्या नसत्या तर स्वामीस एवढा शीण कां झाला असता? आतां एवढा अपराध माफ करून कीर्तनास चलावें." तुकारामबोवांची ही निरभिमान व सहनशील वृत्ति पाहून मंबाजी आपले मनांत फार ओशाळा झाला व तुकारामबोवा खरोखरचं साधुपुरुष आहेत, त्यांची योग्यता मोठी आहे, आपण त्यांस व्यर्थ छळिलें, असा त्यास पश्चात्ताप होऊन तो पुढें तुकारामबोवांस पूज्य मानून नम्रपणानें वागूं लागला. ह्या वेळपर्यंत बरेच लोक तुकाराममहाराजांचे शिष्य झाले होते व त्यांतील कित्येकजण संसारत्याग करून त्यांच्याजवळच राहिले होते. गंगाधरपंत मवाळ कडूसकर ब्राह्मण व संताजी जगनाडे चाकणचे तेली हे त्यामध्यें

प्रमुख होते. मवाळ हे तुकारामबोवांची कविता लिहीत व दोघेही कीर्तनाचे वेळीं टाळ-वीणा घेऊन धृपद धरीत असत. वरील मंबाजी गोसाव्याच्या गोष्टीबद्दल तुकोबारायांनीं पांच अभंग केले आहेत. त्यांत ते देवाला ह्मणतात.–

'बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनि अंत क्षमा अंगीं कांटीवरी मारविलें ॥ १ ॥ शिव्यागाळी नीत नाहीं । बहू फार विटंबिलें ॥ तुका ह्मणे क्रोधाहातीं । सोडवूनि घेतलें ॥ ३ ॥

असो. याप्रमाणें तुकाराम महाराजांचा भजन कीर्तनाचा क्रम चालला असतां एकेदिवशीं रात्रीं त्यांस स्वप्न पडलें, त्यांत त्यांनीं असें पाहिलें कीं, एका ब्राह्मणानें आपले मस्तकीं हात ठेविला व आपल्यास 'रामकृष्ण' मंत्र सांगितला. याबद्दल तुकारामबोवा अभंग वाणीनें स्वतः सांगतातः–

'सद्गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर २
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजीं ॥ ३ ॥
कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनिया काय त्वरा जाली ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण मालिकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्ण हरि ॥ ६ ॥
माघशुद्ध दशमी पाहूनी गुरुवार । केला अंगिकार तुका ह्मणे ॥ ७ ॥

या वेळेपासून ते 'बाबाचैतन्यास' आपले गुरु मानूं लागले ह्या अभंगांत कोणत्या तरी वर्षाच्या माघ शुद्ध दशमीस गुरुवारीं आपल्याला उपदेश मिळाला असें तुकोबा ह्मणतात परंतु राजवाडे यांनीं अनेक साधक बाधक प्रमाणांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, तुकोबाला बाबाजीचैतन्यानें शके १५२० विलंब संवत्सर माघशुद्ध दशमी गुरुवारीं उपदेश केला. त्यावेळीं तुकारामबोवांचें वय बरोबर तीस वर्षांचें होतें.

याच सुमारास तुकारामबोवांचें चित्त अगदीं उदास झालें व ते 'बह्लाळाचे' वनांत एकांतांत जाऊन राहिले. पहांटेस स्नानासाठीं इंद्रायणीवर यावें, विठोबाची पूजाअर्चा करावी व परत जंगलांत जावें, असा क्रम त्यांनीं चालविला. तेथें कोणीं भाकर आणून दिली तर खावी नाहीं तर उपाशीं रहावें पण घरचें ह्मणून त्यांनीं नांव घेऊं नये. ह्याप्रमाणें दोन महिनें लोटल्यावर एकेदिवशीं जिजाबाई पाणी आणण्याकरितां व तुकारामबुवा स्नानाकरितां इंद्रायणीवर आले असतां त्यांची गांठ पडली व त्यांस पाहून

जिजाईनें त्यांचा पदर धरिला व ती त्यांस ह्मणाली, 'तुह्मी असे दोन दोन महिने घरीं न याल तर आमची वाट काय!' यावर तुकोबांनीं तिला सांगितलें कीं, 'तूं विठोबारखुमाईची भक्ति कर ह्मणजे तुला कशाचीही ददात पडणार नाहीं.' जिजाबाईनें 'आपल्या इच्छेप्रमाणें करीन, आपण आतां घरीं यावें व भजन करीत स्वस्थ बसावें' असें नम्रपणें विनविल्यावरून तुकारामबोवा घरीं आले. घरीं आल्यावर तुळशीवृंदावनापाशीं बसून, त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें तुकारामबोवांनीं जिजाईस जवळ बसवून उपदेशपर अकरा अभंग ह्मटले. या अभंगांस त्यांनीं 'पूर्णबोध' असें नांव दिलें आहे. यांत तुकोबांनीं जिजाबाईस असा उपदेश केला आहे कीं, तूं संसाराची काळजी धरूं नको. ईश्वर सर्वांचें चालविणारा समर्थ आहे, तूं आपल्या जन्माचें सार्थक कर. सर्व ऐहिक वस्तु क्षणभंगुर आहेत. ईश्वर-प्राप्तीचा प्रयत्न कर.' हे अकरा अभंग इतके सुरस आहेत व त्यांतील बोध इतका पूर्ण आहे कीं, ते हृदयांत खोल उतरल्याशिवाय रहात नाहींत. त्यांतील दोन अभंग खालीं दिले आहेतः—

'पिकल्या शेताचा आह्मां देतो वांटा। चौधरी गोमटा पांडुरंग ॥१॥
सत्तर टक्के बाकी उरली मागे तो हा। मागें झडले दाहा आजीवरी २
हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज। माजघरीं बाजे बसलासे ॥ ३ ॥
मज यासीं भांडतां जाब नेदी बळें। ह्मणे एकावेळे घ्याल वांटा ॥४॥
तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें। नेदितां लपावें काय कोठें ॥
'देव पाहावया करी वो सायास। न धरी हे आस नाशिवंत ॥१॥
दिन सोम शुद्ध सकळीं पातला। द्वादशी घडला पर्वकाळ ॥ २ ॥
द्विजां पाचारूनी शुद्ध करीं मन। देईं वो हें दान यथाविध ॥३॥
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची। माउली आमुची पांडुरंग ॥४॥
तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं। परी तो जवळी आहे आह्मां ।५।

या उपदेशानें जिजाईची वृत्ति इतकी पालटली कीं, तिनें दुसरे दिवशीं घरांतील सर्व कांहीं ब्राह्मणांकडून लुटविलें; परंतु हें सर्व स्मशानवैराग्य होतें. दुसरे दिवशीं ती तो सर्व उपदेश विसरून गेली आणि आपण मूर्खपणानें घर धुवून टाकलें ह्याबद्दल पश्चात्ताप होऊन ती खेद करूं लागली.

तुकारामबोवांस तिघी मुली व दोन मुलगे होते. मुलींचीं नावें काशी, भागीरथी व गंगा आणि मुलांचीं नांवें महादेव व विठोबा. ह्या मुली

उपवर झाल्या असल्यामुळें जिजाबाई त्यांच्या लग्नाची नेहमीं काळजी करी व जेव्हां तेव्हां त्यांची सोय लावण्याविषयीं तुकारामबोवांच्या मागें कटकट लावीत असे. एकेदिवशीं तिनें तुकारामबोवांपाशीं त्यासंबंधानें गोष्ट काढिली व त्याचदिवशीं लग्नतिथि होती. तुकारामबोवांनीं लागलीच बाहेर जाऊन तीन मुलें धरून आणिलीं व ब्राह्मणास बोलावून त्यांचा लग्नविधि उरकून टाकिला. दूधभात करवून जावयांस जेऊं घातलें व आपण जिजाबाईच्या कटकटींतून मोकळे झाले. हे जावई मोझे, गाडे व जांबूळकर या अस्सल मराठे घराण्यांतील होते. मोझे लोहगांवचे, गाडे एलवाडीचे व जांबूळकर जांबूळवाडीचे रहाणारे होत. हें महीपतींनीं आपल्या ग्रंथांत दिलेलें वृत्त जरा शंकास्पद वाटतें, कारण दुसऱ्या एकाठिकाणीं तुकारामबोवांनीं भिकारणीस लुगडें दिलें त्यावेळची हकीकत सांगतांना महिपती असें ह्मणतात कीं, ' गंगातान्ही अंगणांत खेळत होती, काशी व भागीरथी जाणत्या असल्यामुळें सासरीं गेल्या होत्या. ' यावरून या तिघी मुलींचीं लग्नें एकदम झालीं नसावीं असें दिसतें; आतां गंगाचें लग्न पाळण्यांतच लाविलें असल्यास न कळे!

तुकोबांचा भक्तिक्रम याप्रमाणें चालला असतां, बीडपरगण्यांतला देशपांडे या आडनांवाचा एक ब्राह्मण आपल्याला व्युत्पत्ति व्हावी ह्मणून दहा दिवस पंढरपुरीं श्रीविठ्ठलापुढें धरणें घेऊन बसला. दहा दिवसांनीं त्यास आळंदीस ज्ञानेश्वराकडे जाण्याविषयीं दृष्टांत झाला. त्याप्रमाणें त्यानें बारा दिवस ज्ञानेश्वराजवळ धरणें घेतलें. नंतर ' देहूस तुकोबारायांकडे जा ह्मणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील ' असें त्यास स्वप्न पडलें. त्यावरून तो देहूस आला. तेव्हां तुकाराम महाराजांनीं त्यास अकरा अभंग व एक नारळ दिला. त्या प्राकृत अभंगानीं व नारळानें त्याचें समाधान झालें नाहीं ह्मणून तें तसेंच तेथें टाकून तो निघून गेला. तो निघून गेल्यावर कोंडोपंत नांवाचा एक अज्ञानी पण भाविक ब्राह्मण तुकारामबोवांचे दर्शनास आला; तेव्हां त्यांनीं तो नारळ व तेच अभंग त्याला दिले. ह्या प्रसादापासून कोंडोबा व्युत्पन्न झाला इतकेंच नाहीं तर त्याला संपत्तिही प्राप्त झाली. कारण त्यानें तो नारळ फोडतांच त्यांतून उत्तम मोत्यें निघालीं! या नारळाविषयीं अशी दंतकथा आहे कीं, अमदाबादेस कोणी सावकार होता, त्यानें ज्ञानेश्वरास असा नवस केला होता कीं, माझी मनकामना पूर्ण झाल्यास मी लक्ष रुपयांचें जवाहीर समाधीला वाहीन. त्याप्रमाणें त्याची

इच्छा पूर्ण होतांच तो तें जवाहीर घेऊन आळंदीस आला. तेव्हां त्यास तें तुकारामबोवांपुढें ठेवण्याविषयीं दृष्टांत झाला. तुकारामबोवांची निरपेक्ष-बुद्धि सावकारास माहीत होती ह्मणून त्यानें नारळ कोरून त्यांत उत्तम मोत्यें भरून व तो बंद करून तुकारामबुवांपुढें ठेविला. त्याचदिवशीं घरीं करी ब्राह्मण आला त्यास व त्यानें अव्हेर केल्यामुळें त्याच्या मागून आलेला ब्राह्मण **कोंडोबा** यास प्रसाद ह्मणून तुकोबारायांनीं दिलेला नारळ हाच होय!

पुढें पुढें तर तुकोबारायांची कीर्ति इतकी पसरली कीं, यांस दूरदूरचे लोक व ब्राह्मणही पूज्य मानूं लागले व त्यांस नमस्कार करूं लागले; हें कांहीं विद्वान् परंतु पढतमूर्ख ब्राह्मणांस सहन होईना. पुण्याजवळ वाघोली नांवाचें एक लहानसें गांव आहे, तेथें रामेश्वरभट्ट नांवाचे एक व्युत्पन्न व वजनदार शास्त्री रहात होते. त्यानीं तुकारामबुवांना सांगितलें कीं, 'हीं वेदांतील वचनें त्वां लोकांस उपदेशावीं व कवित्व करावें असा तूं शूद्र असल्यामुळें तुला अधिकार नाहीं. हा अधिकार ब्राह्मणांचा आहे. अशानें तूं रौरव नरकास जाशील.' यावर तुकारामबोवांनीं त्यास नम्रपणानें विचारिलें कीं, 'यापुढें मी कवित्व करणार नाहीं व कीर्तन करून लोकांना वेद-वचनांचा उपदेशही करणार नाहीं, पण आजवर केलेल्या कवित्वाची काय वाट?' तेव्हां रामेश्वरभट्ट ह्मणाले, 'तें कवित्व नदींत बुडवून टाक.' नंतर तुकोबांनीं त्यांच्या सांगण्यावरून अभंगांच्या वह्या इंद्रायणींत टाकून दिल्या; पण त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांनीं तेरा दिवसपावेतों तोंडांत पाणी ह्मणून घातलें नाहीं. त्यांचें सर्वांग कृश होऊन डोळ्यांत प्राण उरला. तोंडावाटे फक्त श्रीविठ्ठलाचें नामस्मरण चाललें होतें. असो. त्या वह्या पुढें जशाच्या तशाच कोरड्या पाण्यावर तरंगतांना सांपडल्या; हें पाहून त्यांचें हृदय प्रेमानें उचंबळून आलें व त्यांच्या डोळ्यांवाटे प्रेमाश्रु वाहूं लागले. त्यांनीं याप्रसंगीं ईश्वराचे स्तुतिपर सात अभंग करून श्री विठ्ठलाचें मोठ्या प्रेमानें स्तवन केलें. हे अभंग फारच प्रेमळ आहेत. असो. ही वह्या कोरड्या निघाल्याची बातमी ऐकून रामेश्वरभट्टांची तळव्याची आग मस्तकास गेली असेल पण करतात काय? नाइलाज झाला. पुढें एकदां याच रामेश्वरभट्टांच्या अंगाचा अनगडशा नामक एका सिद्धपुरुषाचे विहिरींत स्नान केल्यावरून इतका दाह झाला कीं, त्यांच्या शिष्यांनीं अनेक शीतलोपचार केले तरी त्यांस चैन पडेना. त्यांचा जीव अगदीं कासावीस

होऊं लागला; तेव्हां त्यांच्या इच्छेवरून त्यांस त्यांच्या शिष्यांनीं आळंदीस नेलें. कांहीं दिवसांनीं श्रीज्ञानराजांनीं त्यांस स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, 'तुझ्या हातून भगवद्भक्त तुकाराम याची निंदा व छळ घडल्यामुळें तुझ्या अंगाचा असा दाह झाला आहे, तरी तूं त्यास शरण जा म्हणजे तूं या व्याधीपासून मुक्त होशील.' तेव्हां रामेश्वरभट्टांनीं अतिशय लज्जित व खिन्न होऊन आपल्या शिष्याबरोबर तुकाराममहाराजांकडे एक स्तुतिपर पत्र पाठविलें व झालेल्या अपराधाची क्षमा मागितली. तुकारामबोवांनीं तें पत्र साग्र वाचून पाहिलें व तें घेऊन येणाऱ्या शिष्याच्या तोंडून झालेली हकीकत ऐकिली. रामेश्वरभट्टांस पूर्ण पश्चात्ताप झालेला पाहून त्यांनीं एक अभंग त्या शिष्याजवळ लिहून दिला. शिष्यानें तो अभंग आळंदीस जाऊन रामेश्वरभट्टांस दिला. तो अभंग वाचून पाहतांच भट्टजींच्या अंगाचा दाह शांत झाला. ते तुकारामबोवांची ही निर्विकल्पवृत्ति पाहून अतिशय लीन झाले इतकेंच नाहीं तर पुढें मग त्यांनीं कुळ, विद्याभिमान, बायको, मुलें, संपत्ति, प्रतिष्ठा वगैरे सर्वांचा त्याग केला व तुकाराममहाराजांचें शिष्यत्व पत्करिलें.

लोहगांवचे लोक तुकाराम महाराजांच्या इतके भजनीं लागले होते कीं, त्यांना त्यांच्या कीर्तनापुढें दुसरें कांहींच सुचत नसे. एकदां तर असा चमत्कार झाला कीं एक गृहस्थ आपलें मरणोन्मुख झालेलें मूल तसेंच घरीं टाकून कीर्तनास गेले. पुढें कांहीं वेळानें तें मूल मेल्यावर त्याच्या आईनें तें आणून भरकथेंत तुकाराम महाराजांपुढें टाकिलें व ती त्या पुत्र दुःखाच्या भरांत त्यांना पुष्कळ दुरुत्तरें बोलली. तेव्हां तुकोबांनीं खालील अभंग म्हणून तें मूल उठविलें.

'अशक्य तों तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया १
मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ॥ २ ॥
थोर भाग्य आम्हीं समर्थाचे कासे । म्हणवितों दास काय थोडें ।३।
तुका म्हणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ४ ॥

याच लोहगावांत कासाराविहीर नांवाची एक विहीर होती. तिचें पाणी पहिल्यानें खारट होतें परंतु तींत तुकाराम महाराजांनीं स्नान केल्यापासून तिचें पाणी गोडें झालें; ती विहीर अद्याप या गांवीं आहे असें म्हणतात.

असो. तुकारामबोवासंबंधीचे अद्भुत चमत्कार शिवाजीमहाराजांचे कानीं पडल्यापासून त्यांस तुकाराममहाराजांचें दर्शन घेण्याची इच्छा झाली. ते

ह्यावेळीं अगदीं तरुण असून त्यांस साधुसंतांचीं दर्शनें घेऊन त्यांची कृपा संपादन करण्याची फार उत्सुकता होती. तुकाराममहाराजांचें दर्शन घेऊन त्यांची कांहीं संभावना करावी या हेतूनें त्यांनीं छत्री, घोडा वगैरे लवाजम्यानिशीं कारकुनाहातीं पत्र देऊन त्यांस आमंत्रण पाठविलें. तुकाराममहाराजांनीं त्या सरंजामाविषयीं अत्यंत निरपेक्षता दाखवून त्यांचा अव्हेर केला व शिवाजीमहाराजांस उत्तर ह्मणून पांच अभंग लिहून कारकुनाजवळ दिले. त्यांत त्यांनीं रामदास स्वामींचे ठिकाणीं दृढभाव ठेवा; आह्मी व ते एकच आहों. त्यांच्यापासूनच तुमचे मनोरथ सिद्धीस जावे असा नेमानेम आहे, ह्मणून तेथेंच चित्त ठेवा, असा उपदेश केला आहे.

तुकोबारायांची ही निरपेक्षता पाहून शिवाजीमहाराजांस त्यांस भेटण्याची अधीकच उत्कंठा लागली, ह्मणून ते एकेदिवशीं वस्त्रालंकारादि नजराणा घेऊन तुकारामबोवांचे भेटीस मुद्दाम लोहगांवीं आले. त्यांना पाहिल्याबरोबर शिवाजीमहारांनीं त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें व आपल्या हातांनीं त्यांच्या गळ्यांत तुळशी पुष्पांचे हार घातले, कपाळीं बुका लाविला व मोहरा ताटांत भरून त्यांच्यापुढें नजर ठेविल्या. त्याप्रसंगीं तुकाराममहाराजांनीं चार अभंग करून त्यांत, ‘ हें द्रव्य आह्मांला गोमांसासमान आहे, श्रीपांडुरंग हाच आमचा ठेवा व मायबाप आहे. त्यानें हें त्रिभुवन आमच्या हवालीं केलें आहे. आह्मांस येथें संपत्ति, सत्ता व शक्ति वगैरे सर्व कांहीं अनुकूल आहे. रामदासावर पूर्ण निष्ठा ठेवा ह्मणजे त्यांत आह्मांला संतोष आहे. ’ हें ऐकून शिवाजीमहाराजांस समाधान वाटलें व त्यांनी तुकाराममहाराजांस नजर केलेलें द्रव्य ब्राह्मणांस वांटूनटा किलें.

पुढें शिवाजीमहाराजांची तुकाराममहाराजांवर इतकी भक्ति बसली कीं, त्यांचें कीर्तन ऐकण्याची व दर्शन घेण्याची संधि मिळाली कीं, ते ती दवडीत नसत. एकदां तुकोबानीं ‘ विठ्ठल हाच ह्या जगांत मायबाप, आप्तसोयरा, बंधु, चुलता, सखा, मित्र, संपत्ति, मान वगैरे सर्व कांहीं आहे, त्याचें चिंतन करा, ह्मणजे भवसागर पार तरून जाल ’ ह्या विषयावर कीर्तन केलें. तें प्रेमळ कीर्तन ऐकून शिवाजीमहाराजांचे मनांत इतकें चमत्कारिक स्थित्यंतर झालें कीं, ते अंगावरील राजभूषणें काढून ठेवून अरण्यांत एकांतांत जाऊन बसले. दिवसां एकांतांत ईश्वरचिंतन करावें व रात्रीं तुकारामबोवांचें कीर्तन ऐकावें, असा त्यांनीं क्रम धरिला. जिजाबाईना अर्थात् शिवरायांच्या

मातोश्रींना हें वृत्त कळतांच त्या टाकोटाक तुकाराममहाराजांकडे आल्या व त्यांनीं त्यांची अशी प्रार्थना केली कीं, 'महाराज माझा हा एकुलता एक पुत्र असून त्याच्याही पोटीं कांहीं संतान नाहीं, तेव्हां हा राज्याचा गाडा शिवाजीवांचून दुसरा कोण हांकणार व त्याच्याशिवाय यवनांपासून प्रजेचें रक्षण तरी कोण करणार? तरी जेणेंकरून शिवबा स्वीकृत विरक्तीपासून परावृत्त होईल असा त्याला कांहीं उपदेश करा!' तुकाराममहाराजांनीं जिजाबाईंची ही करुणापर स्थिति पाहून त्यांना असें अश्वासन दिलें कीं, रात्रीं कीर्तनास महाराज आले असतां, त्यांस दोन गोष्टी सांगेन, तुम्ही स्वस्थ असावें. यावर रात्रौ शिवाजीमहाराज कीर्तनास आले असतां तुकारामबोवांनीं कर्मकांडाचें विवेचन केलें. 'मनुष्यानें, आपण ज्या कुळांत जन्मलों, त्या कुळाचा धर्म सोडूं नये. जसें ब्राह्मणानें आपल्या ब्रह्मकर्माप्रमाणें तसें क्षत्रियानें आपल्या क्षात्रधर्माप्रमाणें वागलें पाहिजे. आपलें क्षात्रियकर्म नीतीनें बजावून त्यांतच ईश्वरचिंतन केलें ह्मणजे जन्माचें सार्थक होईल.' सदरहु उपदेश ऐकून शिवरायांचें मन पुनः राज्यकारभाराकडे वळलें. त्यांनीं बोवांचे पायीं दंडवत घालून आपल्या राज्यभूषणांचा स्वीकार केला. निरोप घेतेवेळीं शिवाजीमहाराजांनीं, 'राज्य हातीं द्यावयाचें असल्यास भाकर व पोटीं पुत्र व्हावयाचा असल्यास नारळ ह्याप्रमाणें प्रसाद द्यावा,' अशी विनंति केल्यावरून तुकारामबोवांनीं भाकर व नारळ त्यांचे पदरांत घालून त्यांस वाटेस लाविलें.

एकदां तुकारामबोवा पुण्यास येऊन त्यांचीं नित्य कीर्तनें चाललीं होतीं, त्यावेळीं शिवाजीमहाराज सिंहगडीं होते. तेथून रात्रीं त्यांनीं कीर्तनास यावें व पहाटे परत गडावर निघून जावें असा क्रम ठेविला होता. ही बातमी चाकणचे किल्लेदारास लागल्यावरून त्यानें एके दिवशीं रात्रीं संधि साधून वाड्यास वेढा दिला व चहूंकडची नाकेबंदी केली. प्रसंग एवढा मोठा बिकट येऊन गुजरला होता तरी आंत कीर्तनाचा व नामघोषाचा सारखा गजर चालला होता. शिवाजी महाराज जात्या शूर, धाडसी व भाविक असल्यामुळें, त्यांनीं, एकादशीचें कीर्तन सोडून हलावयाचें नाहीं असा निश्चय केला व ते कीर्तन होईपर्यंत स्वस्थचित्तानें बसले. यावेळीं श्री पांडुरंगांनीं हें भयंकर संकट सहज आपल्या लीलेनें टाळलें. त्यांनीं असा चमत्कार केला कीं, शिवाजी महाराजांसारखा एक पुरुष घोड्यावर बसुन भरधांव घोडा फेंकीत समोरून निघून जात आहे, असा त्या पठाणास भास पाडिला. त्यासरसे ते

घाड्याचा वेढा उठवून गडबडीनें त्याच्यामागें लागले. असा चमत्कार इकडे झाल्याबरोबर सर्व मंडळींनें ईश्वराचे अनन्य भावानें आभार मानून स्तवन केलें व शिवाजी महाराज तुकारामबोवांची आज्ञा घेऊन सुरक्षितपणें सिंहगडास जाऊन पोहोंचले.

असो. असे तुकाराममहाराजांनीं अनेक चमत्कार केले. त्यांची सर्व प्राण्यांवर समदृष्टि असे. ते अत्यंत दयाळू व नम्र असत. त्यांनीं आपलें शरीर परोपकाराला अगदीं वाहिलें होतें. यापुढें लोक त्यांना साधुसंतांत गणूं लागले व त्यांची कीर्ति जगभर वाढली. रोज त्यांना कोठें ना कोठें मिष्टान्नाचें भोजन मिळूं लागलें. त्यांच्या दर्शनार्थ लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. ह्या असल्या लोकोपचारानें आपण कदाचित् भक्ति मार्गापासून च्युत होऊं, अशी त्यांना भीति वाटूं लागली; व त्यांना मृत्युलोकच्या वस्तीचा कंटाळा आला. आलीकडे त्यांचें चित्त उदास राहू लागलें व ते आपल्या भक्तीस लागलेल्या लोकांशीं विरक्तपणानें वागूं लागले. ते नेहमीं ईश्वराची प्रार्थना करीत कीं, ' पांडुरंगा आतां वैकुंठास न्या. ' त्यांनीं आतांशा कांहीं बोलणें झालें तरी अभंगांत बोलावें व कोणास कांहीं उत्तर देणें झाल्यास अभंगातच द्यावें असा क्रम धरिला. त्यांनीं विठ्ठल नामस्मरणांवांचून इतर बोलणें बोलावयाचें सोडून दिलें. त्यांनीं रात्रंदिवस नामसंकीर्तनावर धडाका चालविला, अशाप्रकारें त्यांच्या वृत्तींत इतका कांहीं फरक पडला कीं, त्यांना जणूं काय आपला अंतकाळ अगदीं जवळ येऊन ठेपला हें कळलेंच होतें. शके १५७२ फाल्गुन कृष्ण प्रतिपदेला त्यांनीं सर्व रात्रभर कीर्तन केलें. कीर्तनसमयीं विठ्ठलाचे ठिकाणीं त्यांचें इतकें प्रेम जडलें होतें कीं, त्यांस देहभान देखील राहिलें नव्हतें. आज वैकुंठास जाण्याची आपली पुष्कळ दिवसांची आवडती इच्छा पूर्ण करण्याकरिता पांडुरंग आपल्या समोर उभे आहेत, आपल्यास नेण्याकरितां विमान आलें असून देवगण आपली वाट पहात आहेत. अशातऱ्हेचा दृढभास त्यांना झाला. वैकुंठास जाण्याची आपली सर्व तयारी झाली व तेथलें अक्षय्य सुख भोगण्यास आपली बायको व भक्तमंडळी येईल तर बरें, असें मनात येऊन त्यांनीं त्याप्रमाणें सर्वांस बोलाविलें. जिजाईस हें खरें वाटलें नाहीं. तिनें त्यावेळीं असा निरोप पाठविला कीं,—

' मी पांच महिन्यांची गरोदर । घरीं म्हैस दुभती थोर ॥
पोरवडा लहान लेंकुरें । मागें संसार कोण करी ॥ १ ॥

त्यावरून तुकारामबोवांनी ‘ घरचे दारचे पांडुरंगाला भजा, वडिलांना माझा दंडवत सांगा ’ अशा आशयाचा अभंग ह्मणून सर्वांचा निरोप घेतला. त्यावेळीं ‘ तुकाराममहाराजांचा नित्य सहवास आपल्याला आतां अंतरणार ’ हें मनांत येऊन सर्वांनां अतिशय वाईट वाटलें. त्यांच्या निस्सीम भक्तांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तुकारामबुवा ह्या मंडळीसह भजन करीत करीत इंद्रायणीचे कांठीं आले व तेथें त्यांनीं निर्वाणीचे बावीस अभंग ह्मटले. या अभंगांतील तुकाराममहाराजांचे हृदयद्रावक उद्गार ऐकून मंडळीस अतिशय गहिंवर आला व कित्येक कोंवळ्या मनाचे भावीक लोक स्फुंदस्फुंदुन रडूं लागले. रामेश्वरभट्टांकडून महाराजांस विनंति करवून व त्यांचे पाय धरून त्यांचें ह्या लांबच्या यात्रेचें जाणें रहित करवावें, अशी कांहीं मंडळी विचार करीत आहे, तोंच तुकारामबोवा अदृश्य झाले. तो दिवस फाल्गून वद्य द्वितीयेचा होता. तुकारामबोवा नाहींसे झाले हें पाहून एकच अकांत झाला. जिजाबाई तर मोठमोठ्यानें ऊर बडवून घेऊं लागली. कांहींवेळानें सर्वांचा दुःखवेग कमी होऊन हा महापुरुष कदाचित् परत येईल या आशेनें तेथेंच संध्याकाळपर्यंत बसून राहिले; परंतु शेवटीं सर्वांची निराशा होऊन बहुतेक लोक रात्र पडल्यावर घरीं गेले. रामेश्वरभट्टादि चवदा निस्सीम भक्त ‘ महाराज दर्शन देतील तरच प्राण ठेवूं ’ अशा निर्धारानें तेथेंच राहिले. ह्याप्रमाणें ही मंडळी पंचमीपर्यंत निर्धारानें बसली. पंचमीचे दिवशीं सकाळीं तुकाराममहाराजांचा टाळ व गोधडी खालीं पडली. त्यावरून तुकोबा वैकुंठाला गेले अशी सर्वांची खात्री झाली व मग ते चवदा जण घरीं आले. नंतर तुकारामबोवांची प्रयाणतिथि कोणती धरावी ह्याविषयीं प्रश्न उत्पन्न झाल्यावरून ज्या दिवशीं त्यांची गोधडी व टाळ खालीं पडले, त्याच दिवशीं तुकाराममहाराज स्वर्गास गेले असा रामेश्वरभट्टांनीं निर्णय दिला. याप्रमाणें फाल्गुन वद्य ५ शके १५७२ रोजीं तुकारामबोवा आपल्या देहाचें सार्थक करून स्वर्गवासी झाले !

तुकाराममहाराजांच्या प्रयाणसमयीं जिजाबाई पांच महिन्यांची गरोदर होती हें मागें सांगितलेंच आहे. ती योग्यकाळीं प्रसूत होऊन तीस मुलगा झाला. त्याचें नांव नारायण असें ठेविलें. तो पुढें मोठा भक्तिमान् व धार्मिक निघाला. यांची वृत्ति पाहून शिवाजीमहाराज इतके संतुष्ट झाले कीं, त्यांनीं त्यांना देहू, किन्हई व एलवाडी ह्या गांवांची सनद करून दिली. त्याचे वंशज नारायणबुवा हे सध्यां तुकाराममहाराजांची गादी चालवितात.

तेही कीर्तन वगैरे करितात. ते आपल्या कुळांतील वंशपरंपरा चालत आलेला कुलधर्म यथास्थितपणें चालवीत आहेत; हें त्यांना अत्यंत भूषणास्पद आहे.

असो. तुकाराममहाराजांच्या कवितेबद्दल दोन शब्द लिहून आपण आतां त्यांचा निरोप घेऊं. त्यांच्या अभंगांची वाणी त्यांच्या गुणानुरूप होती. त्यांना ढोंगधत्तूऱ्यांचा अत्यंत तिटकारा होता म्हणून त्यांचें भाषण निर्भीड व खरें होतें. ते साक्षात्कारी होते तसें त्यांचें बोलणें प्रासादीक असे; आणि ते भावीक, प्रेमळ व दयाळू होते तशी त्यांची वाणी सकरुण, प्रेमळ आणि विनम्र होती. ते स्वभावानें नेहमीं आनंदी असत तशीच त्यांची वाणीही पण अत्यंत रसाळ आहे. त्यांची कविता साधी व चटकन् मनांत ठसणारी अशी आहे. थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थगांभीर्य आणण्याचा हातोटी त्यांना उत्तम साधली होती अथवा ईश्वरी साक्षात्कारानेंच त्यांच्याकडून कवित्व झालें तेंव्हां त्यांत अर्थगांभीर्य व प्रसाद यांची उणीव कोठून असणार ? त्यांनीं आपल्या अभंगांत भक्तिप्रेम, नीति, सदुपदेश व ढोंगपरिस्फोट यांचेंच बहुतकरून विवेचन केलें आहे. त्यांनीं आपल्या अभंगांत ठिकठिकाणीं लोकांना जो उपदेश केला आहे, त्यावरून त्यांचे मतलबाचे व्यवहार, द्रव्य व सुख मिळविण्याची हांव, परदुःखाविषयीं बेपरवाई वगैरे सर्व साधारण गोष्टी त्यांना मार्मिकपणानें समजत होत्या, परंतु अशातऱ्हेनें वागणाऱ्या लोकांविषयीं राग व द्वेष न बाळगतां त्यांना त्यांची कींव येत असे व अशा धर्म व नीतिभ्रष्ट लोकांस ताळ्यावर आणून भक्तिमार्गाकडे लावण्याचा त्यांचा नेहमीं प्रयत्न असे. ' ह्या महापुरुषाचे अभंग स्वानुभवस्फूर्तीनें रचलेले असल्यामुळें त्यांमध्यें स्वारस्य व प्रसाद पूर्णपणें भरलेला आहे. हे अभंग भक्तिपूर्वक जो वाचील व मनन करील त्याचें मन भक्तिमार्गाकडे वळल्यावांचून कधींही रहावयाचें नाहीं ! ह्या महाभगवद्भक्तानें इतर साधुवैराग्यांप्रमाणें जगाची काळजी व परवा न करितां केवळ स्वात्मोन्नतीच्या दृष्टीनें अरण्यांतील एकांतवास न स्वीकारितां सामान्य लोकांत लीनतेनें व निरपेक्षतेनें राहून त्यांची धार्मीक व नैतिक उन्नति करण्यांत आपलें आयुष्य वेचिलें, हा त्यांनीं आपल्यावर मोठाच उपकार करून ठेविला आहे आणि त्यांनीं उपदेशिलेल्या भक्तिमार्गाचें अवलंबन करून नीतीनें व सदाचरणानें ह्या जगांत आपण आपला अनिश्चित अथवा क्षणभंगुर काळ कोणत्याही स्थितींत आनंदानें घालविला म्हणजेच आपण त्या उपकाराचे उतराई होऊं ! आतां तुकाराममहाराजांच्या ब्रह्मीभूत झालेल्या आत्म्याची व त्यांच्या अमर व

अभंगवाणीची एकवार महाराष्ट्र कविवर मोरोपंतांच्या आर्यांनीच स्तवन व प्रशंसा करून हा बराच विस्तृत झालेला भाग आटोपता घेऊं;-

॥ आर्या ॥

" नरकांतुनि काढितसे; काढुनि बहु पतित, पादुकावाणी ।
तो गुरु कसा नव्हे हो ? ज्ञानांबुधि अतितपा तुकावाणी ॥ १ ॥
भक्तरसाचि मूर्त, असा कागिति बृहस्पतिशतक्रतु कयास ।
कीं वाटे भगवद्यश सुरभीपय अमृत तक्र तुकयास ॥ २ ॥
विमद, विराग, विमत्सर, तृप्ति सदा सुगुण हे तुकारामीं ।
ते कैंचे स्वर्गींच्या विविध विषयलाभ हेतुकारा मीं ॥ ३ ॥
ज्याचे अभंग लागति खलहृदया, जेंवि बाण रामाचे ।
ज्या पर वाद न मोहिति, शर जैसे ईश्वाराम कामाचे ॥ ४ ॥
भगवद्भक्ति कराया बहुजड जीवांसे जो तुका शिकवी ।
त्याच्या दुसरा धरणीवरि येईल कोण हो तुकासि कवी ॥ ५ ॥

---

## " तुकारामबुवांच्या अभंगांतील कांहीं वेंचे. "

( तुकोबांस त्यांच्या स्त्रीचें कठोर भाषण. )

१

मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
चालोनीया घरा सर्वसुखें येती । माझी तों फजीती चुकेचि ना । २ ।
कोणाची बाईल होवोनिया ओढूं । संसारीं काढूं आपदा किती ।३।
काय तरी देऊं तोडतील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ४ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवाया ढोर शेण नाहीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे रांड न करितां विचार । वाहूनिया भार कुंथे माथा ॥६॥

२

गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥
भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ २ ॥
खवळली पिसी । हाता झोंबे जैसी लांसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांठा ॥ ४ ॥

३

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥
उठितो तो कुटितो टाळ । अवघा मांडिला कल्लोळ ॥ २ ॥
जिवंतचि मेले । लाजा वाटोनिया प्याले ॥ ३ ॥
संसाराकडे । न पाहती ओस पडे ॥ ४ ॥
तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ५ ॥
तुका ह्मणे बरें झालें । घे गे बाइले लिहिलें ॥ ६ ॥

वरील प्रकारची जिजाबाईनें तुकारामबोवांची केलेली निर्भर्त्सना वाचून पुष्कळ वाचक तिला दोष देतील व अशा महापुरुषाला ती दुरुत्तरें बोलत असे ह्मणून त्यांना कदाचित् तिची चिरडही येईल, परंतु ती एक खरी साध्वी होती. तुकारामबोवांपासून तिला कोणत्याही प्रकारें सुख मिळालें नसून उलट दुःख व त्रासच होत असे! असें असतांही ती त्यांच्या पोटापाण्याची काळजी वाहून भांडार डोंगरावर तीन कोस भरउन्हांत चालत जाऊन भाकरी पोंचवीत असे, व ते जेवल्यावांचून अन्न ग्रहण करीत नसे. तिची पतिव्रताधर्माप्रमाणें तुकोबांचे ठिकाणीं निष्ठा व प्रेम होतें ह्याबद्दल शंका घेण्यास जागाच नाहीं. नवऱ्यानें संसारांतील आपला वाजवी भाग उचलावयाचा तो न उचलतां उलट बायकोनें मोलमजुरी करून व इकडून तिकडून मिळविलेलें धान्य वगैरे जिन्नस त्यानें अतिथि अभ्यागतांस द्यावे हें कोणत्या बायकोला पहावेल व हें कृत्य पाहून कोणत्या स्त्रीची सहनशीलवृत्ति ठिकाणावर राहील? तेव्हां अशा नवऱ्यावर प्रीति व निष्ठा ठेऊन राहिल्याबद्दल जिजाबाईची आमच्या मतें आपण तारीफच केली पाहिजे।

वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुडें घालून वाथयाला ॥ १ ॥
तेंवी शब्द ज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवुंनिया तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहितां नामाची साखर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥
तुका ह्मणे जळो जळो ती महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

अखिल जग ब्रह्ममय आहे व तें ब्रह्मही मीच आहें, अशा केवळ तोंडानेंच वेदांताच्या लंब्या लंब्या गप्पा झोंकणाऱ्या दांभिकांवर तुकारामबोवांनी हा चांगलाच कोरडा उडविला आहे! अशा दांभिकांबद्दल तुकारामबोवा ह्मणतात.

बसोनी थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें । ह्मणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहुनी खर । ह्मणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

परमेश्वर भक्तीचा भुकेला आहे. त्याची प्राप्ति करून घेण्याकरितां कर्माची व ज्ञानविज्ञानाची विशेष गरज नाहीं. ते ह्मणतातः—

कासया पाषाण पूजिती पितळ । अष्ट धातु खळ भावहीन ॥ १ ॥
भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियलें ॥ २ ॥
काय करिल जपमाला कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिशील कुशळ गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ५ ॥
तुका ह्मणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥ ६ ॥

सर्वांच्या निर्वाहाची काळजी वाहणारा तोच एक परमेश्वर आहे; तोच सर्वांना अन्न पाणी पुरवितो. आपली काळजी व्यर्थ आहे; अशा दृढ समजुतीनें त्यांनीं आपल्या बायकोच्या व मुलाबाळांच्या पोटाची काळजी केली नाहीं. अन्नाच्छादनासाठीं काळजी करणें व्यर्थ आहे अशाविषयीं तुकोबारायांनीं कित्येक अभंग केले आहेत.—

कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसीतो जगासी एकलाची ॥ १ ॥
फुटे तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयासी कोण घाली ॥ २ ॥
बाळा दुग्ध कोणी केलेंसें उत्पत्ति । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्याचें नांव विश्वंभर । करा निरंतर ध्यान त्याचें ॥ ५ ॥

२

हरीचिया दासा नाहीं भयचिंता । दुःख निवारिता नारायण ॥ १ ॥
नलगे वहाणे संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराय ॥ २ ॥
असो द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा सखा पांडुरंग । व्यापीयेलें जग तेणें एकें ॥ ४ ॥

तुकाराम महाराजांना निर्गुण परब्रह्माची पूर्ण ओळख झाली असून सगुण भक्तीमध्येंच विशेष गोडी व महत्व आहे असें त्यांचें मत होतें. कर्ममार्गाविषयीं त्यांना विशेष प्रीति नव्हती. सगुण मूर्तीची पूजा, नामस्मरण, भजन व ध्यान हाच भक्तिमार्ग विशेष श्रेयस्कर आहे असें त्यांचें मत होतें:—

हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥
हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ३ ॥
हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥४॥
हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ५ ॥
हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्य नेम नाम तुझें ॥ ६ ॥
हा माझा आचार हा माझा विचार ।हा माझा निर्धार नाम तुझें ७
तुका ह्मणे दुजें सांगायासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥ ८ ॥

पुढें त्यांची भक्ति इतक्या थराला गेली कीं त्यांना एका विठ्ठलाशिवाय दुसरें कांहीं दिसत नसे. त्यांना प्रत्येक अणुरेणूंत विठ्ठलाचीच व्याप्ति दिसत असे. विठ्ठल हाच बाप, विठ्ठल हीच माता, विठ्ठल हाच सखा व विठ्ठल हाच सोयरा इतकें मानण्यापर्यंत त्यांची मजल येऊन पोंचली होती:—

विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥ १ ॥
विठ्ठल अवघा मांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥ २ ॥
विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥ ३ ॥
विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥ ४ ॥

२

विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥ १ ॥
विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥२॥
विठ्ठल जागृतिस्वप्नसुषुप्ति । आन दुजें नेणती विठ्ठलेंविण ॥ ३ ॥
भूषण अलंकार सुखाचा प्रकार । विठ्ठलीं निर्धार जया नरा ॥४॥
तुका ह्मणे तेही विठ्ठलचि झाले । संकल्प मुराले दुजेपण ॥ ५ ॥

तुकारामहाराजांचीं मतें अद्वैतपर होतीं. ते हरि, हर, देवी, गणपति, वगैरे देवतांत भिन्नभाव मानीत नसत. ते सर्व विठ्ठलमय मानीत. जरी

त्यांच्या मनाला श्रीविठ्ठलाशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें तरी पण ते इतर देवतांची कधींही निंदा करीत नसत. ते ह्मणत.—

हरिहरा भेद । नाहीं नका करूं वाद ॥ १ ॥
एकएकाचे हृदयीं । गोडी साखरेचे ठायीं ॥ २ ॥
भेदकासी नाड । एक वेलांटीची आड ॥ ३ ॥
वाम सव्य भाव । तुका ह्मणे एकचि आंग ॥ ४ ॥

२

माया तेचि ब्रह्म ब्रह्म तेचि माया । अंग आणि छाया तयापरी ।१।
तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणांतळीं हारपते ॥ २ ॥
दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणीक ते अटी विचाराची ॥३॥
तुका ह्मणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणे जैसीं तैसीं ॥ ४ ॥

भक्ति ह्मणजे प्रेम. प्रेमाचीं भिन्न भिन्न स्वरूपें ह्या जगांत पुष्कळ दृष्टीस पडतात; उदाहरणार्थ पितापुत्र प्रेम, मातापुत्र प्रेम, प्रभुसेवक प्रेम, मित्रप्रेम, पतिपत्नी प्रेम इत्यादि. या सर्व प्रेमस्वरूपांत भिन्नता दिसून येते. प्रेमाच्या या सर्व प्रकारांत पतिपत्नीप्रेम श्रेष्ठ होय! या प्रेमस्वरूपाला 'मधुर' असेंही ह्मणतात. याच्यावर प्रेमाची पायरी नाहीं. ह्या जगांत प्रेमाचें जें काय अत्युच्च स्वरूप दिसून येतें तें ह्याचप्रकारचें; व मनुष्यास माहीत असलेलें विलक्षण प्रकारचें प्रेम तेंही हेंच होय! खरोखर! मनुष्याचा सारा स्वभाव बदलून टाकणारें, त्याच्या जिविताच्या प्रत्येक ओघांतून वाहत असणारें, त्यास भारून सोडणारें, त्याचें स्वरूपच फिरविणारें ह्मणजे घडींत त्यास नारायण बनविणारें, नाहीं तर निमिषार्धांत त्यास राक्षसी अवतार देणारें, असें—गुणकारी—प्रेम स्त्रीपुरुषांवांचून इतरत्र कोठें आढळेल काय? ह्या ईश्वरीप्रेमाच्या मधुर स्वरूपांत ईश्वर हाच आपला पति मानला जातो. आपण सर्व स्त्रियाच या जगांत आहोंत, पुरुष कोणीच नाहीं. ईश्वर हाच एक पुरुष होय, व तो एक पुरुष हाच आपणां सर्वांचा प्रियपति होय. पुरुष स्त्रीकडे व स्त्री पुरुषाकडे जें जें प्रेम लावते तें तें आतां सर्व ईश्वराकडे लागतें. आपले साधुश्रेष्ठ तुकोबारायही ह्या प्रेमस्वरूपाच्या अत्युच्च मधुरस्थितीलाच पोंचले होते असें त्यांच्या अभंगांवरून दिसून येतें. त्यांनीं ईश्वरसंबंधीं पति-'भरतार-' 'परपुरुष' अशीच भावना केली होती. ते ह्मणतातः—

आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेंकलीये ।१

रात्रंदीस मज पाहिजे जवळी । क्षण त्या निराळी न गमे घडी ॥२॥
नाम गोष्टी माझी सोय सांड आतां । रातले अनंता तुका ह्मणे ॥३॥

२

ह्याचि नेम आतां न फिरे माघारीं । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥१॥
घर-रिघीं झालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥
बळियाचा अंगसंग झाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥३॥

३

सर्व सुख आह्मीं भोगूं सर्वकाळ । तोडियलें जाळ मोहपाश ॥ १ ॥
याचसाठीं सांडीयलें भरतार । रातलों या परपुरुषापाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

'हे तुकाराममहाराजांचे अगदीं अखेरचे अभंग होत. हे अभंग सरतांच त्यांचें शरीर दिव्य व तेजःपुंज—केवळ ब्रह्मरूप—झालें. ह्यावरून त्यांची इहलोकची यात्रा संपली, तेव्हां त्यांच्या भक्तीचें किती उच्चस्वरूप होतें तें दिसून येईल.'

'सुखदुःखें हीं केवळ भौतिक दक्षिणोत्तर टोंकें होत. अमक्या ठिकाणीं सुखाचें अस्तित्व आहे ह्मणजे तितक्याच प्रमाणानें दुसरें कोठेंतरी दुःखाचें वास्तव्य, दृश्य किंवा अदृश्यरूपानें असलेंच पाहिजे. ज्याप्रमाणें अभावरूपानें विद्युद्वास्तव्य स्थापित झालें ह्मणजे स्पष्ट विद्युत्प्रादुर्भाव सिद्ध करण्याची अवश्यकता नाहीं, त्याचप्रमाणें सुखाच्या कल्पनेबरोबर दुःखाची कल्पना आलीच पाहिजे.' या बाबतींत तुकोबारायाचें असें मत आहे कीं,—

कंई वाहावें जीवन । कंई पलंगीं शयन ॥ १ ॥
जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥
कंई भोज्य नानापरी । कंई कोरड्या भाकरी ॥ ३ ॥
कंई बैसावें आसनीं । कंई पायीं अनवाणी ॥ ४ ॥
कंई उत्तम प्रावर्णें । कंई वसनें तींही जीर्णें ॥ ५ ॥
कंई सकल संपत्ति । कंई भोगणें विपत्ती ॥ ६ ॥
कंई सज्जनासी संग । कंई दुर्जनासीं योग ॥ ७ ॥
तुका ह्मणे जाण । सुखदुःख तें समान ॥ ८ ॥

'स्वभावाला औषध नाहीं किंवा जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं;' अशा दोन ह्मणी आहेत. यांचा अर्थ इतकाच कीं, मनुष्याचा मूळचा—नैसर्गीक—जो स्वभाव असतो तो कोणत्याही उपायानें पालटत नाहीं. प्रसंगोपात त्यांत जरी थोडकासा फेरफार झाला तरी तो निश्चित नसतो; संधि सांपडतांच तो आपलें पूर्वस्वरूप पुनः धारण करितो तुकारामबोवा ह्मणतात:—

आधीं होता वाघ्या । दैव-योगें झाला पाग्या ॥ १ ॥
त्याचा येळकोट राहीना । मूळ-स्वभाव जाईना ॥ २ ॥
आधीं होता ग्रामजोशी । राज्यपद आलें त्याशीं ॥ ३ ॥
त्याचें पंचांग राहीना । मूळ स्वभाव जाईना ॥ ४ ॥
आधीं होती दासी । पट्टराणी केलें तिसीं ॥ ५ ॥
तिचें हिंडणें राहीना । मूळस्वभाव जाईना ॥ ६ ॥
आधीं होता संतसंग । तुका झाला पांडुरंग ॥ ७ ॥
त्याचें भजन राहीना । मूळ स्वभाव जाईना ॥ ८ ॥

संसारांत जर वागावयाचें आहे तर आहारीं—व्यवहारीं भीड धरितां कामानये. भीड ही भिकेची बहीण आहे. जशास तसें वागावें हा उत्तम पक्ष. मनुष्यानें आपलें वर्तन नेहमीं पाण्याप्रमाणें ठेविलें पाहिजे. ठकाशीं ठकाप्रमाणें व साधूशीं साधूप्रमाणेंच वागणूक ठेविली पाहिजे. असें केल्याशिवाय व्यवहार सुरळीत चालावयाचा नाहीं. चांभाराच्या देवाची पूजा खेटरांनींच केली पाहिजे.—

पाया जाला नारू । तेथें बांधला कापूरू ॥ १ ॥
तेथें विचव्याचें काम । अधमासि तों अधम ॥ २ ॥
रुसला गुलाम । धणी करीतो सलाम ॥ ३ ॥
तेथें चाबराचें काम । अधमासि तों अधम ॥ ४ ॥
रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥
तेथें बटकीचें काम । अधमासि तों अधम ॥ ६ ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला । देव-पूजा नावडे त्याला ॥ ७ ॥
तेथें पैजारेंचे काम । अधमासि तों अधम ॥ ८ ॥
तुका ह्मणे जाती । जातीसाठीं खाती माती ॥ ९ ॥

खालील अभंगांत तुकोबारायांनीं आपल्या कर्मेंद्रियांस प्रार्थना केली आहे; ती प्रत्येकांनीं पाठ करून तशींच कर्में आपल्या इंद्रियांकडून करून घेतल्यास त्यांस त्याचें श्रेय मिळाल्याशिवाय रहावयाचें नाहीं.—

'घेई घेई माझे वाचे। गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
मना तेथें धांव घेई। राहीं विठोबाचे पायीं ॥ २ ॥
डोळे तुह्मी घ्यारे सुख। पाहा विठोबाचें मुख ॥ ३ ॥
तुह्मी आइका रे कान। माझ्या विठोबाचे गुण ॥ ४ ॥
तुका ह्मणे जीवा। नको सांडूं या केशवा ॥ ५ ॥

खालील अभंगांत तुकारामबोवांनीं भवरोगानें ग्रस्त झालेल्यांचें निदान करून त्यांना खालील औषध घ्यावयास सांगितलें आहे. हें औषध सांजसकाळ घेत गेल्यास तें गुण दिल्याशिवाय राहणार नाहीं.

'ब्रह्मरस घेई काढा। तेणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्यनाम विठोबाचें। आणिक वाचे न सेवी ॥ २ ॥
भव रोगा ऐसें जाय। आणिक काय क्षुल्लक ॥ ३ ॥
तुका ह्मणे नव्हे बाधा। आणिक कदा भूतांची ॥ ४ ॥

आतां तुकोबारायांच्या पदांपैकीं मासल्याकरितां दोन तीन पदें देवून हें प्रकर्ण पूर्ण करूं.—

पद.

पोटा पुरतें देईं। मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ धृ० ॥
पोळी साजूक अथवा शिळी। देवा! देईं भुकेच्या वेळीं ॥ १ ॥
वस्त्र नवें अथवा जुनें। देवा! देई अंग भरून ॥ २ ॥
देवा! कळणा अथवा कोंडा। आह्मां देई भुकेच्या तोंडा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां। नका करूं पाया परता ॥ ४ ॥

२

साजेल तेंची ल्यावें गळ्यानों पचेल तेंची खावें ॥ धृ० ॥
घरासी आले संत ह्मणुनी काय बोलुनी सीणवावे।
गोड ऊंस झाला ह्मणोनी काय मुळासकट खावें ॥
प्रीतीचा सोईरा आला ह्मणोनी काय बहुत दिवस राहावें।
गांवचा हाकिम झाला ह्मणोनी काय गांवच बुडवावें ।१।

आंगीं आली नौबती ह्मणोनी काय भलतेंच बोलावें ।
फुकट झाला हिरा ह्मणोनी काय कथील जोडावें ॥
भगवें केलें वस्त्र ह्मणोनी काय जनास मोंदावें ।
व्याजबट्टा घेतो ह्मणुनि काय मुद्दल बुडवावें ॥ २॥
परस्त्री सुंदर झाली ह्मणोनी काय बळेंच भोगावी ।
जिवलग मैत्र झाला ह्मणोनी काय बाईल मागावी ॥
सोन्याची सुरी झाली ह्मणोनी काय उरींच मारावी ।
मखमाल पैंजार झाली ह्मणोनी काय शिरींच मिरवावी ॥ ३ ॥
फुकट झाला हत्ती ह्मणोनी काय भलत्यानेंच घ्यावा ।
वडील भरला रागें ह्मणोनी काय जिवेंच मारावा ॥
कापुर झाला सवंग ह्मणोनी काय सेजेस लावावा ।
चंदन झाला शीतळ ह्मणोनी काय उगाळुनी प्यावा ॥ ४ ॥
संतगुरु सोयरा झाला ह्मणोनी काय आचार बुडवावा ।
सुंदर झाला दीप ह्मणोनी काय वळचणीस खोवावा ॥
नित्य भेटतो देव ह्मणोनी काय जनांत दावावा ।
दास तुका ह्मणे हरी हा गुप्तचि ठेवावा ॥ साजेल ॥ ५ ॥

३

पार्वतीवर । नमिला म्यां शिवशंकर ॥ धृ० ॥
शंभु कैलास शिखरीं । पार्वती आदिमाया सुंदरी
बैसुनी शंकराचे शेजारीं । जोडुनी कर ॥ नमिला ॥ १ ॥
गिरिजा पुसे शंकरासी । तरि मी काय होय तुह्मांसी
शंकर ह्मणे माता होशी । मी तुझा कुमर ॥ नमिला ॥ २ ॥
ऐकुनि बोलली गिरिजा । मी तरी तुमची आत्मजा
तुह्मी पिता शंभुराजा । माझें माहेर ॥ नमिला ॥ ३ ॥
बोलिला नंदी ते अवसरीं । ऐका ह्मणे त्रिपुरारी
गिरिजा शंकराची अंतुरी । तुह्मीं भ्रतार ॥ नमिला ॥ ४ ॥
बोलिले मग स्वामी कार्तिक । नंदि! तुह्मांसि काय ठाउक
गिरिजा माझी बहिणिची लेंक । भाचरूं थोर ॥ नमिला ॥ ५

बोले वीरभद्र आपण । तुह्मी लबाड चौघेजण
गिरिजा शंकराचि नहीस । नातें साचार ॥ नमिला ॥ ६ ॥
ब्रह्माविष्णु त्रिनयन । हे काय होती तिघेजण
तुका ह्मणे द्यावें निवडून । तुह्मीं चतुर । नमिला ॥ ७ ॥

वरील उतारे या छोटेखानी पुस्तकाच्या मानानें बरेच झाले असें वाटतें. तुकोबारायांच्या या अपार कवितासमुद्राचें मंथन करणें ह्मणजे काहीं लहानसहान काम नाहीं. तें करणें माझ्यासारख्या अज्ञानें काम नसून मोठमोठ्या विद्वानांचें आहे. तांदूळाच्या ढिगाऱ्यांतून तांदूळ कसे निवडून काढावयाचे किंवा श्रीतुकाराम महाराजांनीं ह्मटल्याप्रमाणें.—

'चंदनाचे हातपायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ।१।
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साखर अवघी गोड ॥२॥

तेव्हां साखरेच्या राशीतून गोड साखर ती कशी निवडून काढणार!



# रंगनाथस्वामी निगडीकर.

मन हें सर्व इंद्रियांत प्रमुख आहे. सर्व इंद्रियें याच्याच तंत्रानें चालतात. मनानें आज्ञा केल्यावांचून पाय एक पाऊलही पुढें टाकीत नाहींत, हात काम करीत नाहींत, रसना रस चाखीत नाहीं, कान ऐकत नाहींत, व डोळे इच्छित वस्तूंकडे वांकड्या दृष्टीनें पहात मुद्धां नाहींत. त्याचप्रमाणें मनुष्याकडून जीं कांहीं बरींवाईट कर्में घडतात तीं सर्व मनाच्या आज्ञेवरून चालतात. याप्रमाणें कर्तेकरवितें व सुखदुःखांचें मूळ जें मन त्या मनाला आपल्या ताब्यांत ठेवणें ह्मणजे आत्मसंयमन करणें हें प्रत्येक प्राणीमात्राचें कर्तव्यकर्म आहे.

आत्मसंयमन करण्याचें काम अत्यंत कठीण आहे. विश्वामित्रासारख्या महान् महान् तपस्व्यांनीं व दुसऱ्या पुष्कळ साधुपुरुषांनीं आत्मसंयमन करण्याकरितां आपापल्यापरी पराकाष्ठा केली; पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. कामक्रोधादि षड्रिपूंनीं त्यांच्या मनावर अखेर जय मिळविलाच. तात्पर्य इतकें सामर्थ्यवान् जें मन तें साध्य करणें मोठें दुर्घट आहे. मनावर जय मिळविणें ह्मणजे अगदीं दुर्जय व भयंकर अशा शत्रूंस पादाक्रांत करण्यासारिखेंच आहे. श्रीमद्भागवतांतही असाच अभिप्राय आहे. 'परोहि योगो मनसः समाधिः' ह्मणून सर्वत्रांनीं आस्ते आस्ते आपल्या उच्छृंखल मनोवासना आकळून करून आत्मसंयमन करण्याची संवय करीत असावें.

हा मनोरूपी डोंगर शमदमादि साधनें करूनही उतरून जाण्यास फार कठीण पडतो. याचे शिखरावर सनातन सच्चिदानंदरूपी, सर्व इंद्रियांनाही आपला प्रकाश देणारी स्वयंज्योति प्रकाशमान् झालेली असते. ज्ञान, ज्ञेय, ज्ञानगम्य या सर्वांचा वास तेथेंच. सारांशः स्वयंज्योतिः जो परमात्मा त्याचें स्थान हें हृदय ह्मणजे मनच आहे. अन्य वृत्तींपासून तें दूषित न होऊं देण्याची खबरदारी ठेवावी. तें शुद्ध व पवित्र अशास्थितींत राहिलें तरच स्वच्छ उदकांत दिसणाऱ्या सूर्यबिंबाप्रमाणें त्यामध्यें आत्मस्वरूप दृश्यमान् होईल. रामदास रंगनाथांसारख्या महात्म्यांनीं या मनोरूप वारूच्या पाठीवर विवेकाचे तडाके मारून त्याला अगदीं जेरीस आणिलें व त्याचें स्वरूप शुद्ध व पवित्र ठेविलें; ह्मणूनच त्यांना आत्मस्वरूप दृश्य झालें. या मनोवारूला आकळण्याचा मार्ग एकनाथांनीं फार उत्तमरीतीनें दाखवून दिला आहे. ते ह्मणतातः—

ओंव्या.

' मन जाय कामक्रोधापाशीं । विवेक धरूनि वोढि केशीं ॥
मन रिघतां निंदेपाशीं । विवेक त्याशीं बुकली ॥ १ ॥
मन ह्मणे विषमसुटी । बिवेक हाणे वैराग्य काठी ॥
मन धांवतां कल्पनेपाठीं । विवेक उठाउठी झोंटि धरी ॥ २ ॥
परदारा परधन । अभिलाषूं धांवें मन ॥
तेथेंहि विवेक पावोन । रणकंदन आरंभी ॥ ३ ॥
ऐसा मनविवेकाचा झगडा । गाऱ्हाणें आलें सद्गुरू पुढां ॥
तेणें करावया निजनिवाडा । अद्वैतवाडा कोंडिलें ॥ ४ ॥ '

' नाथांचा हा उपदेश किती नीतिपर आहे? प्रत्येक मनुष्य जर आपलें मन याप्रमाणें स्वाधीन ठेवून आत्मसंयमन करील तर त्याला ' नारायण ' व्हायला कितीसा वेळ लागेल ? वर सांगितलेल्या प्रकारानें आत्मसंयमन करून ' नर ' असून ' नारायण ' झालेल्यांचीं जीं काय थोडीं फार उदाहरणें आहेत त्यांपैकींच प्रस्तुत चरित्रनायकाचें एक आहे.

' रंगनाथाच्या पूर्वजांचें मूळ उपनांव खडके असें होतें. हें नांव त्याच्या पूर्वजांचें मूळ राहण्याचें ठिकाण जें खडकी नांवाचें गांव त्यावरून पडलें. खडकी हें गांव मोंगलाईंतील चौसाळें महालांत आहे. खडकी येथून पंधराव्या शतकांत राघोपंत खडके हे श्रीक्षेत्र पंढरपुराजवळ नाझरें या गांवीं राहण्यास गेले. राघोपंताच्या अंगची शिपाईगिरी व त्याचें अश्वविद्येचें ज्ञान पाहून यांस लोक विनोदानें खडके याच्या ऐवजीं घोडके असें ह्मणूं लागले. यांचे वंशज अजूनही आपलें आडनांव घोडके असेंच लावितात. '

' राघोपंत घोडके यांनीं नाझरें येथील देशपांडेपणाची वृत्ति विजापूरचे दरबारांतून संपादन केली. परंपरेनें ही वृत्ति याच वंशाकडे चालली. घोडके हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठ गोत्री ब्राह्मण; वरील वृत्ति संभाळून या कुटुंबांतील पुरुष विजापूर दरबारचीं शिपाईगिरीचीं कामेंही थोडींफार बजावी. '

' राघोपंताच्या मुलाचें नांव चंद्राजीपंत. या चंद्राजीपंतास दोन पुत्र होते. थोरल्याचें नाव नागेश व धाकट्याचें नांव दत्तात्रेय. दत्तात्रेयानें आपल्या उत्तरवयांत संन्यासदीक्षा धारण केली. दत्तात्रेयास एकच पुत्र होता; त्याचें नांव रंगोपंत. रंगोपंतास पुत्र चार; ( १ ) रामाजी, ( २ ) बोपाजी, ( ३ ) कृष्णाजी व ( ४ ) दत्तात्रेय. या पुत्रचतुष्टयापैकीं

द्वितीय पुत्र जो बोपाजी हाच प्रस्तुत चरित्रनायकाचा पिता; व चतुर्थ पुत्र जो दत्तात्रेय हाच प्रख्यात श्रीधरस्वामी नाझरेकराचा पितामह. बोपाजी-पंताच्या बायकोचें ह्मणजे रंगनाथाच्या आईचें नांव बयाबाई. बोपाजी-पंतानें कलबुर्ग्याजवळील कल्याण मठचे श्रीपूर्णानंदस्वामी यांचा अनुग्रह घेतला होता. बोपाजीस फार दिवस पुत्रसंतान नव्हतें; परंतु पुढें श्रीपूर्णा-नंदस्वामींच्या प्रसादानें त्यास तीन पुत्र झाले. थोरला यादव (जन्मशक १५३१) मधला रंगनाथ, (जन्मशक १५३४) व धाकटा विठ्ठल जन्मशक १५३८)'.

रंगनाथाचा जन्म शके १५३४ मध्यें मार्गशीर्ष शुद्ध दशमीचे दिवशीं रविवारीं झाला. यास लहानपणापासून दांडपट्टा वगैरे सर्व मर्दानी खेळांचा फार नाद असे; व घरची साधारण श्रीमंती असल्यामुळें याचे हे लाड सहजासहजीं पुरले जात. हा चौदा वर्षांचा झाला तेव्हां, याच्या लग्नाची आईबापांनीं सर्व तयारी केली; परंतु त्यानें लग्न न करण्याचाच हट्ट धरिला. आईबाप आपलें ह्मणणें ऐकत नाहींत असें पाहून त्यानें घराला रामराम ठोकला व मग तेथून निघून अरणूर, निरा—नरसिंगपूर वगैरे गांवांवरून तो श्रीक्षेत्र बदरिकाश्रमीं गेला; तेथें राहून त्यानें कांहीं दिवस योगसाधन केलें, मग तेथून तो परत देशीं येण्यास निघाला. घर सोडल्यापासून त्याचा सर्व थाट संन्याशाचा असे; परंतु परत देशीं येतांना वाटेंत टेहरी येथील राजानें याचा अनुग्रह घेऊन यास घोडा, हत्यारें, मंदील वगैरे अलंकार अर्पण केले. या वेळेपासून रंगनाथ हेच अलंकार लेवून मोठ्या थाटानें राहूं लागला. देशीं आल्यावर तो पंढरपूर येथें गेला. तेथें कीर्तन करीत असता त्याला त्याचे आईबापांनीं पाहिलें व ओळखून त्याची भेट घेतली आणि त्यास घरीं नाझरें येथें घेऊन गेले. कांहीं दिवस नाझरें येथें सर्व कुटुंबासह यथास्थित योगक्षेम चालू असता बोपाजीपंताचे मनांत असें आलें कीं, आपले तिन्ही आश्रम पूर्ण झाले, तरी आतां सर्वांच्या संमतीनें चतुर्थाश्रम धारण करून जन्माचें सार्थक करावें. याप्रमाणें सर्वांचा निरोप घेऊन बोपाजीपंत रंगनाथासह कल्याणमठीं श्रीपूर्णानंदस्वामींकडे गेले व तेथून त्यांच्या अनुमोदनानें,—

'ॐकारस्वरूपी कृष्णा जेथें । धन्य करहाटक क्षेत्र तें ॥
तेथें जावोनि पुत्रासहितें । आश्रम चतुर्थ संपादिला ॥ १ ॥'

श्रीकृष्णातटाकीं करहाटक (कऱ्हाड) त्यांत चतुर्थाश्रम घेतला व पूर्वाश्रमीचें

बोपाजीपंत नांव टाकून ते आपल्या देहास 'निजानंद' ह्मणवूं लागले. पुढें आपणही अद्याप कोणाचाच उपदेश घेतला नाहीं, तरी आतां आपला पिता जो निजानंद त्याचाच उपदेश घ्यावा असें मनांत आणून रंगनाथादि त्रिवर्ग बंधूंनीं निजानंदाचाच उपदेश घेतला. यापुढें पित्यानेंच पुत्रास उपदेशदीक्षा द्यावी हा क्रम ह्या कुटुंबांत चालू झाला. यानंतर ही पितापुत्रांची व गुरु-शिष्यांची जोडी कोठेंही त्रिरात्र न राहतां तीर्थयात्रा करूं लागली. याप्रमाणें हिंडत हिंडत कृष्णा व कोयना या नद्यांचे संगमावर आले असतां, लौकिक वाढून या नाशिवंत जगाची उपाधि कारण होते व परमेश्वराचे चिंतनांत अंतर पडतें असें जाणून निजानंदस्वामींनीं आपल्या चिरंजीवांच्या अनुमोदनानें त्या पवित्र जलप्रवाहांत जिवंत जलसमाध घेतली. ही गोष्ट शके १५६४ सालीं मार्गशीर्ष वद्य अमावास्येस घडली.

अशाप्रकारें वडील समाधिस्थ झाल्यावर रंगनाथ परत घरीं न येतां तसाच पुढें तीर्थयात्रा करीत हिंडूं लागला. एकेवेळीं तो कृष्णातीरीं जाव-याचे इराद्यानें निघाला असतां कोरेगांवचे वाटेवर त्यास निर्गुडीचें वन लागलें. या बनांतच एका ओढ्याचे कांठीं रंगनाथाचे घोड्याचा पाय रुतला व घोडा पुढें चालेना. हीच परमेश्वराची आज्ञा समजून रंगनाथानें तेथेंच मुक्काम केला व पुढें त्याच ठिकाणावर आपला मठ बांधिला. याच मठास **निगडीचा मठ** असें ह्मणतात; व या ठिकाणाला निर्गुणपूर अथवा निगडी ह्मणण्याचा सांप्रदाय पडला. या निगडी गांवापैकीं रंगनाथाचे वंशजास सालीना १५०० रुपयांचें इनाम उत्पन्न अजूनही चालू आहे.'

'रंगनाथास लहानपणापासून शिपाईगिरीचा पेशा फार मनापासून आवडे; व त्याचा थाट आमरणांत ऐश्वर्यसंपन्न असा असे. कोठेंही जाणें झालें तरी आपल्या 'निळ्या' घोड्यावर बसून कमरेला तरवार व बरोबर लंगोटबंद शिष्यसमुदाय घेऊन तो जाई येई. मठांत तर त्याचा थाट याहून ही श्रीमंतीचा असे.'

'**रंगनाथाचा** व **रामदास** स्वामींचा फार दाट परिचय असे; व ह्मणू-नच त्याची गणना श्रीरामदासपंचायतनांत केली जाते. रामदास पंचायतनांत (१) श्रीसमर्थ रामदासस्वामी परळीकर, (२) जयरामस्वामी वडगां-वकर, (३) रंगनाथस्वामी निगडीकर, (४) केशवस्वामी भागानगर-कर आणि (५) आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर या पांच सत्पुरुषांचा समावेश होतो. या सर्व पुरुषांच्या करवीं शिवकालीन महाराष्ट्रांत समर्थांनीं जी चेतना घडवून आणिली ती चेतना रंगनाथाच्या काव्यांत पदोपदीं दृष्टीस पडते.

रंगनाथासंबंधी अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. एकदां रंगोबा भागानगरास ( निजाम हैदराबादेस केशवस्वामींना भेटण्याकरितां गेले होते. त्यावेळीं त्या शहरांत एक सुस्वरूप नायकीण रहात असे. तिला चंदम्मा व भागम्म्या नांवाच्या दोन मुली होत्या. त्या परमसुंदर असून तारुण्याच्या अगदीं भरांत होत्या; तरी पण त्या अद्याप आपल्या पिढीजाद धंद्याला लागल्या नव्हत्या. एकेदिवशीं रंगोबांची स्वारी आपला सर्व राजकीय पेहे-राव चढवून व ' निळ्या ' घोड्यावर आरूढ होऊन शहरच्या राजमार्गा-वरून फेरफटका करीत असतां वर सांगितलेल्या विश्वयुवतींची दृष्टि त्यांच्याकडे गेली. आधींच रंगोबा जात्या सुंदर, त्यांत ब्रह्मचर्याचें अंगावर अपूर्व तेज चढलेलें व त्यांत पुनः राजकीय पोषाक केलेला मग त्या स्वरू-पाला काय पहावयाचें आहे ! ' एकनूर अदमी और दसनूर कपडा ' अशी एक म्हण आहे ती याच अर्थाची द्योतक आहे. असो. अशी ही रंगोबांची मदनतुल्य मूर्ति पाहून त्या अत्यंत कामातुर झाल्या; व त्यांनीं आपल्या आईजवळ हट्ट धरिला कीं, ' आम्हांला या पुरुषाशीं झुलवा लावावयाचा. ' ( वेश्या धंद्यांत पडण्यापूर्वी एका पुरुषासी विवाह लावीत असतात, त्यास झुलवा म्हणतात. ) ज्या आतां हातातोंडीं आल्या होत्या, ज्यांच्यावर त्यांच्या आईची सर्व मदार होती त्या आतां एका कफल्लक ब्रह्मचाऱ्याशीं झुलवा लावणार हें ऐकून त्या वृद्ध नायकिणीस काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. तिनें त्यांचें मन परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण त्यांत तिला यश आलें नाहीं. रंगोबानींही झुलवा लावण्यास अनुमोदन दिलें. सर्व तयारी झाली. श्रीसमर्थादि मंडळी येऊन दाखल झाली. चंदम्मा भागम्मा रंगोबापुढें हातांत पुष्पमाला घेऊन उभ्या राहिल्या. दोघींनीं त्यांच्या गळ्यांत हार घालण्यास हात वर करतांच रंगोबानीं त्यांच्या डोईवर आपले हात ठेविले. डोक्यावर हात ठेवतांच त्यांची ' ब्रह्मानंदीं लागली टाळी, कोण देहातें सांभाळी ' अशी स्थिति झाली. तो चमत्कार पाहून सर्वत्रांस परमाश्चर्य वाटलें. हात काढतांच त्यांची समाधि उतरली. त्याची कामवासना मावळली. पुढें रंगोबानीं त्यांना गुरुपदेश दिला; व त्यावेळे-पासून त्या त्यांच्या शिष्यिणी बनल्या.

' शिवाजीराजा प्रथम यांच्या भेटीला आला तेव्हां रंगोबा भगवीं वस्त्रें परिधान करून पलंगावर पहुडले होते. शिवाजी मठांत जाऊन पाहतो.—

' तंव स्वामींनीं भोजन सारून । तांबूल भक्षिला असे जाण ॥
मंचकावरी केलें शयन । पदसंवाहन होतसे ॥ १ ॥

उभयतां शिष्यिणी दोघीजणी । 'भागम्मा,' चंदम्मा लावण्यखाणी
पाय रगडिती प्रीती करोनी । जन्मांतरींच्या मेदिनी अप्सरा त्या २'

हा थाट पाहून राजास विस्मय वाटला. तेव्हां रंगनाथांनीं, 'जरी आपण हे भोग भोगतों तरी या भोगांनीं आपण बद्ध नाहीं व कोणतीही जडदेहाची उपाधि आपणास नाहीं,' अशी त्याची खात्री करून दिली.'

रंगनाथ आपले वयाचे ७२ वे वर्षीं शके १६०६ रक्ताक्षी संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य दशमीस प्रातःकाळीं समाविस्त झाले. यासंबंधीं पुढील श्लोक प्रसिद्ध आहे.—

'शाके तर्कखशास्त्रचंद्रसुमते रक्ताक्षि संवत्सरे ।
मार्गे कृष्णदिशातिथौ रविदिने प्रातःसतामग्रणी ॥
श्रीकृष्णातटसंनिधौ सुसमये श्रीनिर्गुणाख्ये पुरे ।
कैवल्यं गतवानकुंठितगतिः श्रीरंगनाथः सुधीः ॥ १ ॥'

रंगनाथ दत्तोपासक असून आनंदसांप्रदायी होता; ह्मणजे त्याचे पूर्वज चतुर्थाश्रमाचेवेळीं आपल्या नांवापुढें 'आनंद' हीं अक्षरें जोडीत असत. तो गुरुगीतेच्या अंतिम ओव्यांत ह्मणतो.—

'आनंदसांप्रदाय वंशोद्भव । माध्यंदिन शाखा अभिनव ॥
गुरुगीतेचा अनुभव । हृदयीं स्वयमेव प्रकटला ॥ १ ॥
सहज पूर्णनिजानंदें । रंगला तो साधुवृंदें ॥
श्रवण करावा स्वच्छंदें । ग्रंथ निर्द्वंद्व गुरुगीता ॥ २ ॥'

रंगनाथानें आपल्या गुरुपरंपरेसंबंधानें व सांप्रदायासंबंधानें खालील दोन श्लोक केले आहेत; ते असे:—

श्रीविष्णू, विधि, अत्रि, दत्त नमुनी भावें सदानंद हा ।
रामानंद, तथा मला प्रणमुनी गंभीर ज्ञाने पहा ॥
ब्रह्मानंद अवाप्तकाम सहजानंदान्वयें पूर्ण तो ।
वंदूं श्रीनिजरंग या जगनगीं दैदिप्यचिस्त्वर्ण तो ॥ १ ॥
'आनंदाख्य परंपरा गुरु नमूं श्रीदत्त.दीगंबरा ।
मुद्रा खेचरि, सिद्ध आसन मठोर्ध्वाम्नाय हा साजिरा ॥
बाला मुख्य उपासना, गुरुमठा कल्याण हें नाम हो ।
सच्छिष्यासि सुपूज्य हंसपिठिका श्रीरंग विश्राम हो ॥ २ ॥'

रंगनाथानें लोकोपकारार्थ पुष्कळ कविता केल्या; त्याची भाषा सुलभ असून मनांत ठसण्याजोगी आहे. त्यानें **गुरुगीता, रामजन्म, गजेंद्रमोक्ष, निजानंदसाधनें, सुदामचरित्र, शुकरंभासंवाद, पंचीकरण, मिथ्याभासस्वरूप, श्री एकाखडी ओंव्या, बद्धमोक्षविवरण, भानुदासचरित्र, योगवासिष्ठसार** वगैरे बरेच काव्यग्रंथ केले आहेत. हे सर्व ग्रंथ छापून प्रसिद्ध आहेत. या प्रकरणांखेरीज त्यांनीं बरींच स्फूट पदें व अष्टकें केलीं आहेत. यांशिवाय रंगनाथानें आणखीही बरीच रचना केली असावी, असा निगडीकरांचा तर्क आहे; परंतु दोनतीनवेळां अग्निप्रळयामुळें निगडी येथील मठांतील बरेच कागदपत्र जळाले, त्यांमध्यें ही सर्व कृति नाहींशी झाली. स्वामींच्या हस्ताक्षराचा नमुनाही हल्लीं उपलब्ध नाहीं.

वर निर्दिष्ट केलेले अध्यात्मिक ग्रंथ पारलौकिक नसून अनुभविक ज्ञानानें ओतप्रोत भरलेले आहेत. संत व कवि या नात्यानें बऱ्याच महाराष्ट्र कवींनीं त्यांची प्रशंसा केली आहे.

‘ ताता अंतरीं तूं श्रीरंग । सर्वोत्तमानें तुझा धरिला संग ।
रंगोबा नाझरकर अपंग । तुझे दयेनें पै जाला ॥ १ ॥ ’

देवदास.

‘ अज्ञानसिद्ध नाथ प्रसिद्ध । मुक्तेश्वर मैराळ सिद्ध ॥
मार्कंड रंगोबा प्रसिद्ध । ठाउका आहे संतासी ॥ १ ॥ ’

–सिद्धचैतन्य.

‘ ब्रह्मानंद स्वामींचा बंधु सत्य । नाम तयाचें श्रीरंगनाथ ॥
ज्याची कविता समस्त । अपारजन उद्धारिले ॥ १ ॥ ’

–श्रीधर.

लाजविलेचि निजयशें दुग्धाब्धितरंग रंगनाथानें ।
भक्तिज्ञानें ज्याची मति पोषी जेंवि अंगना थानें ॥ १ ॥ ’

मोरोपंत.

---

## रंगनाथाचे कवितेंतील कांहीं वेंचे.

खालील ओंव्यात रंगनाथानें मिथ्यामायास्वरूपाचें वर्णन केलें आहे.—

‘ मिथ्यामायेचें स्वरूप । सांगों जातां शब्द सोप ॥
नाहींच त्याचा प्रताप । वर्णितां संताप मानसीं ॥ १ ॥

गंधर्वनगरींचा भूपति । पुरुषार्थें विख्यात त्रिजगतीं ॥
भीष्मकन्या तयाप्रति । नोवरी निश्चिति नेमिली ॥ २ ॥
लग्न लागलें वाडें कोडें । सामग्री सिद्ध निज निवाडें ।
मृगजळाचे घातले सडे । कोल्हेरी घोड पालाणिले ॥ ३ ॥
चित्रतरूची शीतल छाया । खपुष्पगंधें हर्ष राया ॥
वंध्यापुत्र मंत्री तया । नाना उपचार जाणविती ॥ ४ ॥
वारयाच्या वळूनि वाती । भिजविल्या कूर्माच्या घृतीं ॥
खद्योत तेजाच्या दीप्ति । प्रकाश दिगंतीं न समाय ॥ ५ ॥
रज्जुसर्पाच्या श्रवणीं । घोष पडतां वाद्यध्वनी ।
दर्पणांच्या अमूप धनी । ब्राह्मण भूरिदानीं कुबेर झाले ॥ ६ ॥
इंद्रजाळींचे राय । गौरविले सहसमुदाय ॥
आजन्म्याची माय । विहीण स्वर्मी मिरवत ॥ ७ ॥
ऊर्णनाभीचे वस्त्रसंभार । वोडंबरीचे अलंकार ॥
अश्वशृंगाचे करभार । देऊनी नृपवर गौरविला ॥ ८ ॥
नपुंसकाचे पुत्र । चिरूंदें वर्णिती विचित्र ॥
सत्य नसतां ब्रह्मसूत्र । लग्न ऐसें लागलें ॥ ९ ॥
अमूप सामग्री वेंचिती । दिवसा अंधार जोखिती ॥
आंधळे पाहोन देती । थोटे घेती स्वहस्तें ॥ १० ॥
पांगुळ नटवे नाचती । मुके गायनें गाती ॥
बधिर श्रोते ऐकती । बोहला शोभती नोव्हरे ते ॥ ११ ॥
अश्वत्थपुष्पचूर्ण । माजी नभनीळिमा संपूर्ण ॥
एकत्र करितां पीतवर्ण । वस्त्रें शोभले वऱ्हाडी ॥ १२ ॥
पिळूनि मोतियांचें पाणी । वरी शिंपिती वऱ्हाडिणी ॥
दिगांबर वधुवरां भरणी । लग्नमंडपीं मिरवती ॥ १३ ॥
मिथ्या माया यापरी । रूपक करतां कवेश्वरीं ॥
व्यर्थ शिणवावी वैखरी । उदकमथन वावुगें ॥ १४ ॥
घाणा घालूनि वाळू । निरर्थक काय गाळूं ॥
अजागळस्तन पिळूं । आकाश कवळूं कासया ॥ १५ ॥

करितां सारासार विचार । विष्णुनामस्मरणसार ॥
सद्गुरुभजन निरंतर । वाचे उच्चार श्रीराम ॥ १६ ॥
विश्रांतीचें जन्मस्थान । सतरावियेचें स्तनपान ॥
करूनीयां सहज पूर्ण । निजानंद रंगावे ॥ १७ ॥ '

असंभाव्य वस्तूंचीं रूपकें योजून कवीनें मिथ्यामायास्वरूपाचें किती सुबोध विवरण केलें आहे हें स्वरूप ओळखून प्रत्येकजण जर सन्मार्गानें वागूं लागला तर त्याच्या मनोभुवनांत शांतीचें राज्य व आनंदाची कारकीर्द किती लवकर सुरु होईल ? परंतु असा दिवस उगवेल तो सुदीन ! ! !

' दरिद्र आधींची आधि । दरिद्र तें महाव्याधि ॥
दरिद्रें भ्रंशे बुद्धि । वेदविधि घडेना ॥ १ ॥
दरिद्रा परतें कांहीं । त्रिभुवनीं दुःख दुसरें नाहीं ॥
दरिद्रियाची विद्या तेही । कोणासी कांहीं रुचेना ॥ २ ॥
परस्परें दारा कुमर । कलह करिती निरंतर ॥
श्रवणीं सुखाचें उत्तर । न पडे, करकर सर्वदा ॥ ३ ॥ '

दरिद्री माणसांचें जिणें किती लज्जास्पद असतें, याचें वर्णन आतां निदान हिंदुस्थानांतील लोकांना तरी सांगावयास नको आहे !

' करें करावें हरिपूजन । किंवा करावें धर्मदान ॥
पडिलियां वापीं कूपांतून । कडे काढुन रक्षावें ॥ १ ॥
चरणाची हेचि करणी । दीनजन संरक्षणीं ॥
तीर्थ देवालय प्रदक्षणीं । हरीरंगणीं नाचावें ॥ २ ॥
लिंगाप्रति हा नियम । विध्युक्त पाणी–गृहणीं काम ॥
तेथेंही अधमोत्तम । करावा संभ्रम विवेकें ॥ ३ ॥
गुदें क्षरावें परिमित । शौचविधी शुचिष्मंत ॥
कर्मेंद्रियाची हे मात । ज्ञानेंद्रिया देत अवधारा ॥ ४ ॥
श्रवणें करावें सच्छास्त्र श्रवण । त्वचें स्पर्शावे हरिगुरुचरण ॥
चक्षुरिंद्रियें अवलोकन । घ्यावें दर्शन संतांचें ॥ ५ ॥
जिव्हे रामरसाचि सार । इतर रसीं अनादर ॥
घ्राणें होवोनि भ्रमर । निर्माल्य सुंदर सेवावें ॥ ६ ॥

दशेंद्रियें येणें रीती । नेमावीं अहोरातीं ॥
या वेगळी एक रती । ढळो कल्पांतीं नेणावी ॥ ७ ॥'

वर सांगितल्या प्रकारच्या कामांत जर दशेंद्रियांना गुंतवून ठेविलें तर जगांतील अनीतीचा व अनाचाराचा किती लौकर उच्छेद होईल बरें! ज्या घरांत, ज्या कुटुंबांत, ज्या देशांत व ज्या राष्ट्रांत आज लोक केवळ विमार्गी झाल्यामुळें दुःखाचे उद्गार, क्लेशाचे आक्रोश आणि यातनेचे हंबरडे ऐकूं येतात त्याच कुटुंबांत, त्याच घरांत, त्या देशांत व त्याच राष्ट्रांत, प्रत्येक प्राणिमात्रानें आपापल्या दशेंद्रियांना वरील प्रकारच्या सुकर्मांत घातल्यास जिकडे तिकडे आनंदीआनंद सुरू होईल यांत काय नवल!

श्लोक. [ सवाई. ]

' तूं अज, अव्यय, नित्य, निरामय, तूं सच्चिन्मय सौख्यनिधाना ।
हा जगडंबर भासत तद्वत बोधतरंग जळावरि नाना ॥
कुंडल किंकिणि नुपूर कंकण कांचन एक बहू अभिधाना ।
वेद वदे जगदंतर एक निरंतर, नातळसी भवभाना ॥ १ ॥
विश्वरूपा! अरुपा! अविकार! अनाम! असंग! अनंत अपारा।
शास्त्र पुराण विवाद सदा करिती, परि निश्चिति नेणति पारा ॥
विश्व तुझ्या स्वरुपीं परिकल्पित विद्वत वानिती विश्व अधारा ।
'नीति' वदोन सरे श्रुतिवाद न वाच्य अवाच्य वृथा श्रम सारा ।२।'

वरील श्लोकद्वयावरून रंगनाथाची भक्ति गौणि नसून श्रेष्ठ प्रकारची होती, व त्याचप्रमाणे त्याला सगुणभक्तीची विशेष आवडी नसून तो निर्गुणभक्ति करित असे, हें सिद्ध होतें.

ओव्या.

' गुरुचरणीं तीर्थ प्राशन । गुरु आज्ञा उच्छिष्ट भोजन ॥
गुरुमूर्तीचें अंतरीं ध्यान । गुरुमंत्र वदनीं जपे सदा ॥ १ ॥
गुरुसांनिध्य तो काशीवास । जान्हवी चरणोदक निःशेष ॥
गुरु विश्वेश्वर निर्विशेष । तारक मंत्र उपदेशितां ॥ २ ॥
गुरु चरणतीर्थ पडे शिरीं । प्रयागस्नान तें निर्धारी ॥
गयागदाधर सबाह्यांतरीं । सर्वांतरीं साधका ॥ ३ ॥

गुरुमूर्ति नित्य स्मरे । गुरुनाम जपे आदरें ॥
गुरुआज्ञा पालक नरें । नेणिजे दुसरें गुरुविना ॥ ४ ॥
गुरुस्मरण मुखीं राहे । तोचि ब्रह्मरूप पाहे ॥
गुरुमूर्ति ध्यानीं वाहे । जैसी कां हे स्वैरिणी ॥ ५ ॥'

वरील ओंव्यांत गुरुभक्तिचा माहिमा कवीनें किती बहारदार वर्णिला आहे. परंतु ही मोठी दिलगिराची गोष्ट आहे कीं, असले गुरु सध्यां फार दुर्मिळ झाले आहे.

पद

' सखया रंगा रंगवीं माझें मन, संशय तोडूनि जोडावें ॥ ध्रु० ॥
कोठें आहे तद्धाम? मायापुरीं । मायापुर कोठें तें? आत्मनगरीं ।
कैसा वर्ते सिद्ध तो? नटापरी । पुनर्जन्म आहे कीं ना? संसारीं ॥स०॥१॥
भक्त कोण? जो भूतदया वाहे । ज्ञानी कोण? जगचि मिथ्या पाहे ॥
कर्म कोण? निर्हेतुक होत आहे । कोण विद्वान? आपणां जाणताहे स० २
शूर कोण? कामादि संहारिले । मित्र कोण? धर्मासि वोडियलें ॥
थोर कोण? कीर्तीतें जोडियलें । नीच कोण आपणा बुडाविलें स० ३
सुख कोण? शांति ही, दुःख भ्रांति।हानि कोण? आपणा आपण विस्मृति
लाभ कोण? आपणाआपण प्राप्ति। रामदास निजरंगा आलिंगिती स०४
देवस्वरूप कोणतें? आहेपण । मायास्वरूप कोणतें? नाहींपण ॥
संतस्वरूप कोणतें? संतपण । निजानंद रंगला रंगीं पूर्ण ॥
सखया रंगा रंगवीं माझें मन, संशय तोडूनि जोडावें समाधान ॥ ५॥

वरील पद्यांतील प्रश्न कितीतरी मार्मीक आहेत व त्यांचीं उत्तरेंही पण कवीनें तितकीच बहारीचीं दिलीं आहेत. प्रत्येक प्रश्नोत्तरांत कवीनें आपला अनुभव प्रकट केला आहे प्रत्येकानें आपल्या मनास हे प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरेंही पूर्ण विचारांतीं स्वतःच देण्याचा जर प्रयत्न केला तर त्यांना त्यापासून कितीतरी फायदा होईल !

२

' बापा तें नोहे, तें नोहें । व्यर्थचि श्रमि कां व्हावें ॥ ध्रु० ॥
साधुनि आसन मुद्रा, । शब्दज्ञाना बोलति क्षुद्रा ॥ बापा० ॥ १ ॥
नवरस करूनि कवि । पोटासाठीं सोंगें दावी ॥ बापा० ॥ २ ॥

ह्मणती काळें पिवळें । दाबुनि धरिती बळकट डोळे ॥ बापा०॥ ३ ॥ बळेंचि शिष्य करिती । विशाळयंत्रातें पसरिती ॥ बापा० ॥ ४ ॥ व्यर्थचि टिळा टोपी । समाधि ह्मणुनि जाती झोंपी ॥ बापा०॥५॥' निजरंगीं रंगलें.। रंगुनि रंगपणा मावळलें ॥ बापा तें नोहे, तें नोहे,॥ व्यर्थचि श्रमि० ॥ ६ ॥

'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' या एका चरणांत समर्थांनीं जो उपदेश केला आहे तो रंगोबांच्या वरील पद्यांत कसा अगदीं तंतोतंत उतरला आहे ! रंगोबांना नुसता बोलका ब्रह्मवादीपणा आवडत नसे याचेंच हें वरील पद्य द्योतक आहे !

रंगोबाचे कनिष्ठ बंधु विठ्ठल ऊर्फ अत्यास्वामी हेही कविता करीत असत. त्यांची कविता 'श्रीरंगानुज' या नांवानें चिन्हित झालेली आहे. त्यांची कविता फारशी उपलब्ध नाहीं तरी पण अलीकडे त्यांनीं केलेली संत-स्तवनात्मक एक भूपाळी सांपडली आहे ती अत्यंत प्रेमळ आहे.—

भूपाळी.

'उठि, उठी बा पुरुषोत्तमा । भक्तकामकल्पद्रुमा ॥ आत्मारामा ॥ निजसुखधामा । मेघश्यामा । श्रीकृष्णा ॥ १॥ भक्तमंडळी महाद्वारीं । उभी तिष्ठती श्रीहरी ॥ जोडोनिया उभयकरीं । तुज मुरारी पहावया ॥ ॥२॥ सुरवर, सनकादिक, नारद । व्यास, वाल्मिक, ध्रुव, प्रल्हाद ॥ शुक, बिभीषण, रुक्मांगद । हनुमान, अंगद, बळिराज ॥ ३ ॥ रिक्त पाणी न पश्यति; " । घेउन आले सुखसंपत्ति ॥ ह्मणोनि तुजलागीं सांगती । नाचति, गर्जति आनंदें ॥ ४ ॥ आला माणकोजी बोधला। जगन्मित्र नागा आला ॥ जोहार करी चोखामेळा । ऊठ घननीळा, लवकरी ॥ ५ ॥ उठोनि प्रातःकाळीं । विठ्ठल, विठ्ठल हाका मारी ॥ सेना न्हावी उभय करीं । दर्पण घेऊनि तिष्ठतसे ॥ ६ ॥ झाला प्रातःकाळ, जाण । करीं पंचांग श्रवण ॥ आले मुद्गलभट ब्राह्मण। आशीर्वाद घे त्यांचा ॥ ७ ॥ तुझा नामदेव-शिंपी । घेउनि आला आंगडेंटोपी । आतां नको जाऊं झोंपी । दर्शन देई निजभक्तां ॥८॥ आला नरहरि सोनार । घेउनि नाना अलंकार ॥ आला रोहिदास चांभार । जोडा घेउन तुजलागीं ॥ ९ ॥ सुगंध सुमनें पुष्पांजळी ।

घेउनि आला सावता माळी ॥ ह्मणतो, श्रीहरि चरण कमळीं । अनन्य भावें समर्पूं ॥ १० ॥ गुळखोबरें, भरोनि गोणी । घेउनि आले तुकोबा वाणी ॥ त्यांच्या वह्यांलागीं पाणी । लागूं दिलें नाहीं त्वां ॥ ११ ॥ मिराबाई तुजसाठीं । दूध, तूप भरोनि वाटी ॥ तुझ्या लावावया ओठीं । लक्ष धरोनि बैसली ॥ १२ ॥ कान्हो-पात्रा नृत्य करी । सुरदास गायन करी ॥ कर्माबाई खिचडी भरी । उभय करीं पातली ॥ १३ ॥ हरिभजनाविण वायां गेले । ते नर-देही बैल झाले ॥ गोऱ्या कुंभारें आणिलें । खेळावया तुजलागीं ॥ १४ ॥ कृष्णाबाई तुज कारणें । सर्व कर्म कृष्णार्पण ॥ श्रीरंगा-तुज शरण ॥ अनन्य भावें होतसे ॥ १५ ॥'

श्रीविठ्ठलाला एकाद्या श्रीमंताचें तान्हुलें कल्पून, त्याच्या सेवेप्रीत्यर्थ धंद्याच्या व जातीच्या मिषानें वरील संतांना व संतिणींना कवीनें विठो-बाच्या महाद्वारीं एकदम आणिलें आहे! आतां कवीनें कंठशोष करून जो एक दृढनिश्चय करावयास सांगितलें आहे तोच सर्व वाचकांना करावयास सांगून हा भाग आटोपूं.

पद.

'आतां वसुधातळहि बुडो । वरि हें नभमंडळहि पडो ॥ ध्रु० ॥ निश्चय कीं निजराम स्मरावा । हा सहसा न खुडो ॥ वरि हें० ॥१॥ शेवटील पाळी । येणें गोड करूं समूळीं ॥ आन उपाय नसे या काळीं, ध्यावा वनमाळी ॥ वरि हें० ॥ २ ॥ जन ह्मणो वेडे । परि मी न पाहें त्यांच्याकडे ॥ साधन तें साधावें ऐसें, परमपद जोडे । वरि हे० ॥ ३ ॥ असेल प्रारब्धीं, तरि हें न चुके कर्म कधीं ॥ मृग-जळास्तव क्लेशी होणें । विषम हे बुद्धि ॥ वरि हें० ॥ ४ ॥ उरलें असेल करणें, भवनीं लावावें करणें ॥ लक्ष चौऱ्यांयशीं जन्माचें, येथें संकट निस्तरणें ॥ वरि हें० ॥ ५ ॥ सहज पुणे निजरंगा, भज-वरि, करिं गा अनुकंपा । पूर्ण कृपें अवलोकुनियां, मज पावनपथ सोपा ॥ आतां वसुधातळहि बुडो । वरि हें नभमंडळहि पडो ॥

---

# वामन पंडित.



प्रापंचिक गोष्टींविषयीं निरंतर विचार करणें इतकेंच मनुष्यमात्राचें कर्तव्य नसून पारमार्थिक गोष्टींविषयीं विचार करणें,—ज्या दयाघन सच्चिदानंद परमेश्वरानें हें अखिल विश्व निर्माण केलें, त्याची ओळख करून घेणें, आत्मज्ञान संपादणें—हेंच त्याचें खरें व महत्वाचें कर्तव्यकर्म आहे. तें ज्यांनीं बजाविलें, इतकेंच नव्हे तर शेंकडों लोकांस सन्मार्गास लाऊन कर्तव्यरत केलें अशा आत्मानात्म विचारी ब्रह्मनिष्ठांची योग्यता अद्वितीय आहे. तेव्हां अशा सत्पुरुषांचीं चरित्रचित्रें अवलोकन करणें व त्यांनीं उपदेशिलेल्या मार्गाचें अवलंबन करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्यकर्म आहे. प्रस्तुत चरित्राचे नायक जे वामनपंडित तेही अशाच प्रकारचे अलौकिक पुरुष असून त्यांच्या साधुत्वाची व कवित्वाची कीर्ति आज सर्वत्र दुमदुमत आहे.

वामनपंडित हे कोठील राहणारे हें नक्की सांगतां येणें कठीण आहे, कारण हें समजण्यास त्यांच्या ग्रंथांत कोठेंच आधार नाहीं. ते कोरेगांव कुमठे येथील रहाणारे असें हनुमंतस्वामी ह्मणतात; व सर्व चरित्रकारांनीं त्यांचाच अनुवाद केला आहे. डॉक्टर बुइल्सन आपल्या मराठी वरील निबंधांत ' कोल्हापूर ' हें पंडिताचें मूलस्थान असें लिहितात. नवनीतांत किंवा कविचरित्रांत त्यांच्या मातापितरांविषयीं व अध्ययनाविषयीं वगैरे कांहींच माहिती दिली नाहीं. महाराष्ट्रिय जनांत त्यांची जी आज प्रसिद्धी आहे ती केवळ त्यांच्या रसाल, कोमल व यमकानुप्रासालंकृत श्लोकरचनेवरूनच आहे, व याची साक्ष.—

' सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ॥
ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥ ॥

ही रा. रामचंद्रपंत बडव्यांची आबालवृद्धांचे तोंडीं असलेली आर्यगीतीच देत आहे. नवनीतकार व कविचरित्रकार एवढीच माहिती देतात कीं, ' पंडित हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण होते. त्यांनीं काशीस शास्त्राध्ययन केलें व वादविवाद करून पुष्कळ पंडितांस जिंकिलें. प्रथम त्यांनीं संस्कृत कविता बरीच केली; पण पुढें त्यांस पश्चाताप होऊन रामदासस्वामींचे सांगण्यावरून त्यांनीं लोकोपयोगी मराठी ग्रंथ करण्यास आरंभ केला. त्यांची कविता गंभीर आणि रसभरित आहे; त्यांचे कवितेंत यमकें फार ह्मणून त्यांस समर्थ ' यमकग्या

वामन ' ह्मणत असत' ' नवनीतकारांनीं पंडितांची ही जी माहिती दिली आहे ती हनुमंत स्वामींच्या रामदासी बखरीवरूनच घेतलेली आहे.

वास्तवीक पाहतां पंडितांचें कुलवृत्त व जीवनवृत्त समजण्याला चांगलेंसें व विश्वासार्ह असें साधन नाहीं. नाहीं ह्मणायला संतविजयांत एक व हनुमंतस्वामीकृत रामदासी बखरींत दोन अशा एकंदर तीन आख्यायिका त्यांच्याविषयीं उपलब्ध आहेत. त्या येणेप्रमाणेः—

' वामनपंडित काशींत बारा वर्षें अध्ययन करून दक्षिणेंत येत असतां वाटेंत हजारों पंडितांशीं वाद करून त्यांनीं जयपत्रें मिळविलीं. अखेर ते आळंदीस आले. तेथें इंद्रायणीचे तीरीं त्यांस एक ब्रह्मराक्षस ब्राह्मणवेषानें भेटला व त्यानें सांगितलें कीं, हा वादाचा प्रकार तुह्मी असाच चालवाल तर माझ्यासारखेच पापयोनीला जाऊन ब्रह्मराक्षस व्हाल; तर तुह्मी तुकारामबोवांस शरण जाऊन त्यांची कृपा संपादा ह्मणजे पापमुक्त व्हाल. तेव्हां ब्रह्मराक्षसाचे सांगण्यावरून पंडित तुकारामाकडे गेले व त्यांनीं उपदेशाची याचना केली; परंतु ' आह्मीं शूद्र, आह्मांस उपदेश करण्यास अधिकार नाहीं; " असें सांगून बोवांनीं पंडितांना श्रीसमर्थांकडे फेटाळलें. रामदासांनीं त्यांना बदरिकाश्रमीं जाऊन, तप करून ईश्वरीकृपा संपादण्यास सांगितलें. पंडितांनीं बदरिकाश्रमीं बारा वर्षें हिऱ्याळीच्या मुळ्यांचा रस पिऊन तपाचरण केलें; परंतु भगवंत भेट देईनात, ह्मणून ते वैतागून जेव्हां प्राणहत्या करण्यास सिद्ध झाले, तेव्हां त्यांना चतुर्भुज मूर्तीचें साक्षात् दर्शन घडलें. परंतु भगवंतांनीं पंडितांना उपदेश देण्याचें नाकारिलें व ते ह्मणाले, ' आपण उपदेश करूं शकत नाहीं तें काम साधूंचें आहे. रामदासांसच गुरु करून त्यांच्या सांगण्याप्रमाणें वागा. " तेव्हां पंडितांची पुन्हां पायपिटी सुरू झाली. रामदासांकडे आल्यावर पंडितांस पुन्हां सांगण्यांत आलें कीं, " आपण श्रीशैल पर्वतावर अवधूतमूर्तीचें दर्शन घेऊन आपली इच्छा पूर्ण करून घ्यावी. " पंडितांनीं शैलपर्वतावर जाऊन अवधूतांचें दर्शन घेतलें, परंतु समाधिकाळ जवळ येऊन ठेपल्यामुळें, अवधूतांनीं पुनः रामदासांवर हवाला देऊन पंडितांना पाठवून दिलें. ही अखेरची हुंडी मात्र पटली व पंडित, रामदास शिष्य बनले.

( २ ) " एक दिवस पंडित व रामदास यांमध्यें चवदा ब्रह्मांसंबंधानें वाद लागला, चौदा ब्रह्में पंडितांनीं स्थापावीं व समर्थांनीं उडवावीं, असें अनेकवेळ झालें. पंडिताचा निःसंशय होईना व वाद कांहीं मिटेना. तेव्हां

समर्थांनीं मारुतिरूप धारण केलें व भु भुःकार करून व शेपटाचा तडाका देऊन पंडितांना दडवून विचारिलें " वामना! समस्या पूर्ण झाली कीं नाहीं ? " वामनानें गांगरून 'होय' ह्मणून सांगितलें. तेव्हां पूर्वीचें सौम्य रामदासीरूप धरून समर्थांनीं पुन्हां तोच प्रश्न केला; तेव्हां पंडितांनीं 'नाहीं' हा सरळ जबाब दिला. अखेर समर्थांनीं पंडितांचीं उंटाचीं उंट पुस्तकें, भाराभर जयपत्रें आणि अकटोविकट ग्रंथावलोकन यासंबंधानें मर्मभेदक उद्गार काढून, " बृहदारण्यांत चौदा ब्रह्मांची स्थापना करून उठविण्याचा प्रकारही आहे तो पहा, " ह्मणून सांगितलें. तेव्हां पंडितांचें समाधान झालें. नंतर समर्थांनीं पंडितांस प्राकृत काव्य रचण्याचा उपदेश केला व पंडितांनींही संस्कृतांत समर्थांची मनसोक्त स्तुति केली; ती हनुमंतस्वामींनीं दिली आहे. पुढें पंडितांनीं यथार्थदीपिकादि बारालक्ष ग्रंथ लिहिला व त्यांतील सुंदर यमकें पाहून समर्थांनीं त्यांस 'यमक्या वामन' हें नांव ठेविलें."

( ३ ) " अवधूतमूर्तीचें दर्शन घेऊन पंडित समर्थांकडे येत असतां वाटेंत एकदां स्वयंपाक करीत होते. त्यांची पत्नी गिराबाई बरोबर होती, परंतु ते मध्वसंप्रदायी वैष्णव असल्यामुळें तिच्या हातचें जेवीत नसत. चुलीवर भांडें ठेविलें असतांना, पंडित सच्चिदानंदपदाचा विचार करण्यांत इतके गढून गेले कीं, चुलीवरून भांडें ढळलें हें त्यांचे लक्ष्यांत आलें नाहीं. तेव्हां गिराबाईला हंसू आलें. त्यावर 'हंसलीस कां?' ह्मणून पंडितांनीं विचारिलें. तेव्हां गिराबाई ह्मणाली, " तीन वेदांचा अद्याप विचार करीत आहां ह्मणून हंसलें. " हें ऐकतांच पंडितांनीं तिला आलिंगन दिलें व ह्मणाले, 'तूं माझी पत्नी आहेस ह्मणून वंदन करीत नाहीं. नाहींतर वंदनच केलें असतें.' नंतर तिच्या सूचनेवरून अवधूताज्ञेप्रमाणें पंडित लवकरच समर्थांकडे उपदेशास्तव आले. त्यावेळेपासून पंडित स्वस्त्रीच्या हातचें जेवूं लागलें."

आतां सदरहु कथानकांना पंडितांच्या ग्रंथांत कोठें आधार सांपडतात कीं काय पाहूं. ब्रह्मराक्षसाच्या गोष्टीचा पंडितांनीं आपल्या ग्रंथांत कोठेंच उल्लेख केला नाहीं; नाहीं ह्मणायाला 'अनुभूतिलेश' ग्रंथांत या गोष्टीशीं जुळणारा थोडासा भाग आहे पण तो या गोष्टीहून फारच भिन्न आहे. या ग्रंथांत पंडीत असें सांगतात कीं,—आपल्या मनाला असमाधान उत्पन्न होऊन आत्मोपदेशासाठीं आपण अनेक गुरु पाहिले व संस्कृत आणि प्राकृत असे विविध ग्रंथ वाचिले.—

त्या श्लोकांचें साम्राज्य वामनकृत भाषांतर.—

गुरुत्वाकारणें म्यां या भूतळीं बहु सेविले ॥
आत्मोपदेशसमर्थी आचार्यत्वें न मानिलें ॥ १ ॥
एवं संस्कृतशास्त्रज्ञ प्राकृत ग्रंथवित्तम ।
अद्वैतत्त्व बोलाया सेविल म्यां बहुत ते ॥ २ ॥
वर्षशताचिया पूर्वीं प्राकृतग्रंथकार जे ।
त्यक्तदेही जे यथोक्त न तैसे ज्ञानि प्रस्तुतीं ॥ ३ ॥
होतां निराश, ज्ञानातें नच भूतलिं जाणता ।
संगमीं सित असित सिद्धान्त तनु त्यागणें ॥ ४ ॥ '

यावरून पंडित तुकाराम, रामदास इत्यादि साधुसंतांकडे गुरुपदेशासाठीं गेले होते व त्यांना या पृथ्वीवर खरें खरें अद्वैतज्ञान करून देणारा गुरु कोणीच न भेटल्यामुळें शेवटीं ते निराश झाले व त्यांनीं गंगायमुनासंगमांत देहत्याग करण्याचा निश्चय केला होता हें उघड आहे व एवढाच काय तो भाग वरील कथानकांतील हकीकतीशीं जुळतो. परंतु 'नुसतेंच भगवद्दर्शन झालें, पण उपदेश झाला नाहीं, अवधूतसेवा घडली पण त्यांनीं उपदेश समर्थांचा घ्या म्हणून सांगितलें' वगैरे जी जास्त हकीकत वरील कथानकांत सांगितली आहे तिचा या श्लोकांत कांहींच पत्ता लागत नाहीं. अशा स्थितींत वरील गोष्टींतील सत्यासत्य निवडण्याचें काम बरेंच कठीण आहे तरी त्याचा निकाल वाचकांनींच लावावा हें बरें !

ब्रह्मराक्षसाच्या गोष्टीप्रमाणें या चौदा ब्रह्मांच्या गोष्टीलाही पंडितांच्या ग्रंथांत कोठें पुरावा नाहीं. या चौदा ब्रह्माविषयींच्या वादासंबंधींची हकीकत महीपतीनें संतविजयाच्या एकविसाव्या अध्यायांत दिली आहे, परंतु तो वाद कोणीएक ब्राह्मण व समर्थ यामध्यें झाल्याचें तोवा लिहितात. तेव्हां हा विरोध हनुमंतस्वामींच्या कथेवर मारक आहे; म्हणून हनुमंतस्वामींनीं वर्णिलेला अद्भुत प्रकार, समर्थांनीं धरलेलें रुद्ररूप; केलेला भुभुःकार, वामनाला दिलेले शेपटाचे तडाखे; चौदा ब्रह्मासंबंधीं वाद चालला असतां, 'समस्या पूर्ण झाली का ?' म्हणून केलेला प्रश्न वगैरे सर्व गोष्टी अघटित, अशक्य व समर्थांच्या कीर्तीशीं विसंगत दिसतात कारण समर्थांना चमत्कार करून दाखविणें आवडत नसे असें समर्थांचे चरित्रांत उतारे वगैरे देऊन सिद्धच करून दाखविलें आहे.

आतां तिसरी गोष्ट गिराबाईची. ही गोष्ट देखील विचारांतीं खरीशी भासत नाहीं. कारण गिराबाईचे उत्तरांत पंडितांना उपरति होण्यासारखें अपूर्व ज्ञान भरलेलें होतें असें मुळींच दिसत नाहीं. त्यावरून एवढाच बोध होतो कीं, ती अंतर्ज्ञानी होती. वाचकांनीं पुढील उतारा गिराबाईचे गोष्टीशीं ताडून पहावा.—

श्रीसच्चिदानंद गुरु । ब्रह्मविद्येचा कल्पतरू ॥
करुणामृताचा सागरू । वेदांतवेद्य गोविंद ॥ १ ॥
जो भेटला मलयाचळीं । मार्गीं पाक करतेकाळीं ।
आधीं स्फुरला हृदयकमळीं । सच्चित्पदार्थ विचारितां ॥ २ ॥
उपनिषदार्थ पाहतां । आत्मा ब्रह्म हें तत्वतां ॥
परि अनुभवा नये ऐशी चिंता । ज्या दिवसांत अत्यंत ॥ ३ ॥
तथापि सत्पदें पाहतां । आपणासि घडे ब्रह्मता ॥
परि आनंद कैसा नकळे तत्वतां । मनीं ऐसा विचार ॥ ४ ॥
ऐसें विचारितां मनीं । तों ऐकों आली हास्यध्वनीं ॥
पाहतों जों परतोनी । वस्त्र भगवें देखिलें ॥ ५ ॥
कृपादृष्टीं अवलोकुनी । ‘ काय विचारितां हो मनीं ॥ ’
ह्मणोनि पुसतां धांवोनी । श्रीचरणा लागलों ॥ ६ ॥

—निगमसार, अध्याय १.—

अशाप्रकारें सच्चिदानंद साक्षात्कार झाल्याचा जो प्रकार निगमसारांत वर्णिला आहे, त्यांत यतीचे ठिकाणीं गिराबाईची योजना होऊन वरील दंत-कथा उपस्थित झाली व हनुमंतस्वामींनी आपल्या रामदासस्वामींचे चरित्रांत ती तशीच घुसडली !

अशाप्रकारें या थोर पंडिताबद्दल हनुमंतस्वामींनीं आपल्या रामदास स्वामींचे चरित्रांत ज्या आख्यायिका दिल्या आहेत त्या या ग्रंथकर्त्यानें आपल्या अल्पसमजुतीप्रमाणें सत्याच्या चाळणींत चाळून त्यांत हातीं आलेले सत्यकण वाचकांचे हवालीं केले आहेत; आतां ते ताडून पाहण्याचें काम वाचकांचें आहे.

आतां नवनीतकारांनीं व कविचरित्रकारांनीं दिलेली माहिती सत्याच्या कसोटीला कितपत उतरते हें पाहूं. या दोन्ही ग्रंथकारांनीं बहुतेक अंशीं

हनुमंतस्वामींनीं दिलेल्या हकीकतीचाच अनुवाद केलेला आहे. हें मागें सांगितलेंच आहे.

रामदासस्वामींच्या अनुग्रहानें वामन पंडितांना अनुभविक ज्ञान प्राप्त झालें असें जें नवनीतांत व कविचरित्राचे जुने आवृत्तींत सांगितलें आहे तें संभवनीय दिसत नाहीं; कारण पंडितांनीं यथार्थदीपीकादि दोन चार ग्रंथांत आपल्या गुरुविषयीं थोडासा मजकूर लिहिलेला आहे. उदाहरणार्थ हे दोन तीन मासले पहा.—

‘ जी श्री सच्चिदानंद गुरु । जें जें वदलास कल्पतरू ॥
निर्गुण, सुवर्ण सगुण मेरु । तो भेटलासि यतिरूपें ॥ १ ॥
श्रीगुरुरूप देवा ! । मज भेटलासी वासुदेवा ॥
तैं हें रहस्य देवाधि देवा ! । बोलिलासी ॥ २ ॥
तुझीं वचनें तुजप्रती । यालागीं बोलिलों श्रीपती ! ॥
कीं श्रोते तुझ्याच मूर्ती । तूं विश्वरूप भगवंत ॥ ३ ॥ ’

—यथार्थ० अध्याय १.—

जय जय देव गीताकार ! । जय जय देव टीकाकार ! ॥
जय जय देव सर्वाकार ! । वामनगुरो ! वामनात्मन् ! ॥ १ ॥ ’

—कित्ता० अध्याय १६ —

‘ सृष्टिस्थितिप्रलयादि कार्य । ज्याच्या संकल्पमात्रें, तो तूं विधीचा आर्य
तोचि तूं स्वयें माझा आचार्य । ऐश्वर्य माझें अतर्क्य देवा ! ॥ १ ॥
नामें आणि रूपें । सच्चिदानंदस्वरूपें ॥
मजनिमित्त रूप अरूपें । प्रकट केलें मलयपर्वतीं ॥ २ ॥
दों महूर्तांची संगती । परि अनाद्यनंत अनन्यगती ॥
जालासी, आणि बहुतां जनांतें सद्गती । या मुखें देसी तूं विश्वतोमुख ३

कित्ता. अध्याय १८.

या तीन उताऱ्यांवरून हें निर्विवाद आहे कीं, मलयपर्वतावर पंडितांना ईश्वरी साक्षात्कार होऊन, त्यांस अद्वैततत्त्व व सगुणभक्तिरहस्य यांचा बोध झाला व त्यांनीं त्या ज्ञानाचा उपयोग यथार्थदीपिकादि ग्रंथांच्याद्वारें आपल्या अज्ञ बांधवांना करून दिला आहे. पंडितांपुढें भगवान् यतिरूपानें प्रकट झाले. या यतीचे रूपाप्रमाणें नांवही सच्चिदानंदच होतें. या यती-

श्वरांनी अवघ्या दोन घटकांचे अवधींत ब्रह्मविद्यारहस्याचा उलगडा केला व त्या ज्ञानप्रकाशानेंच गीतेवर यथार्थव्याख्या करण्याचें वामनपंडितांना सामर्थ्य आलें. यथार्थदीपिकेंत या व्यतिरिक्त अन्य गुरुचा व गुरुपरंपरेचा पंडितांनीं कोठेंही निर्देश केला नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. हीच गोष्ट पंडितांनीं पुन्हां समश्लोकी, कर्मतत्त्व, निगमसार व अनुभूतिलेश या ग्रंथांत निर्दिष्ट केलेली आहे. निगमसार व अनुभूतिलेश या ग्रंथांत तर मलयपर्वतावरील ईश्वरी साक्षात्काराची कच्ची हकीकत दिलेली आहे. तेव्हां या प्रकाराशीं विसंगित असणाऱ्या सर्व दंतकथा एक तर बनावट मानिल्या पाहिजेत, किंवा त्यांचा संबंध दुसऱ्या कोणत्या तरी वामन कवीशीं मानला पाहिजे, कारण काव्यविचक्षणाकरितां दोन चार वामन कवि झाल्याचें आढळून येतें. 'वामन' या नांवाचे किती कवि होते याचा उलगडा यथावकाश पुढें करण्यांत येईलच. असो. वरील विवेचनावरून हें निर्विवाद सिद्ध होतें कीं, वामनपंडितांचा व रामदासस्वामींचा संबंध गुरुशिष्याचा नव्हता, कारण तसें असतें तर 'भगवंतानें सच्चिदानंद यतिवेशानें येऊन मला हें अद्वैत रहस्य विशेष करून सांगितलें;' असें खोटें लिहिण्याचें धाष्टर्य पंडितांनीं कधींच केलें नसतें.

वामनपंडितांच्या नांवावर मोडणाऱ्या ग्रंथाची संख्या अजमासें २१५८७ आहे. परंतु यांपैकीं खऱ्या वामनाची ह्मणजे 'यथार्थदीपिकाकारांची' किती आहे हें नक्की सांगतां येणें कठीण आहे; कारण काव्यविचक्षणाकरितां 'वामन' हें नांव धारण करणारे निदान चार पांच तरी कवि होऊन गेले असावेत असें वाटतें व हें मागें सांगितलेंच आहे. 'भीष्मप्रतिज्ञा' उर्फ 'भीष्मयुद्ध' या नांवाचें २१ श्लोकांचें एक लहानसें प्रकरण आहे. त्यातील पहिला व एकविसावा हे श्लोक येणेंप्रमाणें आहेतः—

'लक्ष्मीनृसिंहचरणद्वयसार साचा ।
जो हेतु मान्य वदती बहुसार साचा ॥
प्रत्यूहमत्तगजसिंह तया नमीतों ।
जाणें तयाहुनि कदापि न आन मी तों ॥ १ ॥
ताताभिधा नृहरि पंडित, माय लक्ष्मी ।
जे सर्वदा सुगुणयुक्त उदार लक्ष्मी ॥
शांडिल्यगोत्र, कुळदेव नृसिंह ज्याचा ।
दासानुदास निज वामन हो मनाचा ॥ २१ ॥

येथें कवीनें प्रथम श्लोकांत पर्यायानें व अंत्य श्लोकांत सरळ रीतीनें आपल्या मातापितरांचीं 'लक्ष्मी व नृसिंह' अशीं नांवें दिलीं आहेत. तसेंच गोत्रशांडिल्य, कुळदेव नृसिंह व स्वतःचें नांव 'वामन' हेंही सांगितलें आहे.

'भीष्मशरपंजर' या नांवाचें २९ श्लोकांचें एक प्रकरण आहे. त्यांतील अंतिम श्लोक असा आहे:—

'काशीस नाम जननी, जनकाभिधानी ।
श्रीविश्वनाथ, मम दैवत कृष्णवेणी ॥
श्रीमन्महेश अघमर्षण जो उपायीं ।
दासानुदासचि तरे दव तो सुपायीं ॥ २९ ॥'

यांतील प्रथमार्धांत कवीनें आपल्या आईबापांचीं नांवें काशी व विश्वनाथ दिलीं असून, त्याचें कुलदैवत 'कृष्णवेणी' असल्याचें स्पष्ट आहे. उत्तरार्धांतील 'श्रीमन्महेश' हें कवीचें नांव आहे कीं काय समजत नाहीं. या काव्यांत 'वामन' हें नांव नसतांही तें काव्य वामनीग्रंथांत कां गोंविलें आहे कळत नाहीं. यदा कदाचित् हें प्रकरण वामनकवीचेंच असल्यास तें निदान नृसिंहसुत वामनाचें तरी नाहीं हें खास आहे.

'सिद्धांतविजय' नामक एक संस्कृत प्रकरण वामनपंडिताचेच नांवावर मोडतें. यांत ९१ श्लोक आहेत. यांतील शेवटचा श्लोक असा आहे:—

अहो, देहो जातो रघुकुलगुरोर्गोत्रजलधौ ।
शुकश्रीव्यासाद्या मुनय इह यत्पूर्वजतमाः ॥
स्वनाम्ना यद्वासौ हरिपदरजो वामन इति ।
श्रियः कान्तः कर्तापिच स्वकृतसिद्धांतविजयः ॥ ९६ ॥'

यांत या वामनकवीचा जन्म सूर्यवंशाचा गुरु जो वसिष्ठ त्याच्या गोत्रांत झाला हें उघडपणें सांगितलें आहे. तेव्हां वासिष्ठगोत्री वामन, शांडिल्यगोत्री नृसिंहसुत नव्हे हें निर्विवाद ठरतें. याच वासिष्ठगोत्री वामनकवीनें 'रामजन्म व सीतास्वयंवर' हीं प्राकृत काव्यें रचिलीं आहेत, कारण त्या दोन्ही काव्यांत पुढील श्लोक आढळतो:—

'श्रीमद्भागवतांत आणि इतर ग्रंथीं, महाभारतीं ।
श्रीमद्रामकथा निरूपिलि बरी; व्यासाचिही भारती ॥

गाता तेचि शुकादि गोत्रज बळी मध्यें वसिष्ठान्वयी ।
माझा वामन राम गाइल तयीं लक्षूनि सर्वान्वयीं ॥

रामजन्म, ४६ व सीतास्वयंवर, १०.

असो. या वरील एकंदर विवेचनावरून 'वामन' हें नांव धारण करणारे बरेच कवि होऊन गेले हें निर्विवाद ठरतें. 'वामनकवीच्या नांवावर मोडणाऱ्या ग्रंथांत 'यथार्थदीपिका' हा ग्रंथ फार मोठा आहे. या अवाढव्य ग्रंथाची ग्रंथसंख्या बावीस हजारांवर आहे. या ग्रंथांत कवीनें आपल्या मातापितरांची कांहींच माहिती सांगितली नाहीं. निगमसार, अनुभूतिलेश, कर्मतत्त्व, समश्लोकी वगैरे ग्रंथ करणाऱ्या वामनानेंही आपल्या आईबापांचीं नांवें दिलेलीं नाहींत. तेव्हां हे यथार्थदीपिकादि ग्रंथ रचणारे वामनकवि वर दाखविलेल्या वामनकवींहुन भिन्न होते असें ठरतें. कै. हंस व वा. दा. ओकांसारख्या कसलेल्या लेखकांनीं ही वर सांगितल्याप्रकारची निवडानिवड न करितां सर्व एकच गोंधळ करून टाकिला आहे व सर्व ग्रंथ एकाच वामनाच्या नांवावर दडपले आहेत ! तरी आतां या सर्व ग्रंथांचें बारकाईनें निरीक्षण करून त्यांची विल्हेवारी लावण्याचें हें स्थळ नसून तें या अल्पमति लेखकाला साधारणही नाहीं कारण तें काम महाराष्ट्रवाङ्मयांत पारंगत असलेल्या विद्वान् पंडितांचें आहे.

यथार्थदीपिकाकार वामनपंडितांनीं निगमसाराखेरीज इतर कोणत्याही ग्रंथांत रचनाकाळाचा निर्देश केलेला नाहीं. परंतु या प्रकरणांत म्हणजे निगमसारांत मात्र त्यांनीं तो सुदैवानें नमूद केला आहे व म्हणून तो ग्रंथ ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्वाचा आहे.

'शके पंधरा शतें पंचाण्णव । तैं ग्रंथ प्रकटला अभिनव ॥
जो अनादि अनुभव । सकल संताचा ॥ १ ॥'

—निगमसार, ९-१११.

यावरून पंडितांनीं हा ग्रंथ शके १५९५ म्हणजे इ. स. १६७३ त गुंफला हें सिद्धच आहे. तसेंच या ग्रंथाचा उल्लेख कर्मतत्त्व, समश्लोकी व यथार्थदीपिका या तीन ग्रंथांत असल्यामुळें ते ग्रंथ इ. स. १६७३ नंतर लिहिले गेले हेंही स्पष्टच आहे. तेव्हां पंडीत इ. स. १६७३ नंतर २५-३० वर्षें तरी जगले असावेत असें अनुमान होतें व यावरून हें निर्विवाद आहे कीं, नवनीतकारांनीं वामनपंडितांचा १५९५ हा जो मरणशक दिला आहे तो साफ चुकीचा आहे. आतां कदाचित हा शक यथार्थदीपिकाकार

वामनपंडित सोडून दुसऱ्या एकाद्या वामनाचा असूं शकेल. अशास्थितींत हें सांगणें इष्ट आहे कीं, हें जें चरित्र लिहिलें आहे तें यथार्थदीपिकाकार वामनपंडितांचें असल्यामुळेंच वरील नवनीतकारांचा शक चुकलेला आहे असें ह्मणण्याचें या लेखकानें धाष्ट्र्य केलें आहे.

पंडितांनीं अखेर संन्यास घेतला होता असें कांहीं चरित्रकारांचें ह्मणणें आहे. परंतु चतुर्थाश्रम परतंत्र आहे, तेव्हां घेण्यांत अर्थ नाहीं, काम्य-संन्यासच स्वतंत्र व योग्य, असें त्यांनीं आपलें मत दीपिकेंत स्पष्टपणें दिलें आहे:—

आणि संन्यास हाचि ( काम्यसंन्यास ) खरा । कीं याचकरितां आश्रम चतुर्थ बरा ।। शिखा बोडोनि तोडिला दोरा । आणि काम्य मनीं तो नरक पावे संन्यासी ।। १०३ ।।

–अध्याय १८ श्लोक २–

यावरून यथार्थदीपिकाकारांनीं संन्यास घेतला नसावासा वाटतो. शिरगांव कोरेगांव मुक्कामीं वारणानदीचे तीरीं पंडितांची समाधि आहे असें कळल्याचें भारतीय साम्राज्याचेकर्ते व महाराष्ट्र सारस्वताचे कर्ते ह्मणतात; व त्यांनीं ही माहिती काव्यसंग्रहांतून घेतली आहे. नवनीतकार ह्मणतात कीं, 'वामन पंडित कृष्णातीरीं वाईक्षेत्राजवळ पांडववाडी ह्मणून एक गांव आहे तेथें वारला. त्याच्या शिष्यमंडळीनें त्याच्या पादुका अद्यापी सांभाळून ठेविल्या आहेत व त्यांची ते पूजा करीत असतात, असें ऐकण्यांत आहे.' अशीं प्रत्येकाची भिन्न भिन्न मतें असल्यामुळें पुन: निर्णय करण्याचें काम कठिण झालें आहे. परंतु यावरून निदान एवढें ह्मणण्यास हरकत नाहीं कीं, नव-नीतकारांनीं वर्णिलेला वामनकवि यथार्थदीपिकाकार वामनपंडित खास नव्हे. आतां भारतीय साम्राज्याच्या कर्त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें 'पंडितांची कोरे-गांवास जरी समाधि असली, तरी त्यांनीं संन्यास घेतलाच होता असें नाहीं, कारण शवदहन झालेल्या जागीं साधुपुरुषांच्या स्मरणार्थ समाधि बांधण्याची किंवा छत्री उभारण्याची चाल महाराष्ट्रांत असे.'

असो. येथपर्यंत यथार्थदीपिकाकार वामनपंडितांसंबंधीं जेवढी माहिती देणें शक्य होतें तेवढी दिली. आतां त्यांच्या काव्याविषयीं उपसंहारात्मक दोन शब्द लिहून या प्रकरणाचा समारोप करूं.

'ग्रंथांच्या अंत:प्रमाणावरून पाहतां वामनपंडितांचे एकंदर १३ ग्रंथ नि:संशय कायम करितां येतात. यथार्थदीपिकेंत पंडितांनीं, 'निगमसार,'

' कर्मतत्व ' व ' प्रशस्ति ' या तीन स्वकृत प्रकरणांचा उल्लेख केला आहे. या तिन्ही ग्रंथांचा गीतेवरील समश्लोकींत उल्लेख असून, शिवाय ' **हरिनामसुधा** ' ' **योगवासिष्ठ,** ' व ' श्रुतिसार ( संस्कृत ) ' या आणखी तीन स्वकृत ग्रंथांचा तींत निर्देश आहे. ' **गीतार्णवसुधा** ' हाही ग्रंथ पंडितांचाच आहे. कारण त्यांतील गीतावचनार्थाचे श्लोक समश्लोकींतुन जसेच्यातसेच घेतले आहेत. ' **कर्मतत्व** ' या ग्रंथांत ' निगमसार ' व ' **चित्सुधा** ' यांचा उल्लेख आहे, ' **चरमगुरुमंजरींत** ' गीतेवरील टीकेचा मुख्यनिर्देश आहे आणि मंजरींतील बरेच श्लोक ' उपादानांत ' आहेत; तेव्हां हीं हीं प्रकरणें वामनपंडितांचींच ठरतात. ' **अनुभूतिलेश** ' या संस्कृत ग्रंथांत मलयपर्वतावर झालेल्या भगवत्साक्षात्काराची यथास्थित हकीकत आहे, तेव्हां तेंही प्रकरण पंडितांचेंच निःसंदेह ठरतें. हीं सर्व प्रकरणें वेदांतविषयक आहेत. आतां नाम व रचना सादृश्याचे योगानें पंडितांचेच असे आणखी किती ग्रंथ ठरवितां येतात तें पाहूं ' **वनसुधा** ' व ' **वेणुसुधा** ' यां प्रकरणांचें ' नामसुधा, ' ' चित्सुधा, ' ' गीतार्णवसुधा ' या ग्रंथांशीं नामसादृश्य आहे व त्यांची रचनाही प्रौढ आहे, ह्मणून ते ग्रंथ यथार्थदीपिकाकारांचेच होत. या प्रकरणांतून निसर्गवर्णनें फार बहारीचीं असून भक्ति, वत्सल व करुण या रसांनी ठिकठिकाणीं अगदीं पूर आलेला आढळतो. जेथें तेथें प्रौढता, सरळपणा व भक्तिनिष्ठा हीं चमकत असून, अश्लील बीभत्स शृंगाराचें नांवही नाहीं. ' **हरिविलास** ' ' **रुक्मिणीविलास** ' ' **भामाविलास** ' ' **बालक्रीडा** ' हे ग्रंथ याच मासल्याचे आहेत. या ग्रंथांत वर्णनीय विषयांशीं कवीची मनोवृत्ति अगदीं तादात्म्य पावलेली आढळते व रसिकवाचकांचीही तात्काळ तीच स्थिति होते, यांत शंका नाहीं. ' प्रियसुधा ' हें लहानसें अठरा श्लोकांचें प्रकरण पंडितांनीं आपली पत्नी गिराबाई हीस अद्वैतबोध करण्यासाठीं रचिलें आहे, असें दिसतें. ' अपरोक्षानुभूति ' वरील समश्लोकी, गीतासमश्लोकीच्याच तोडीची आहे. ' तत्वमाला ' व ' राजयोग ' हे वेदांतविषयक ग्रंथ यथार्थदीपिकाकारांचेच होत, कारण त्यांतील सर्व विचार दीपिकेंतील विचारांशीं जुळतात. भाषांतररूपानें प्रसिद्ध केलेली जगन्नाथपंडितकृत **गंगालहरी** व भर्तृहरीकृत **शतकें** हीं प्रकरणेंही पंडितांचींच असावींशीं वाटतात. येथवर निर्दिष्ट केलेलीं सुमारें २०–२५ प्रकरणें पंडितांचीच आहेत असें विश्वासपूर्वक ह्मणतां येतें.

' या सर्व ग्रंथांची रचना जोरदार, प्रौढ, सरळ व वळणशुद्ध आहे.

विषयप्रतिपादनाची शैली तर अप्रतीमच आहे. यथार्थदीपिका एवढी अवाढव्य असतांही तिची भाषा सर्वत्र अगदीं प्रयोगशुद्ध, सरळ, कसलेली, मधुर, रसाळ व भक्तिरसानें थबथबलेली आहे. समयानुरूप ती कोमळ, सणसणीत, रंगेल, भाविक व हृदयंगम अशी दिसून येते. विषयप्रतिपादनाच्या भरांत सरस्वतीचा प्रवाह अस्खलित घोंघावत चाललेला आहे, त्याला जबरीनें कृत्रिम वळण दिलेलें कोठेंही भासत नाहीं. वाक्यरचना इतकी सरळ व बिन घोटाळ्याची आहे कीं, ती बहुतेक गद्यासारखीच भासते. सूर्यबिंब क्षितीजावर आरूढ होतांक्षणींच कमलवनें जशीं आपोआप विकसित होतात, तद्वतच पंडितांच्या मनांत विचारप्रादुर्भूत होतांक्षणींच त्यांची वाणी यमकांनीं प्रफुल्लित झालेली भासते. अद्वैताचें प्रतिपादन करितांना, सगुणभक्तीची महती गातांना, भगवंताला आळवीत असतांना किंवा अशा तऱ्हेच्या मनाला उमळवून टाकणाऱ्या इतर प्रसंगांचें वर्णन करीत असतांना पंडितांची वाणी ईश्वरीप्रसादानें विकसलेली व काव्यप्रतिभेनें अगदीं रसरसलेली आढळते. तात्पर्य वसंताच्या अमदानींत उद्यानभूमीमध्यें झाडांवर शोभणाऱ्या फुलांचे घोंस व त्यांखालीं पसरलेला फुलांचा पेर ज्याप्रमाणें अत्यंत मोहक वाटतो, तद्वत् यथार्थदीपिकेंत इतस्ततः पसरलेले अशाप्रकारचे उत्कृष्ट रचनेचे शेंकडों नमुने मनाला अगदीं दंग करून टाकतात.' एकंदरीत शास्त्रीय विषय साधे, सोपे व सरळ भाषेंत लिहिण्याची कला प्रथम पंडितांनीं प्रचारांत आणली व आपल्या अमोल विद्येचा लाभ लोकांस असा करून दिला कीं, घरोघर हे शब्द कानीं येतात.—

'भक्ति थोर! भक्ति थोर! तूं चंद्रमा! भक्त तुझे चकोर!
तूं मेघ! भक्त मयूर! मेघश्याम समोर त्यांस तूं सर्वत्रही!'

असो! पंडितांच्या ग्रंथांवरून आपल्याला त्यांच्या स्वभावाचेंही थोडें फार अनुमान काढतां येण्याजोगें आहे. 'ते एकंदरीत फार धोरणी, सारासार विचारी, कल्पक, निस्पृह, सत्याभिमानी व वाणीचे खंबीर असे होते. सत्याचें प्रतिपादन करितांना त्यांनीं कोणाचीही भीडभाड धरलेली दिसत नाहीं. आपले ग्रंथ कोणी वाचोत न वाचोत, दुसऱ्याच्या आराधनेसाठीं, लौकिकासाठीं किंवा लोकप्रियतेसाठीं सत्यास धाब्यावर बसवून दंभ किंवा मुग्धता स्वीकारावयाची नाहीं हा त्यांचा दृढ संकल्पच होता. भगवद्भक्त या नात्यानें त्यांची योग्यता फारच मोठी होती; किंबहुना भागवतधर्माचा मार्ग उजळ व निष्कंटक करण्याचे कामीं पंडितांची योग्यता इतरांपेक्षां कांकणभर

वास्तव होती, हें त्यांच्या ग्रंथांचें सूक्ष्म परिशीलन केलें असतां सहज व स्पष्टपणें नजरेस येणारें आहे. या त्यांच्या अलौकिक गुणामुळें साधु, संत, योगी, कवि वगैरे मंडळी त्यांना बराच मान देत असत. हे वरील उद्गार मनःकल्पित नसून साधार आहेत; कारण याविषयीं पंडितांनीं तथार्थदीपिकेंत स्पष्ट सांगितलें आहे कीं, 'अशा लोकांच्या सांगण्यावरूनच यथार्थदीपिका रचण्याचें माझे मनांत आलें:—

'आणि तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य, संत, भक्त योगी ॥
ते ह्मणती कीं जगदुपयोगी । ऐशी टीका करावी ॥ १ ॥'

—यथार्थदीपिका. अ० १ ओंव्या १३२.

श्रीधरादि महाराष्ट्रकविवरांनीं पंतांची त्यांच्या कवित्वासंबंधानें फारच प्रशंसा केलेली आहे. मोरोपंतांनीं 'सन्मणिमाला' व 'सन्नामगर्भरामायण' यांत वामनपंडितांचा सादर उल्लेख केला आहे; शिवाय 'वामनपंडितस्तुति' या मथळ्याचें एक स्वतंत्र प्रकरण रचिलें आहे. उदाहरणार्थ हे खालील दोन चार मासले पहा.—

'जैसा चंद्रांशु सतेज व्योमीं । तैसाचि केवळ वामनस्वामी; ॥
ज्याची श्लोकरचना ये भूमीं । भूमंडळावरी अपूर्व गा ! ॥ १ ॥'

—श्रीधर.

'नमिला साष्टांग श्री-पति-भक्ति-रस-ज्ञ वामनस्वामी ।
रस-भवना तत्कवना मानीं या तेंवि वाम न स्वामी ॥ १ ॥
रीति समश्लोकीची अतुला, साधेल काय नव्यास ।
यां सुयशें होइल कां, रोमांचव्याप्तकाय न व्यास ॥ २ ॥
वाटे सुक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ।
प्रभुनें भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ॥ ३ ॥
वामन वामन साक्षात् तरिच असा हा महातपा वेधी ।
बहुसुख हरिदासांची, ज्याच्या कृतितें पहात पावे धी ॥४॥'

—मोरोपंत,

'वामनस्वामी चतुर पंडित । जो प्रेमळ द्वेषरहित ॥
यांणीं दशमस्कंध भागवत । केलें प्राकृत निजबुद्धि ॥ १ ॥

'वामनस्वामी चतुर पंडित । जो वेदांतशास्त्रीं निपुण बहुत ॥
त्याहीवरी प्रेमळभक्त । कविता प्रख्यात जयाची ॥ २ ॥
'वामनस्वामी भक्त थोर । जो व्यास अवतार कलियुगीं ? '

—महीपति.

## वामनपंडितांच्या कवितेंतील कांहीं वेंचे.

भगवद्भजनाला कोणतीही भाषा चालते असें पंडितांचें ठाम मत होतें. संस्कृतांतच कांहीं जास्त आहे असें नाहीं असें ते ह्मणतात व या आपल्या ह्मणण्याप्रमाणेंच त्यांनीं आपलें वर्तन ठेविलें होतें. त्यांनीं यथार्थ-दीपिकेंत अगदीं साधे व सुलभ शब्द वापरले आहेत. अगडबंब संस्कृत शब्द किंवा समास त्यांनीं कोठेंही योजिले नाहींत. भक्तीपुढें संस्कृत व प्राकृत यांमधील भेदभाव टिकत नाहीं. यासंबंधानें यथार्थदीपिकेंतील पुढील लांब उतारा, फारच महत्वाचा असल्यामुळें तो येथें सबंध देतों.—

जी जी देवाधिदेवा ! । प्राकृत भाषेकरितां तुझी सेवा ॥
वेदवाणीस उपजे हेवा । तुझ्या स्वरूपाचा ठेवा जीमाजीं ॥ १ ॥
मुख्य तुझें नाम गोड । मुखीं सर्व भाषांचें कोड, ॥
जें कानीं मुखीं येतां, मोड । देहीं उपजती प्रेमाचे ! ॥ २ ॥
काय वेदशास्त्र जाणे व्रज ? त्याची भक्ति देखोनि, आत्मज ॥
ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज । वंदी व्रजनारीजनांचे ! ॥ ३ ॥
गजेन्द्र कोण शास्त्र पढला ? । बाळ कोण्या पांडित्यें ध्रुवपदा चढला ?॥
दासी कुब्जा तिला घडला । काय अभ्यास संस्कृताचा ? ॥ ४ ॥
व्रजीं चारितां गायी । कुचकुंकुमें गोपिकांचीं पायीं ॥
तदंकित ह्मणे कृतार्थ ठायीं ठायीं, । बल्लवस्त्रिया पढलिया त्या काय ? ५
अभिमानें बुडाले पंडित, यज्ञपत्न्यांनीं अर्चितां वैकुंठमंडित ॥
न पढतां, न वाचितां अखंडित । आनंद भक्तीनें पावल्या ॥ ६ ॥
भक्ति थोर, भक्ति थोर; । तूं चंद्रमा, भक्त चकोरः ॥
भक्त मयूर, मेघश्याम समोर । त्यांस तूं सर्वत्रही ॥ ७ ॥
एवं पावावया तुझे चरण, । भाषा कोणी नव्हे कारण, ॥
कारण सप्रेम अंतःकरण । देवाधि देवा ! ॥ ८ ॥

अध्याय

युद्धांत आपल्यापुढें सर्व आपलाच गोतवळा उभा आहे असें पाहून विमोहित झालेल्या अर्जुनाला युद्धाला पुनः उद्युक्त करण्याकरिता श्रीकृष्णानें उपदेश केला आहे. त्यांत असें सांगितलें कीं, ' तूं कर्म कर पण त्याच्यावर आसक्ति ठेऊं नकोस. ' त्यावर अर्जुनानें पुनः शंका घेतली कीं, कर्मापेक्षां ज्ञानच जर तूं श्रेष्ठ समजतोस तर मला हें घोरकर्म करावयास कां लावतोस? या अर्जुनाच्या शंकेचें श्रीकृष्णानें जें निराकरण केलें आहे त्याचें स्पष्टीकरण पंडितांनीं फारच सुंदर केलें आहे.—

' अर्जुना! जरी संन्यासी । डोई बोडोनि झालासी ॥
तरी कैसा कर्में टाकिसी । क्षण एकही ॥ १ ॥
लंगोटीही टाकणें । आणि नग्न होऊनि असणें ॥
तेंही नव्हे काय करणें । अगा! कर्म? ॥ २ ॥
घट वर्ते तरीच माती । न वर्ततां काय अन्य जाती! ॥
कर्में रचिलीं देहाकृती । त्याग कर्माचा तो कैसा? ॥ ३ ॥
भूचर टाकोनि भूमी । ह्मणे पळोनि जाईन मी ॥
पळतां पुढें रिकामी । भूमीच दिसे! ॥ ४ ॥
गगन टाकोनि पक्षी । उडो लागला अंतरिक्षीं ॥
तो तों सर्वत्र लक्षी । तेंचि गगन ॥ ५ ॥

—अध्याय ३.

खालील ओव्यांत पंडितांनीं ' मनुष्य ' ही संज्ञा कोणाला द्यावी याचें स्पष्टीकरण फारच मजेदार केलें आहे.

' द्विपदत्वें मनुष्य होय । तरी पक्षियासही दोनच पाय ॥
दाढीनें मनुष्य होय तरी काय । दाढी नसे बोकडासी? ॥ १ ॥
आहेत हात यावरूनी । ह्मणावें मनुष्य ह्मणूनी ॥
तरी मर्कटासही दोनी दोनी । असती हस्त ॥ २ ॥
सुरतसुखें ह्मणावें नर । तरी तें सुख पावती वानर खर ॥
मनुष्य निर्मिती ह्मणावें घर । तरी पक्षीही गृह निर्मिती ॥ ३ ॥
पुढील चिंता कोणासी । नसे, ती एक मनुष्यासी, ॥
या गुणें ह्मणावें मनुष्यत्व यासी, । तरी पक्षियासही ते असे ।४।

प्रसूत नाहीं तोंचि चिमणी । आडियांकारणें गर्भिणी ॥
कापूस आणि मृदुतृणीं । सेज करी ॥ ५ ॥
चारा सांडूनि वेंची । कापूस, धरधरोनि चोंचीं ।
नें; ऐसी चिंता संतानाची । करी, जों उपजलीं तीं नसती ॥६॥
ऐसा पाहतां विचार । पशुपक्षियां समान विहार ॥
निद्रा, मैथुन, आहार । पशूंस तैसें मनुष्यासही ॥ ७ ॥
एवं भजन सर्वेश्वराचें । करिती, त्यांचें मनुष्यत्व साचें ॥
ह्मणूनि वाक्य भगवंताचें । कीं, 'माझ्या मार्गीं वर्तती मनुष्य सर्व' ८

—अध्याय ४.

' टिळेमाळा करून, भागवतधर्माचा टेंभा मिरवून, भक्तिहीन बुद्धीनें एकादशीचे उपासतापस करून सर्ववेळ गप्पाष्टकांत घालविणाऱ्या कर्मठांचाही पंडितांनीं चांगलाच समाचार घेतला आहे. एकादशीला उपवास करण्याला ऋषींनीं सांगितलें आहे; परंतु लोक त्या शासनाचें खरें मर्म ध्यानांत न ठेवितां केवळ बाह्य कसरती व दिखाऊ कर्में कशीं करितात व एकंदरींत त्यांच्याकडून निर्जीव देहाला आलिंगन देण्याचे हास्यास्पद प्रकार कसे घडतात यांचें पंडितांनीं नवव्या अध्यायांत फारच बहारीचें वर्णन केलें आहेः—'

' नामावांचुनि सदाचार । ते सकळही वेडेचार ॥
पाय उचलोनी मूत्राची धार । निराळी सोडी श्वानही ॥ १॥
नामावांचूनि आंघोळी । त्या बेडुकांच्या बुड्या जळीं ।
जळीं सर्वदा असे मासोळी । दुर्गंध अंगीं अनिवार ॥ २ ॥
हरिनाम न ह्मणे वाचा । निराहार उपवास एकादशीचा ।
बाशींग अलंगार मस्तकाचा । बांधिजे जे रीती पाठीशीं ॥३॥
अहोरात्र जागर उपवास । उपयोगी हरिनामकीर्तनास ॥
ह्मणोनि निद्राहार जनास । ऋषि ते दिवशीं वर्जिती ॥ ४ ॥
हें बोलतां स्पष्ट जन । कीर्तन करिती करोनि भोजन ॥
ह्मणोन करते जाले शासन । उपवासाचें ॥ ५ ॥
विशेषें एकादशी दिनीं । ऋषि ह्मणती करावीं दोनीं ॥
अहोरात्र जागरणीं । एवं कीर्तनीं तात्पर्य ॥ ६ ॥

पवास करी निराहार । सोंकटीं खेळोनि जागर ॥
तो नव्हे व्रताचा अधिकार । मुख्य कीर्तन ऋषि बोलती ॥ ७ ॥
श्वान सुनाचें भांडण । घडला उपवास जागरण ॥
ते पुण्य एकादशीचें, कारण । जालें विमान जावया ॥ ८ ॥
ह्मणोनि हरिकीर्तनावीण । निराहार आणि जागरण ॥
करितो त्यांस ही व्रतगुण । होय अमृतें अमरता जैसी काकासी ९
काकळा अमृत प्याला । वंश अवघा अमर जाला ॥
ह्मणोनि अमृत मिळतां मानव भला । न करी पान कावळा ह्मणोनी १०
टाकोनि हरिकथामृत । निराहारी बसे जागत ॥
फळ देईल ही व्रत । परि नव्हे कृपापात्र देवाधिदेवाचें ॥ ११ ॥
वाणीही मेळवी धन । धनाच मेळवी रायाचा प्रधान ॥
परि तो रायासमान । ग्राम्य तुच्छ धनिक हा ॥ १२ ॥
क्षण निद्रा येतां दिवसा । भंग जाला उपवासा ॥
हरिनामप्रताप नव्हे ऐसा । कीं नाम पूर्ण करी न्यूनातें ॥ १३ ॥
व्रत सफळ नामें परम । विना नाम सकळ अंगहीन कर्म ॥
एकादशी तो भागवत धर्म । नामावांचून, शव जैसें विनाप्राण ॥ १४ ॥

अध्याय ९.

वामनपंडितांनीं शास्त्राध्ययन करून जो वेदांतविषय करतलामलवत् करून ठेविला होता, त्याचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत जागोजाग पडलें आहे; व तें कथाप्रसंगांत दृष्टीस पडतांच मनाला मोठा विस्मय वाटतो. उदाहरणार्थ हे एक दोन मासले पहाः—

‘ शर्वादि सर्व तुज इच्छिति पायधूळी ! ।
तूझा प्रसाद नसतां मज याच काळीं ॥
जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा ।
अंतीं तुझ्याच वरणें चरणारविंदा ॥ १ ॥

रुक्मिणी-पत्रिका.—

रुक्मिणीसारख्या नववधूची मजल वेदांततत्व उलगडण्यापर्यंत जावी हें मोठें नवल आहे. तशांत ‘ जन्ममरणासारखा उत्क्रांतिपर सिद्धांत ’ पत्रिकेंत

सफाईनें गोंवून देण्याची शकल त्या लहानशा ठेक्यांत यावी याचें रसिक वाचकांस आश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं !

‘ चिच्छक्तिला सतत चिन्मय जेंवि योग ।
श्रीरुक्मिणीस न कधीं हरिसी वियोग ! ॥ ’

रुक्मिणी-विलास.

ही कवीची वेदांतीउपमा किती चमत्कृतिजनक आहे ! हीच सुंदर कल्पनालहरी त्यांच्या मनांत अनेकप्रसंगीं घोळत असे, असें पुढील अवतरणावरून स्पष्ट दिसतें.—

येणार मागुति चतुर्दश वत्सरांतीं ।
राहो वनांत तितुके दिन आणि राती ! ॥
आत्माच तो तुज वियोग तयासि नाहीं ।
येऊनि हे करिल जे तव कामना ही ! ॥ १ ॥

भरतभाव.—

भामाविलासांत भामेची समजूत श्रीकृष्णानें मोठ्या खुबीनें पाडिली आहे. तो ह्मणतो.—

‘ तुतें वृक्ष देणेंचि याच्यागिं आधीं । फुलें नाशिला, जो तिला होय आधी
न जाणोनि केलें तुवा कष्ट भारी ’ । समाधान ऐसें करी कैटभारी ॥ १ ॥

भामाविलास —

रुक्मिणीविलासांत, रुक्मिणीस खिजवून, कृष्णानें तशाच हुशारीनें तिचा गर्व परिहार केला आहे. रुक्मिणी वाटेवर आल्यावर असें ह्मणतेः—

‘ राज्यादिकें टाकुनि निर्विकारी । त्वदर्थ होतात असे भिकारी ॥
राज्यांत दुःखें, सुख तूजमाजीं । ह्मणून तूं श्लाघ्य तया समाजीं ।१।
सुधा मानुनीया पितो एक कांजी । सुधापानकर्ता हिवे त्यास कां जी ? ॥
तशी टाकुनी मी तुला मंगलाला । नृपांला तया कां भजों वोंगळाला ? ॥

रुक्मिणीविलास.—

नारदानें दिलेलें पारिजातकाचें पुष्प श्रीकृष्णानें रुक्मिणीला दिलें हें ऐकून सत्यभामेनें जो आकांत केला त्याचें चित्र पंडितांनी फारच मार्मिकतेनें वठविलें आहे. त्याचप्रमाणें तिच्या तोंडीं घातलेली बोलणी ही अत्यंत समर्पक आहेत. हें वर्णन वाचतांच स्त्रियांच्या सवतीमत्सराची व अतताईपणाची कमाल वाटतेः—

' गडबडां धरणीवरि लोळते । वदवती न कवीसहि लोळते ।
रडत मूर्छित होय घडी घडी । पवन निश्चळ, नेत्र न ऊघडी ।१।
' अलक हार गळ्यांतिल तोडिते । कुरळ केश मुखावरि सोडिते ॥
कर-युगें उर मस्तक ताडिते । वसन आणिक कंचुकि फाडिते ।२।
' महा उष्णश्वासें करुनि वदते शुष्क अधरा ।
धरापृष्ठीं जोडा न शठ दुसरा या गिरिधरा ॥
धराया माझा हा कर कपटि कैंचा जनमळा ।
मळा जो निंदूनी कुसुम तिस देऊनि रमला ॥ ३ ॥
' सख्या हो मेल्याही शवहि न शिवो हें यदु-पती ।
पतीनाना स्त्रींचा पतित जनही ज्यास ह्मणती ॥
नका येऊं देऊं सदनी सवतीच्या प्रियकरा ।
करातें लावीना मज कपटि ऐसें तुह्मि करा ॥ ४ ॥
' रडत रडत मूर्च्छेमाजि वृत्ति बुडाल्या ।
परम विकळ; मी तूं या स्मृती ही उडाल्या ॥
उचलुनि सखियाहीं मंचकीं दिव्य सेजे ।
निजविलि मृत-तुल्या सत्यभामा दिसे जे ॥ ५ ॥ '

भामाविलास.

आतां ज्यामध्यें करुणरस ओतप्रोत भरला आहे व जें पठन केलें असतां अमंगलाचा परिहार होणार आहे, इतकेंच नव्हे तर श्रांत मनाला विश्रांति मिळून आनंद वृद्धि होणार आहे असें एक करुणाष्टक देवून हें प्रकरण आटोपतें घेवूं.

## करुणाष्टक.

लोपोनि भास्कर जयद्रथ मारियेला ।
लज्जानळांतुनि धनंजय वांचवीला ॥
लाक्षागृहीं विवरिं पांडव रक्षियले ।
माझे विशींच मन निष्ठुर कैंवि केलें ॥ १ ॥
दुग्धामिषें द्विजसुतें स्तविला मुरारी ।
दुग्धार्णवीं अचल ठेविसि पूतनारी ॥

कुब्जेचि भक्ति तरि देखुनि क्षेम दीलें ।
माझे विशींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ २ ॥
आणोनि राजतनया अधमें सभेला ।
दुष्टोत्तरें करवि नग्न जरी सतीला ॥
ती कारणें स्वकरिं अंबर नेसवीलें ।
माझे विशींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ३ ॥
उत्तानपाद नृप केवळ पुण्यराशी ।
तत्सुत तो ध्रुव तपोधन योगराशी ॥
त्या कारणें अचळ धाम करून दीलें ।
माझे विशींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ४ ॥
नक्रें जळांत चरणीं धरिलें गजेंद्रा ।
म्लानोत्तरें करुनिया स्तवि देव इंद्रा ॥
तें दीनबंधु ब्रिद सत्वर रक्षियेलें ।
माझे विषींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ५ ॥
वृत्रारि कोपुनि सिळा घन वर्षवीला ।
तेव्हां भय प्रळयकंप गमे जनाला ॥
घेवोनि त्या गिरिकरीं व्रज रक्षियेले ।
माझे विशींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ६ ॥
सिंधूजळांत कनकापुर दूर गांवें ।
तेथोनि शीघ्रगति मोक्षपुरीस यावें ।
काष्टाग्नि घे भरत दर्शन त्यासि दीलें ॥
माझे विषींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ७ ॥
जे शापदग्ध पडली बहुतां दिसांची ।
लावोनि पाय हरिली जडता तियेची ॥
त्या भक्तवत्संलपणाप्रति काय झालें ।
माझे विशींच मन निष्ठुर कांवि केलें ॥ ८ ॥
दुर्योधनें ऋषिस धाडियलें वनातें ।
धर्मा छळूनि मुनि मागति भोजनातें ॥

त्या कारणें परम अश्व निशीं दीं । 
माझे विशीच मन निष्ठुर कोंवि केलं ॥ ९ ॥

दारिद्रते करुनि पीडित तो सुदामा । 
मुष्टी भरूनि पृथु आणित कृष्णधामा ॥ 
देऊनि कांचन पुरी द्विजराज केलें । 
माझे विशीच मन निष्ठुर कोंवि केलें ॥ १० ॥

त्रिकाळीं करा घोष या अष्टकाचा । 
मनींचा पुरे अर्थ तव्हांच साचा ॥ 
विनंती असे भक्त हो वामनाची । 
उपेक्षा न कीजे यया अष्टकाची ॥ ११ ॥

वामनपंडितांनीं वेदांत व मनुष्यस्वभाव यांत जसें पांडित्य दाखविलें आहे, तसें सृष्टिसौंदर्यांतही दाखविलें आहे. ' वनसुधा ' व ' वेणुसुधा ' या आख्यानांत वनशोभा उत्तम वर्णिली आहे हें मागें सांगितलेंच आहे. या काव्यांत पंडितांनीं बालस्वभावाचें व त्यांच्या चेष्टितांचें इतकें सरस वर्णन केलें आहे कीं तसें मराठी कवितेंत अन्यत्र पहावयास सांपडणें दुरापस्त आहे. हीं प्रकरणें इतकीं रसाळ आहेत कीं, त्यांतील बरेचसे वेंचे द्यावेसें वाटत आहे, परंतु स्थलसंकोचामुळें मनांतले मांडे मनांतच खाण्याचा प्रसंग आला आहे !

---



# श्रीधरस्वामी नाझरेकर.



कित्येक गोष्टी अशा आहेत कीं त्या प्रत्यक्ष अनुभवानेंही कळत नसतात ह्मणजे त्यांचें स्वरूपलक्षण नीटपणें बांधितां येत नाहीं. अशांपैकींच प्रपंच हा एक आहे. प्रपंच दुःखमूलक आहे, हें प्रत्येकास कळतें पण तें कळतें केव्हां? लहानपणीं कळत नाहीं, तर प्रपंचांत पडल्यावर मग प्रौढपणीं कळतें. विहिरींत पडल्यावर विहिरींत पडूं नये असें वाटणें, त्यासारखें हें आहे. 'संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें' असें एक तुकोबारायांचें वाक्य आहे; व तें अक्षरशःखरें आहे. मनुष्यें जीं अनेक पापें करितात त्यांतलीं बहुतेक तीं प्रपंचाकरितां करितात. हा प्रपंच मनुष्याकडून नानाप्रकारचीं विचित्र कर्मे करवितो. क्षणांत हंसवितो तर क्षणांत रडवितो. क्षणांत सुखाच्या अत्युच्च गिरीवर नेऊन बसवितो तर क्षणांत दुःखाच्या खोल खाईंत लोटून देतो. क्षणांत शांत स्वरूप दाखवून शांति देतो तर क्षणांत भयंकर स्वरूप दाखवून गर्भगळीत करतो. ज्याचें तोंड पाहूं नये त्याच्या पाया पडावयास लावितो; ज्यापाशीं अक्षर बोलूं नये असें वाटतें त्याच्यापुढें गोंडा घोळावयास लावितो. तात्पर्य तो जें करूं नये तें करवितो, असें असतां मनुष्यें प्रपंचास कशीं बिलगून राहतात हा एक मोठा प्रश्न आहे. ह्याचें उत्तर असें कीं संसाराच्यागाळांत मनुष्य फसत फसत फसतो. एकदम फसत नाहीं. आधीं तो प्रपंचांत जन्मतो व प्रपंचांतच लहानाचा मोठा होतो. पुनः त्याचे सभोंवर ज्या माणसांचें कडें असतें तीं माणसेंही नखशिखांत प्रपंचांतच गढलेलीं असतात. त्यामुळें तो ही त्यांच्यासारखाच प्रापंचिक होतो. पुढें त्याला त्यांतलीं लहान सहान सुखें प्राप्त होऊं लागुन त्यांवरून त्याला पुढल्या मोठ्या सुखाची आशा लागते आणि पुढें ती आशा कोळ्याच्या सुतासारखी वाढत जाऊन तिच्या जाळ्यांत तो पक्का सांपडतो. तें जाळें एवढें बळकट असतें कीं, तें त्याला कधींच तोडितां येत नाहीं; आणि त्यांत त्याञ जन्मभर रहावें लागतें. तेथें त्याचा निरुपाय होतो. ह्यालाच माया ह्मणतात. ही प्रभूची माया दुरत्यय आहे. तिचा पाश तोडणें परमदुष्कर आहे. कारण असें पहा कीं, चार पांच महिनें लागलेली संवय जर मनुष्याला सुटतां सुटत नाहीं, तर बहुतेक जन्म ज्यांत गेला आहे तो प्रपंच—तो मायापाश—त्याला एकदम कसा तोडतां येईल? बहुतेक नाहींच. आतां श्रीसमर्थ रामदासासारखे 'सावधान' ऐकिल्या बरोबर सावध होणारे किंवा प्रस्तुत चरित्रनायकानें ह्मटल्याप्रमाणें:—

'दारा धन आणि पुत्र । यांसीं आसक्त नसावें अणुमात्र ॥
अलिप्तपणें संसार । करोनि असक्त असावें ॥ १ ॥'

संसारापासून अलिप्त राहून परमार्थ साधणारे पुरुष फार विरळा! प्रस्तुत चरित्रनायकाचें चरित्रमंदीर याच अनुपम व अद्भुत् शक्तीच्या पायावर उभारलें आहे, हें पुढील चरित्र वाचलें ह्मणजे लक्षांत येईल.

श्रीधराच्या पूर्वजांचें मूळ उपनांव खडके असें होतें. हें नांव यांचे पूर्वेचांचें मूळ राहण्याचें ठिकाण जें खडकी नांवाचें गांव त्यावरून पडलें असावें असें वाटतें. खडकी हें गांव मोंगलाईतील चौसाळें महालांत आहे. खडकी येथून पंधराव्या शतकाच्या सुमारास रावोपंत खडके हे श्रीक्षेत्र पंढरपुराजवळ नाझरें या गांवीं राहण्यास गेले. रावोपंतांच्या आंगचीं शिपाईगिरी व त्यांचें अश्वविद्येचें ज्ञान पाहून यास लोक विनोदानें खडके याच्याऐवजीं घोडके असें ह्मणूं लागले व तेव्हांपासून यांचें उपनांव घोडके असें पडलें. यांचे वंशज अजूनही आपलें आडनांव घोडके असेंच लावतात.

रावोपंत घोडके यांनीं नाझरें येथील देशपांडेपणाची व कुळकर्ण्याची वृत्ति विजापुरचे दरबारांतून संपादन केली. परंपरेनें ही वृत्ति याच वंशाकडे चालली. घोडके हे माध्यंदिनशाखेचे वासिष्ठ गोत्री ब्राह्मण; वरील वृत्ति संभाळून या कुटुंबांतील पुरुष विजापूरदरबारचीं शिपाईगिरीचीं कामेंही थोडीफार बजावीत असत.

रावोपंताच्या मुलाचें नांव चंद्राजीपंत. या चंद्राजीपंतास दोन पुत्र होते. थोरल्याचें नांव गणेश व धाकट्याचें नांव दत्तात्रेय. दत्तात्रेयानें आपल्या उत्तरवयांत संन्यासदीक्षा घेतली. दत्तात्रेयास पुत्र एक, रंगोपंत. त्यास पुत्र चार (१) रामाजी, (२) बोपाजी, (३) कृष्णाजी, व (४) दत्तात्रेय. या पुत्र चतुष्टयापैकीं द्वितीयपुत्र जो बोपाजी तोच रंगनाथ निगडीकराचा पिता, हें मागें सांगितलेंच आहे. वरील चार पुत्रांपैकीं शेवटचा पुत्र जो दत्तात्रेय त्यास ब्रह्माजीपंत नांवाचा एकच पुत्र होता. हेच पुण्यशील गृहस्थ श्रीधराचे जनक होत. यांच्या पत्नीचें ह्मणजे श्रीधराच्या आईचें नांव सावित्रीबाई. या पतिपरायण साध्वीचे उदरीं श्रीधराचें जनन शालिवहान शके १६०० ह्मणजे इ. स. १६७८ चे सुमारास झालें. या वरील हकीकतीवरून श्रीरामदास पंचायतनांतील प्रख्यात साधु जे रंगनाथस्वामी निगडीकर ते श्रीधराचे चुलत चुलते होते, हें वाचकांचे लक्ष्यांत आलेंच असेल. ब्रह्माजीपंत महा प्रेमळ भगवद्भक्त होते.

ते अत्यंत नीतिमान् असून महाज्ञानी होते. त्यांचें श्रीधरानें आपल्या रसाळ वाणीनें श्रीहरिविजय ग्रंथाचे आरंभीं थोडकेंसें वर्णन केलें आहे, तें:—

'ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम करून । वानप्रस्थाहि आचरून ॥
संन्यासदीक्षा घेऊन । त्रिविध आश्रम त्यागिले ॥ १ ॥
पंढरी ये भीमातटीं । समाधिस्त वाळवंटीं ॥
पूर्ण ज्ञानी जैसा धूर्जटी । तापसियांमाजीं श्रेष्ठ ॥ २ ॥
ज्यासी बाळपणापासून । परनारी मातेसमान ॥
परद्रव्य पाहे जैसें वमन । आनंदघन स्वरूप पैं ॥ ३ ॥
कामादिक षड्वैरी । जेणें लोटोनि घातले बाहेरी ॥
ज्याच्या कृपावलोकनें निर्धारी । ज्ञान होय प्राणियां ॥ ४ ॥
जें निःसीम वेदांत ज्ञान । तें ज्यास करतलामळ पूर्ण ॥
वंदिले तयाचे चरण । ग्रंथारंभीं आदरें ॥ ५ ॥

चतुर्थाश्रम धारण केल्यावर त्यांनीं आपलें उर्वरित आयुष्य पंढरपुरास श्रीविठ्ठलचरणांजवळच घालविलें. चतुर्थाश्रमाचेवेळीं त्यांनीं 'ब्रह्मानंदस्वामी' असें नांव धारण केलें होतें. 'यथा बीजं तथांकुरः' या न्यायानें श्रीधर आपल्या तीर्थरूपांप्रमाणेंच अत्यंत प्रेमळ व विरक्त होता असें दिसतें. कारण ह्याच्या ग्रंथांत जागोजाग भक्ति, ज्ञान, वैराग्यसंबंधाचीं वर्णनें फारच हृदयंगम, द्रावक व प्रतिपाद्य विषयास अनुकूल अशा हर्षशोकादि रसांनीं ओतप्रोत भरलेलीं असून वाचकांच्या मनावर ठसा उमटविणारीं आहेत. अशीं स्वानुभवसिद्ध वर्णनें कोणी कितीही विद्वान् झाला तरी अनुभवावांचून साधावयाचीं नाहींत. 'मायेशिवाय रड नाहीं व जाळाशिवाय कढ नाहीं' अशी एक मराठींत ह्मण आहे ती याच अर्थाची द्योतक आहे.

श्रीधरानें आपल्या वडिलांपासूनच गुरुपदेश घेतला होता. त्यानें आपल्या प्रत्येक ग्रंथाच्या शेवटीं गुरुपरंपरा दिली आहे; ती अशी:—

'क्षीरसागरीं नारायण । त्याचा शिष्य चतुरानन ॥
तेथून अत्रि जाहला निर्माण । दत्तात्रेय त्यापासोनी ॥ १ ॥
त्रिदेवात्मकशरीर शुद्ध । त्या पासाव यति सदानंद ॥
तेथून रामानंद प्रसिद्ध । समाधिस्त वाराणसीं ॥ २ ॥

तेथून अमलानंदयति । पुढें गंभीरानंदमहामति ।
तेथून ब्रह्मानंद सुमति । सहजानंद तेथोनिया ॥ ३ ॥
कल्याणी जयाची वस्ती । तेथून पूर्णानंद महामति ॥
तेथून दत्तानंद सुमति । नाझरें नगरीं समाधिस्थ ॥ ३ ॥
तो पितामह आमुचा सत्य । तेथोन ब्रह्मानंद यति अद्भुत ॥
पिता गुरु तोचि समर्थ । जो कां विख्यात महाराज ॥ ५ ॥'

—पांडवप्रताप. अ० ६४. ओ०९१ ते ९५.

वरील अवतरणांतील शेवटच्या दोन ओव्यांवरून असें दिसतें कीं, पित्यानेंच पुत्राला उपदेशदीक्षा द्यावी असाच क्रम या घराण्यांत चालू होता. श्रीधराचें आपल्या मातापितरांवर अतोनात प्रेम होतें व भक्तिही पराकाष्टेची होती असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. तो त्या उभयतांना साक्षात् ईश्वर पार्वतीप्रमाणें मानीत असे. तो हरिविजयांत ह्मणतो.--

'तो ब्रह्मानंद पिता निश्चिती । सावित्री तयाची शक्ति ॥
हे तो आदिपुरुष मूळप्रकृती । मातापिता वंदिलीं ॥ १ ॥'

गुरु या नात्यानेंही त्यानें आपल्या पित्याचें अमर्याद स्तुतिस्तोत्र गायिलें आहे.

'श्री गुरुराया तूं समर्थ । हा हरिविजय आरंभीला ग्रंथ ॥
शेवटासि पावो यथार्थ । तुझ्या वरें करुनियां ॥ १ ॥
तूं मेघ वर्षसी दयाळ । तरीच हें ग्रंथ रोप वाढेल ॥
साधक चातक तृप्त होतील । भक्तीची बोल बहु होय ॥ २ ॥
माता करी प्रतिपाळ । तों तों वाढों लागे बाळ ॥
तुझ्या कृपेवीण बोल । न बोलवे सर्वथा ॥ ३ ॥
जोंवरि नाहीं वाजविता । तों पांवा न वाजे सर्वथा ॥
सूत्रधार न हालवितां । काष्टपुतळा नाचेना ॥ ४ ॥'

श्रीधर आपल्या बापाप्रमाणेंच फार विद्वान् होता, असें त्याच्या ग्रंथांवरून निदर्शनास येतें. संस्कृत व प्राकृत भाषेंत त्यानें चांगलेंच प्रावीण्य संपादन केलें होतें. तो नुस्ता काव्य शास्त्रपुराणांतच व्युत्पन्न होता असें नाहीं तर वेदांतांतही त्याची पूर्ण प्रगति झालेली होती. अनात्मनात्मसंबंधीं त्यानें आपल्या ग्रंथांत मधून मधून फार नामी विवेचन केलें आहे. तो

इतका जाडा पंडित होता तरी अत्यंत विनयसंपन्न होता. इतर विद्वानांत दिसून येणारी आढ्यता त्याच्या अंगीं तिळप्राय नव्हती. आपली वेडी-वांकडी वाणी व आरुष बोलणीं चतुर पंडितांना आवडणार नाहींत याबद्दल साशंक होऊन तो श्रीरामविजयांत ह्मणतोः—

‘ संतश्रोते चतुर पंडित । माझें बोलणें आर्ष अत्यंत ॥
जैसे सरस्वतीपुढें मूढ बहुत । वाग्विलास दावितसे ॥ १ ॥
सूर्यापुढें जैसा दीप देख । जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक ॥
कीं कनकाद्रि अति सुरेख । त्यासी अलंकार पितळेचे ॥ २ ॥
कामधेनुस समर्पिलें अजाक्षीर । चंद्रासी सीतळ करी रंभापत्र ॥
कल्पतरू कल्पिलें देणार । त्यासि निंबोळ्या समर्पिल्या ॥ ३ ॥
रत्नाकरापुढें कांचवाटी समर्पिली । तैसी माझी आर्ष बोली ॥
परि तुह्मी प्रीति ठेविली । प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ४ ॥ ’

श्रीधर इतका विद्वान् असतांही त्यानें आपले सर्व ग्रंथ प्राकृत भाषेंत केले आहेत हें केवढें नवल ! मोरोपंतांनीं, वामनपंडितांनीं कांहींतरी संस्कृत ग्रंथ केले आहेत; परंतु श्रीधरानें संस्कृताची एक ओळही लिहिली नाहीं; यांवरून प्राकृत भाषेविषयीं त्याचा अभिमान किती जाज्वल्य होता हें सिद्ध होतें. पंडितांस प्राकृत ग्रंथ आवडत नाहींत ही गोष्ट मनांत आणून श्रीधरानें प्राकृत भाषेविषयीं लिहिलें आहे.—

‘ प्राकृत भाषा ह्मणोनी । अव्हेर न करावा पंडितजनीं ॥
जैसीं कृष्णावेणीचीं तिरें दोन्हीं । परि उदक जाण एकचि । १ ।
तैसें प्राकृत आणि संस्कृत । दोहींत एकचि अर्थ ॥
जैशा दोघी स्त्रिया एकचि कांत । कीं दोन्ही हस्त एकाचेची ।२।
दोन्ही दाढा एकचि स्वर । एक पाहणें दोन्ही नेत्र ॥
कीं दों पात्रांत पवित्र । एकचि दुग्ध घातलें ॥ ३ ॥
अबलांस नकळे संस्कृतवाणी । जैसें आडांतील गोड पाणी ॥
परि तें दोर-पात्रावांचोनी । अशक्त जनां केंवि निघे ॥ ६ ॥
तोचि तडागासी येतां त्वरें । तात्काळचि तृषा हरे ॥
अबलाजना तारावया ईश्वरें । प्राकृत ग्रंथ निर्मिले ॥ ७ ॥

मुख्य संस्कृत पद्यांवें । परी तें अबळांसी नुगवे ॥
महागज कैसा बांधेव । कमळतंतू घेउनी ॥ ८ ॥
उत्तम वस्त्रें लेती नृपती । तीं दुर्बळांसी केंवि प्राप्त होती ॥
मग ते घोंगडीच पांघरती । सीतोष्ण निवारणा ॥ ९ ॥
जैसें दधी मंथितां बहुत । त्यांतून निघे नवनीत ॥
कीं स्वाति जळापासोनि अद्भुत । मुक्ताफळ निपजे ॥ १० ॥
कीं इक्षुरसापोटीं शर्करा । रसनेसि गोडी तेचि विचारा ॥
कीं राजयापासोनि राजपुत्रा । मान्यता होय बहुतची ॥ १२ ॥
मराठी वचनें निश्चित । परि अत्यंत रसभरीत ॥
मधुमक्षिकांचे मुखींहूनी स्रवत । अतिसुरस जैसा का ॥ १३ ॥
गीर्वाण हें शशीमंडळ अद्भुत । त्याची प्रभा हे प्राकृत ॥
संस्कृत ग्रंथ वर्णिती पंडित । अर्थ प्राकृत करिती पैं ॥ १४ ॥ '

रामविजय अ० १.

या वरील अवतरणावरून हें निर्विवाद आहे कीं, श्रीधरानें आपले प्राकृत ग्रंथ केवळ अबलाजनांना उपयोगी पडावे या हेतूनेंच तयार केले होते. हा त्याचा हेतु त्यावेळच्या शिक्षणाचा द्योतक आहे. पूर्वीच्या व सांप्रतच्या शिक्षणपद्धतीची तुलना मागें मुक्तेश्वराच्या व श्रीसमर्थांचे चरित्रांत केलीच आहे. त्यावेळच्या बायका जर श्रीधराचे ग्रंथ समजण्याइतक्या विचक्षण होत्या तर पुरुष किती असतील याची कल्पनाच केली पाहिजे. शिवाय त्यावेळीं आमचा स्त्रीवर्ग चांगलाच शिक्षित होता असेंही वरील उताऱ्यांवरून निदर्शनास येतें.

श्रीधरानें आपल्या वयाचे चवदावे वर्षी संन्यास घेतला असें ह्मणतात; परंतु ही गोष्ट दिसावी तितकी संभवनीय दिसत नाहीं. कारण एक तर चवदा वर्षांचें वय ह्मणजे संन्यासाश्रम घेण्याचें वय नाहीं; दुसरें प्रपंच अगदींच करूं नये असेंही त्याचें मत नव्हतें. ' अलिप्तपणें संसार । करोनी असक्त असावें ॥ ' -असें त्याचें मत होतें. यावरून असें वाटतें कीं, त्यानें कांहीं दिवस संसाराचा अनुभव घेतलेला असावा; परंतु एवढें खरें कीं, त्यानें अलिप्तपणें संसारयात्रा चालविली असावी. पुनः तिसरें कारण असें कीं, त्यानें आपल्या काव्यांत स्वतःचा नामनिर्देश करण्याचे प्रसंगीं ' श्रीधर ' हें एकेरी नांव घातलें नसतें. चतुर्थाश्रमाचेवेळीं त्यानें आपल्या पूर्वजांप्रमाणें आपल्या

नांवाला 'आनंद' हें सांप्रदायिक चिन्ह जोडिलें असतें. आपल्या सांप्रदायिक चिन्हाबद्दल श्रीधर श्रीशिवलीलामृतांत ह्मणतो.—

'श्रीधरस्वामी ब्रह्मानंद । आनंदसांप्रदाय परम अगाध ॥
क्षीरसागरीं गोविंद । आधीं उपदेशी कमलोद्भव ॥ १ ॥

श्रीधराच्या आजाचें नांव 'दत्तात्रय' असून त्यानें चतुर्थाश्रमाचेवेळीं 'दत्तानंद' असें नांव धारण केलें होतें. त्याप्रमाणेंच त्याच्या बापाचें नांव 'ब्रह्माजीपंत' असें असून त्यानेंही संन्यास घेण्याचेवेळीं 'ब्रह्मानंद' असेंच नांव धारण केलें होतें. श्रीधरानें संन्यास घेतला नसेल असें आमचें ह्मणणें नाहीं, परंतु निदान इतक्या अल्पवयांत तरी घेतला नसावा असें या अल्पमतीला वाटतें; निदान पांडवप्रताप, रामविजयादि प्राकृत ग्रंथरचना करण्यापूर्वी तरी संन्यास घेतला नसावा असें दिसतें.

'श्रीमद्भागवत' व 'श्रीमद्भगवद्गीता' ह्या ग्रंथांवर टीका करणारे जे श्रीधरस्वामी ते व प्रस्तुत चरित्रनायक 'श्रीधर कवि' हे एकच असें कोणी कोणी ह्मणतात. परंतु या दोन्ही व्यक्ति अगदीं भिन्न होत्या. कारण श्रीधरस्वामींनीं आपल्या संस्कृत टीकाग्रंथाचे आरंभीं जें मंगल केलें आहे तें 'श्रीनृसिंहपर' आहे; आणि प्रस्तुत कविवर्याच्या काव्यांत, आपली उपास्यदेवता 'श्रीनृसिंह' असल्याबद्दल कोठेंच उल्लेख दिसत नसून 'श्रीपांडुरंग' हेंच त्याचें उपास्यदैवत असल्याचें जागोजाग आढळतें. आपापल्या आराध्यदेवतेचें वंदन व स्तवन करण्याचा कविसंप्रदाय आहे; त्यास अनुसरून कोठें प्रत्यक्ष व कोठें गुप्तरीतीनें वंदनादि प्रकार असतात; पण ते त्या त्या कवींच्या काव्यांत दृश्य झाल्याशिवाय रहात नाहींत. श्री ज्ञानेश्वर, नामदेव, रामदास, तुकाराम, मोरोपंत यांनीं जरी प्रायः सर्व देवतांवर काव्यरचना केली आहे, तरी त्या प्रत्येकाची खरी उपास्यदेवता कोणती असावी, याची कल्पना त्यांचे काव्यग्रंथ पाहिल्याबरोबर होते. शिवाय दुसरें कारण असें कीं, श्रीरामविजयाचे आरंभीं कवींना वंदन करतांना श्रीधरानें या दुसऱ्या श्रीधरस्वामींचा मोठ्या प्रेमानें उल्लेख केला आहे तो असा:—

'जो श्रीधराचार्य टीकाकार । त्यासी नमस्कारीत श्रीधर ॥
मधुसूदनादिक नरेंद्र । ग्रंथ अपार जयाचे ॥ १ ॥'

यावरून पाहतां श्रीमद्भागवतादिकांवर टीका करणारे 'श्रीधराचार्य' व श्रीरामविजयादि प्राकृत ग्रंथांचा कर्ता 'श्रीधर कवि' या उभयतांच्या

फक्त नामसादृश्यावरूनच त्यांच्या ऐक्यतेविषयीं लोकप्रवार्ता झालेली दिसते; वस्तुतः हे दोन्ही ग्रंथकार अगदीं भिन्न भिन्न होते, यांत संशय नाहीं.

श्रीधराचे पूर्वज दत्तसांप्रदायी असून ते श्रीविठ्ठलोपासकच होते. त्यांच्याप्रमाणें श्रीधरही पांडुरंगभक्त होता. कविसंप्रदायाप्रमाणें विघ्नविनाशनार्थ गणेशस्मरण व चिंतन करण्याचे ऐवजीं त्यानें पांडुरंगाचेंच श्रीगणेशरूपानें ध्यान केलें आहे.—

‘ श्रीमद्भीमातट विहारा । कमलोद्भवजनका अति उदारा ॥
अनादि सिद्धा सत्पथसारा । रुक्मिणीवरा पांडुरंगा ॥ १ ॥
तूंचि जाहलासि सिद्धिविनायक । मंगलारंभीं मंगलकारक ॥
करणार तूं वर दायक । सर्व विद्याप्रद तूंचि पैं ॥ २ ॥ ’

पांडवप्रताप अ० १

‘ ॐनमोजी जगद्गुरु उदरा । श्रीमद्भीमातीर विहारा ॥
पुराणपुरुषा दिगंबरा । ब्रह्मानंदा सुखाब्धी ॥ १ ॥
तूंचि जाहलासि गजवदन । चतुर्दशविद्येचें भवन ॥
महासिद्धि कर जोडोन । सदा तिष्ठति तुजपुढें ॥ २ ॥

हरिविजय अ० १

श्रीधराचा कुलस्वामी खंडोबा होता. त्याचें वर्णन पांडवप्रतापांत त्यानें फार उत्तम केलें आहे.—

‘ वंदु कुलदैवत निश्चयेंशीं । जो मंहाराज प्रेमपुरविलासी ॥
मणिमल्लमर्दन कैलासवासी । स्वानंदराशी जगदात्मा ॥ १ ॥
वैराग्य तुरंगीं बैसला । बोध खांडा हातीं धरिला ॥
अर्धांगीं विलसे ज्ञानकळा । म्हाळसादेवी चिच्छक्ति ॥ २ ॥
तडिदंबर परम तेजाळ । कीं उगवलें मार्तंडमंडल ॥
मणिमल्लादि कुटिलखल । दळासहित मर्दिले ॥ ३ ॥
शात कुंभप्रभे समान । उधळे भावहरिद्राचूर्ण ॥
ग्रंथारंभीं मणिमल्लमर्दन । प्रेम भावें वंदिला ॥ ४ ॥ ’

श्रीरामविजयांत पहिले अध्यायांत श्रीधरानें आपल्यापूर्वी जे कवि झाले त्यांच्या गुणांचें वर्णन केलें आहे; परंतु त्यांत नामदेव व तुकाराम यांविषयीं कांहीं लिहिलें नाहीं. हे जातीचे शूद्र म्हणून यांचें वंदन करण्यास श्रीध-

राम शंका वाटली असावी किंवा दुसऱ्या कांहीं कारणावरून त्यानें त्यांची नांवें वगळलीं असावीं. यावरून एवढी गोष्ट मात्र निर्विवाद दिसते कीं, श्रीरामविजयाच्या रचनाकालापर्यंत श्रीधर पूर्ण अद्वैती बनला नव्हता. विप्र व शूद्र यांत अभेद मानण्याइतकें त्याचें मन सुसंस्कृत झालें नव्हतें. द्वैताची भावना त्याच्या मनांत अद्याप जागृत होती.

श्रीधरानें आपल्या आयुष्याचा बहुतेक काल पंढरपुरांत घालविला. त्याचे बहुतेक सर्व काव्यग्रंथ पंढरपुरांतच निर्माण झाले. त्यानें शालिवाहन शके १६९० ह्यावर्षी ह्मणजे इ. स. १७२८ त पैठण येथें समाधि घेतली. ह्यावेळीं त्याचें वय सरासरीं पन्नास वर्षांचें होतें.

श्रीधराची बहुतेक कविता ओंविबद्ध आहे. त्यानें क्वचित् अभंग व पदेंही केलीं आहेत. श्रीधराची कविता फार रसाळ व कोमळ आहे. ती बहुतेक सुलभ व हृदयंगम असल्यामुळें पुष्कळ लोक आस्थेनें वाचतात. मुख्यत्वें-करून अडाणी लोकांत व स्त्रीवर्गांत त्याच्या ग्रंथाची फार चहा आहे. तात्पर्य उपमा, रूपक, दृष्टांतादि अर्थालंकारद्वारें वाचकांच्या मनावर आपल्या प्रतिपाद्य अर्थाचा ठसा उमटण्याजोगी ग्रंथरचना करण्याची श्रीधराची शैली अवर्णनीय आहे यांत कांहीं संदेह नाहीं. त्यानें **पांडवप्रताप, हरिविजय, रामविजय, शिवलीलामृत, काशीखंड, ब्रह्मोत्तरखंड, जैमिनीअश्वमेध, पांडुरंगमहात्म्य** इत्यादि मोठमोठे ग्रंथ केले; तशीच त्यानें श्रीमद्भगवद्गीतेवर ओंविबद्ध टीकाही केली आहे असें ह्मणतात.

ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, इतर प्राचीन कवींच्या संप्रदाया-विरुद्ध श्रीधरानें आपल्या ग्रंथांत ग्रंथरचनेच्या कालाचा व स्थलाचा निर्देश करून ठेविला आहे. हरीविजय, व रामविजय हे दोन ग्रंथ पंढरपूर येथें शालिवाहन शके १६२९ त समाप्त केले. पांडवप्रतापही पंढरपूर येथेंच शके १६३४ त पुरा केला. श्रीशिवलीलामृत हा ग्रंथ शके १६४० त बारामती येथें पूर्ण केला.

हरिविजय श्रीमद्भागवतांतील दशम स्कंधाच्या व हरिवंशाच्या आधारानें लिहिला आहे. पांडवप्रताप श्रीमद्भारताच्या आधारानें लिहिला आहे. रामविजयाची रचना वाल्मीकीच्या रामायणावरून केली आहे; व शिवलीलामृताची रचना स्कंदपुराणांतर्गत ब्रह्मोत्तरखंडावरून केली आहे.

या सर्व ग्रंथात हरिविजय या ग्रंथाची कवि फार प्रशंसा करतात. मोरोपंत सन्मणिमालेंत ह्मणतात.

'हरिविजयग्रंथातें आधिं मग श्री-धरासि वंदीन ॥
शिववंदनकामांहीं वंदावा प्रथम देव, नंदी न ॥ १ ॥'

त्याचप्रमाणें महीपतिबुवा ताहराबादकर ह्मणतातः—

'हरिविजय रामविजयसार । पांडवप्रताप ग्रंथ केला थोर ॥
तो श्रीधरस्वामी नाझरेकर । पंढरपूर निवासी ॥ १ ॥'

## श्रीधराच्या काव्यांतील वेंचे.

धर्मशीलपणानें वागलें असतां काय काय सुखें प्राप्त होतात याचें श्रीधरानें पांडवप्रतापांत फार नामी वर्णन केलें आहे.—

ओंव्या.

'धर्म तेथें सदा दान । दान तेथें जनार्दन ॥
जनार्दन तेथें कमला येऊन । चिरकाल स्थिर असे ॥ १ ॥
कमला तेथें सुख विशेष । सुख तेथें सहज उल्हास ॥
उल्हास तेथें महापुरुष । संतजन मिळती ॥ २ ॥
संत तेथें वसे शांति । शांति तेथें वसे निवृत्ति ॥
निवृत्तिं तेथें निश्चितीं । समाधान सर्वदा ॥ ३ ॥
समाधान तेथें समाधि । समाधि तेथें कैंचि आधि ॥
आधी नाहीं तेथें उपाधि । नसे मग तत्वता ॥ ४ ॥

ज्याच्यायोगानें भिन्न भिन्न कुलांत उत्पन्न झालेले स्त्रीपुरुष परस्परांवर अनुरक्त होतात, ज्याच्यायोगानें मातापुत्र किंवा पितापुत्र, बंधुभगिनी एकमेकांला बांधले गेले असतात, ज्याच्यायोगानें परमेश्वर भक्तांना अगदीं अंकित होतो, त्या प्रेमाचें—प्रीतीचें—भक्तीचें स्वरूप लक्षण श्रीधरानें खालील ओंव्यांत फारच सुंदर बांधिलें आहे.—

'प्रेमावीण कायसें ज्ञान । प्रेमावीण व्यर्थ ध्यान ॥
प्रेमावीण जें गायन । व्यर्थ जैसें गौरीयांचें ॥ १ ॥
प्रेमावीण व्यर्थ पूजा । कदा नावडे अधोक्षजा ॥
प्रेमावीण अभ्यास सहजा । व्यर्थ सर्व विद्येचा ॥ २ ॥

स्त्री सर्व लक्षणीं सुंदर पूर्ण । परी पतिसेवेसी नाहीं मन ॥
तिचें चातुर्य शहाणपण । व्यर्थ काय जाळावें ॥ ३ ॥
मळसरीवीण अलंकार । भूतदयेवीण आचार ॥
कीं रविशशिवीण अंबर । तमें जैसें व्यापिलें ॥ ४ ॥
कीं गुरुकृपेवीण ज्ञान । कीं आवडीवीण भजन ॥
कीं गृहस्वामिणीवीण सदन । व्यर्थ जैसें भणभणीत ॥ ५ ॥
कीं रायावीण परिवार । कीं नासिकेवीण जैसें वक्त्र ॥
तैसें प्रेमावीण स्मरारिमित्र । कदाकाळीं न सांपडे ॥ ६ ॥'

—हरिविजय.

संसार म्हणजे दुःखाचा समुद्र. तो तरून जाण्याला रामकथारूप जहाजाशिवाय दुसरा सुलभतर मार्ग नाहीं. श्रीधर म्हणतो.—

' भवाब्धि भरला परम दुंबळ । द्वैतभावाचा तटाक सबळ ॥
माजी कुबुद्धीचे कल्लोळ । मोहजाळ असंभाव्य ॥ १ ॥
मदमत्सर थोर आवर्त । कामक्रोधादि समस्त ॥
आशा तृष्णा भ्रांती तेथ । मगरी थोर तळपती ॥ २ ॥
लोभ मोह नक्र थोर । ममतेच्या लाटा अति दुर्धर ॥
दंभ आणि अहंकार । थिरोळे हे तळपती ॥ ३ ॥
अविवेक हे डाकिणी तत्वतां । अविद्या भ्रांति जळदेवता ॥
पीडिती जीवां समस्तां । आशा तृष्णा कल्पना ॥ ४ ॥
ऐसा अगाध भवनिधि थोर । तेथें रामकथा जहाज सुंदर ॥
शिल्पकार वाल्मीक ऋषीश्वर । तारूं तेणें निर्मिलें ॥ ९ ॥
ऐसें भवसागरीं तारूं थोर । गुरुकृपेचें केणें अपार ॥
भरूनि मोक्ष द्वीपांतर । लागवेगें पाविजे ॥ १२ ॥'

—रामविजय.

चिता आणि चिंता या दोन शब्दांत फक्त अनुस्वाराचाच काय तो फरक; परंतु चिता मेलेल्यांना जाळते व चिंता जिवंत प्राण्यांचेंच भस्म करते. चिंतेसारखा मनुष्यांचा दुसरा कोणी शत्रुच नाहीं.—

' जेंवि कांजी पडतां बिंदुमात्र । घट भरोनि नासे क्षीर ॥
तेंवि सर्व सद्गुणांचा संहार । चिंता करीत क्षणमात्रें ॥ १ ॥

जो चिंतार्णवामाजीं पडला । तो परपारासि नसेचि गेला ॥
माजी विश्रांति घ्यावया तयाला । मध्य बेट तें असेना ॥ २ ॥

—जैमिनि अश्वमेध.

मातेसारिखें दैवत नाहीं. सर्व वस्तु मिळतात पण माता मिळत नाहीं. सर्वांच्या उपकारांतून सुटतां येतें परंतु मातेचे उपकारांतून मुक्त होणें परम दुर्घट आहे. मातेच्या प्रेमाला तुलना नाहीं; तिचें आपल्या अपत्यांवरील प्रेम निर्हेतुक असतें. 'निराम की मा' हा दोहा प्रसिद्धच आहे.–

'मातेची आज्ञा सर्वथा । न मोडावी प्रमाण शास्त्रार्था ॥
संन्यास जरी घेतला तरी माता । वंदावी हें साचार ॥ १ ॥'

—रामविजय.

कीर्तीसारखें भूषण नाहीं. अपकीर्तीचें जिणें अत्यंत लाजिरवाणें असतें. अपकीर्ति करून घेऊन जिवंत रहाण्यापेक्षां मरण फार चांगलें. तरी 'तनु त्यागितां कीर्ति मागें उरावी' हें श्रीसमर्थांचें वाक्य प्रत्येकानें आपल्या हृदयांत सांठवून ठेवण्याचा प्रयत्न करावा.

'कीर्तिविरहित जन्म । तो परम दुर्वर्णासमान ॥
त्यासी न भेटे सर्वोत्तम । व्यर्थ वांचणें तयाचें ॥ १ ॥
कीर्तिनिमित्त सोडिती प्राण । कीर्तिनिमित्त टाकिती राज्यधन ॥
लोकनिंदा तस्कर दारुण । सत्कीर्तिधना चोरिती ॥ २ ॥'

—अश्वमेध.

परोपकारासारखें पुण्य नाहीं. परोपकारांत शरीर झिजविलें असतां त्याला जें एकप्रकारचें अनुपम सौंदर्य येतें तें चंदनलेपनानें येत नाहीं. श्रीधर ह्मणतो.—

आपणासमान विश्व पाहत । पराच्या मोदें अति संतोषत ॥
परक्लेशें व्याकुळ चित्त । परोपकारी पुरुष तो ॥ १ ॥
संकटीं पडतां प्राणी । पाठीस घाली कृपा करूनी ॥
केलें सुकृत न वदे वदनीं । परोपकारी पुरुष तो ॥ २ ॥
धिक् संपदा धिक् ज्ञान । धिक् विद्या धिक् अभिमान ॥
परोपकार केलियाविण । संपत्ति विधवा निंद्य ती ॥ ३ ॥

—पांडवप्रताप.

शिवलीलामृतांत दाशार्ह राजाचें आणि त्याच्या स्त्रीचें वर्णन केलें आहे.

या एका ल्हानशा उताऱ्यावरूनच श्रीधराची वर्णनशैली किती अप्रतीम होती हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल.—

जैसा शुद्ध द्वितियेचा हिमांश । तेंवि ऐश्वर्य चढलें विशेष ॥
जो दुर्बुद्धि दासीस । स्पर्श न करी कालत्रयीं ॥ १ ॥
सद्बुद्धीधर्मपत्नीशीं रत । स्वरूपाशीं तुळिजे रतिकांत ॥
दानशस्त्रें दरिद्र समस्त । याचकांचें निवटिलें ॥ २ ॥
त्याची कांता रूपवती सती । काशीराजकुमारी कलावती ॥
जीचें रूप वर्णी सरस्वती । विश्ववदनें करोनी ॥ ५ ॥
जे लावण्यामृतसागरींची लहरी । खंजनाक्षी बिंबाधरी ॥
मृदुभाषिणी पिकस्वरी । हंसगमना हरिमध्या ॥ ६ ॥
शशिवदना भुजंगवेणी । अलंकारांस शोभा आणी ॥
दशन झळकती जेंवि हिरकणी । बोलतां सदनीं प्रकाश पडे ।७।'

श्रीधराची कविता नवरसांनीं पूर्णपणें श्रृंगारलेली आहे. प्रत्येक रसाचीं उदाहरणें देण्यास येथें जागा नाहीं. वर दिलेल्या उदाहरणांवरून त्याची कविता करण्याची शैली कशी काय होती, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईल. त्याची शब्दरचना सरळ आणि सुंदर आहे. त्याच्या कवितेवरून तो रसिक असून चतुर होता असें दिसतें. आतां त्यानें केलेल्या पदांपैकीं एक पद देऊन हा भाग आटोपूं.

पद.

'सखया रामा, विश्रांति तुझिये नामीं । ह्मणउनि मजला ने लवें निजसुखधामीं ॥ सखया० ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी । पशु-सुत जाया-धन-धामीं प्रीती मोठी ॥ माझीं माझीं ह्मणुनी म्यां धरिलीं पोटीं । त्यांच्या संगें भोगिल्या दुःखकोटी ॥ सखया०॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही । शववत झालों मागुता कौतुक पाहीं ॥ परि खल जन हे नेदिति कवडी तेही ॥ परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ सखया० ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची भीती । जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती ॥ यांचीं दुःखें तुजला मी सांगूं कीती । ह्मणउनि येतो श्रीधर काकू-ळती ॥ सखया० ॥ ३ ॥'

# मोरोपंत.

महाराष्ट्र भाषासुंदरीचा विलास, सरस्वती देवीच्या कंठांत आपाद रुळणाऱ्या मौक्तिकमालेंतील मध्यमेरु, निसर्गदेवतेचा चाहता बालक, भारत-रामायणादि पौराणिक ग्रंथांचा महाभक्त, विद्यादेवीचें मंदीर प्रकाशमान करणारा अपूर्व रत्नदीप, अनुप्रास यमकादि अलंकारांचा खजीनदार, व्यवहारशास्त्राचा अमर्याद सागर, बुद्धिमत्तेचें आगर, कवितादेवीच्या राज्यांत गोपाळांच्या कसरतीसारखे रूपकोपमांचे अनेक चमत्कार व अष्टोत्तरशत रामायणांचे अद्भुत प्रकार करणारा मल्ल, कुरुक्षेत्राच्या रणमैदानावर कौरव-पांडवांमध्यें घडलेल्या भयंकर युद्धाचीं हृत्पटलावर हुबेहुब चित्रें वठवून देणारा चित्रकार, हृदयद्रावक प्रसंगाचें यथातथ्य वर्णन करून रसिकजनांचीं हृदयें विकल करून त्यांच्या डोळ्यांवाटे अश्रुपूर वाहविणारा केवळ नट असा हा महाराष्ट्र कविश्रेष्ठ मोरोपंत इ० स० १७२९ मध्यें कोल्हापुराजवळ पन्हाळगडीं जन्मला. याच्या वडिलांचें नांव रामाजीपंत पराडकर व आईचें नांव लक्ष्मीबाई. पंतांनीं आपल्या मातापितरांचीं व बंधुभगिनींचीं नांवें आपल्या काव्यांत दिलीं आहेत; तीं अशीं:—

‘ धन्य श्रीराम पिता धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली ।
आ्ली सत्यवतीची कीं भारतकीर्ति सुनमुखीं आली ॥ १ ॥
मातेहूनि बहु दया केली आदर धरूनि आकानें ॥
विष्णुपदा ! तारीं गुण घ्यावेचि इचे करूनि ‘ आ ’ कानें ॥२॥’
‘ वदला प्रसन्न चित्तें साहित्य करूनि बंधु आबा ‘ जा ’ ॥
विष्णुपदा ! तारावा, याची सगुणा तशीच बा भाजा ॥ ३ ॥ ’

पंतांचे वडील पेशवाईकरितां हपापलेल्या बाबूजी नाईक बारामतीकरांचे पदरीं कारकून होते. या नाईकांनीं ते पेशव्यांचे आप्तसंबंधी असतांही त्यांच्या घरातुन पेशवाईचें पद काढून आपल्या घराण्यांत आणण्याकरितां काय काय खटपटी केल्या हें इतिहासज्ञांस माहीत आहेत! आपल्याला पेशवाई मिळत नाहीं हें पाहून राजश्रींनें पुढें ती रघोजी भोसल्याला मिळावी म्हणून अटोकाट प्रयत्न केले; पण पेशव्यांच्या शिकंदर सद्दीपुढें यांच्या कपटफाशाचा जोर चालला नाहीं! भर्तृहरीनें म्हटल्याप्रमाणें ‘ ॥ जे कां व्यर्थपरार्थ हानि करिती ते कोण कीं दुर्मती ॥ ’ असल्या

या स्वजातिद्रोह करणाऱ्या नरपशूंना काय विशेषण द्यावें हेंच आम्हांला कळत नाहीं !

असो. या आपल्या अप्पलपोट्या यजमानाचें मयूरपंतांनीं आपल्या शीलानुरूप फारच चांगलें वर्णन केलें आहे. "आपल्या पोळीवर अधीक तूप घालील तो चांगला" या म्हणीस अनुसरून पंतांनीं त्यांचे पोवाडे गाईले असल्यास पंताच्या हातून हें कृत्य चांगलें झालें नाहीं असें आम्हांस मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें; परंतु हें त्यांनीं व्याजोक्तीनें केलें असल्यास 'पंतांसारखे चतुर पंतच' असें मोठ्या कौतुकानें म्हटलें पाहिजे ! बाबूजी नायकासंबंधी पंत म्हणतात.—

'श्रीबाबुराय प्रभु माझा अत्यंत सदय अन्नद हा ।
अर्थिजना न म्हणो दे जैसा तप्तांस जेंवि सन्नद हा ॥ १ ॥
दाता वक्ता योद्धा तेजस्वी मानधन असा मान्य ।
अतुळें पितृप्रसादें मंडित देवव्रता असा मान्य ॥ २ ॥'

वडिलांच्या पश्चात् नायकांचे येथील कारकुनीचें काम पंतांकडे आलें. पंत कारकुनीच्या कसबांत हुशार असून फार प्रामाणिक होते. त्यांनीं एकदां एक पाव आण्याची लागलेली चूक शोधून काढण्यास लागोपाठ तीन रात्रीं जागरण केलें. हें पाहून त्यांचे यजमान त्यांस म्हणाले, "मोरोबा पाव आण्याच्या शोधाकरितां तुम्ही जितके श्रम केले तितकेच जर ईश्वरशोधार्थ करतास तर व्यर्थ जाते काय ?" हें ऐकून पंतांस अनुताप झाला; आणि त्यांनीं लागलीच कानावर लेखणी होती ती यजमानांच्या पायावर वाहिली व घरीं राहण्याची आज्ञा मागितली. तेव्हां त्या यजमानांनींच त्यास पांचशें रुपये साल करून पुराण सांगावयास आपले घरीं ठेविलें. 'एकाजनार्दनी' संबंधीही अशीच एक आख्यायिका ऐकण्यांत आहे. परंतु एका विद्वान् गृहस्थानें असा नवीन शोध लाविला आहे कीं, 'पंत नौकरीचे पेशानें कधीं ही कोणाजवळ राहिले नव्हते.' आतां या अशाप्रकारच्या भिन्न भिन्न मतांतून सत्यान्वेषणाचा मार्ग शोधून काढणें बरेंच बिकट आहे !

असो. पंतांच्या पत्नीचें नांव '**रमाबाई**' होतें असें त्यांच्या कवितेवरून कळतें. ही साध्वी फार सुशील असून पतिसेवेंत नेहमीं दक्ष असे. पंतांना काशीयात्रेस जाण्यास तिनेंच उद्युक्त केलें असें म्हणतात. त्यांच्या मनांत तिजसंबंधीं चांगलाच आदर असे. तिच्याविषयीं पंत म्हणतात.—

'मी जरि अशक्त निर्धन कोपी तरि बहु भली रमाभार्या ।
ईतें सद्गति दे तूं हेंचि करि प्रथम बोध या कार्या ॥ १ ॥'

अशाप्रकारचे पत्नीचे गुणानुवाद गाणारे पति थोडेच सांपडतील! विविध प्रकारांनीं भरलेल्या या विचित्र संसारांत जिकडे जिकडे दृष्टि फेंकावी तिकडे तिकडे पतिपत्नींचा संबंध फारच चमत्कारिक आढळतो. जेथें पत्नी शांत तेथें पतिराज तापट व जेथें पतिराज शांत तेथें पत्नी तापट! तुकारामबुवा सहनशील तर त्यांची पत्नी जिजाबाई तापट व कजाग. सॉक्रेटीस शांतीचा व क्षमेचा केवळ सागर तर त्याची बायको त्याच्या अगदीं उलट स्वभावाची! एवंच काय उभयतांचा बहुतेक छत्तिसाचा आंकडा आढळतो. नवऱ्याचें तोंड पूर्वेस तर बायकोचें पश्चिमेस! पंतांची बायको जर जिजाबाईसारखी किंवा झांतिफीसारखी तापट असती तर अमृतरायांनीं ह्मटल्याप्रमाणें पंतांना 'यासाठीं रुचली गंगातिरीं झोंपडी' असें ह्मणावयाची केव्हांच पाळी आली असती!

. हे कवि १७८८ मध्यें काशीला गेले. जातांना त्यांनीं आपली कविता बरोबर नेली होती. ती काशीच्या पंडितांस पसंत पडली. हे कवि १७२४ त मृत्यु पावले.

ह्या कवींची प्रसिद्धि आर्यांवरून फार आहे. एकादी उत्तम आर्या आढळली, कीं ही मोरोपंतांची, असें मनांत आल्यावांचून रहात नाहीं. ह्यांची कविता करण्याची शैली उत्तम असून, मराठी भाषा ह्यांचेपुढें जणूं काय हात जोडून साक्षात् उभी होती असें दिसतें. ह्यांच्या ग्रंथांत अर्थ गौरव, अर्थ गांभीर्य, प्रसाद, शब्दसौष्ठव वगैरे जे कवितेचे अप्रतिम गुण ते विशेषेंकरून आढळतात. पंतांची वाणी शुद्ध, प्रौढ, सरळ आणि प्रसंगविशेषीं अत्यंत रसाळ व हृदयंगम अशी आहे. पंतांच्या कवितेचें दुसरें मोठें लक्षण असें आहे कीं, संपूर्ण रसवर्ग जणूं काय त्यांच्या अगदीं स्वाधीनच होता असें आढळतें. कुशल चितार्‍यापाशीं सर्वप्रकारचें रंगसाहित्य जसें सदैव सिद्ध असतें, पाकाचार्यापुढें पदार्थ जसे तयार असतात, गायकाचार्यापुढें तालरागसुरादि गोष्टी जशा सदोदित सिद्ध असतात तशी कवितासुंदरी यांच्या जणूं काय अगदीं अंकितच होऊन गेलेली होती असें वाटतें. तांच्या कवितेचें थोडक्यांत वर्णन करावयाचें ह्मटलें ह्मणजे ती एक ज्ञानादिजलांनीं दुथडी भरून वाहणारी महानदी, नास्तिकजनांच्या अज्ञानमलानें आवृत्त झालेल्या नेत्रांत ज्ञानांजन घालून त्यांना ईश्वरचरणारविंदीं निलिंदा-

यमान करून सोडणारी अंजनशलाका, शत्रूंचें अमर्याद सैन्य व अद्भुत पराक्रम पाहून ज्यांचे डोळे थिजले आहेत व ज्यांचीं हृदयें निरुत्साह झालीं आहेत अशा वीरांना उत्तेजन देऊन त्यांच्या शरीरांतील गोठलेलें रक्त उसळविणारी इतकेंच नव्हे तर त्यांचे बाहु प्रस्फुरित करून त्यांच्या आंगरख्यांचे बंद तटातट तोडणारी व त्यांच्याकडून 'मरूं किंवा मारूं' असा दृढनिश्चय करविणारी मूर्तिमंतवीरश्री, श्रेष्ठ पुरुषांच्या साधुचरित्रांचें रहस्य गोड शब्दांनीं सांगून इहपरलोकीं कृतार्थ करणारी दयाघन माउली, विचित्र संसारांतील तापत्रयांनीं त्रस्त झालेल्यांना क्षणभर शांत करून सुखानंदांत तल्लीन करून सोडणारी कल्पतरूची घनदाट छाया, दुष्ट मनोविकारांची खळखळ बंद करून व त्यांच्या हृदयांत उदात्त व प्रेमळ मनोवृत्ति जागृत करून शांतिजलाचा पाट वाहविणारी निर्मळ निर्झरी व शृंगाररसलोलुपांना तर जिनें श्लेषोक्तीनीं छाटल्याप्रमाणें संस्कृतवाणीच्या सुवर्णसूत्रांनीं जागोजाग विणून काढलेलें व अनुप्रासांनीं स्थलविशेषीं विचित्र केलेलें उज्वल वस्त्र परिधान केलें आहे व जिनें चरणांत रुणझुण रुणझुण असा कर्णमनोहरनाद करणारे यमकरूपी पैंजण घातले आहेत अशी रंगभूमीवर प्रवेश करणारी नटीच अशी आहे.

अशा या पंतांच्या सर्वगुणसंपन्न व सर्वांगसुंदर भाषासुंदरीला व तिच्या बरोबरच तिला नानाविध अलंकारांनीं मंडित करून नटविणाऱ्या तिच्या पंचप्राणेश्वराला, अर्धाकच्च्या इंग्रजी शिक्षणानें ज्यांचे डोळे दिपून गेले आहेत अशा ज्ञानलवदुर्विदग्ध इंग्रजी पंडितांनीं बरेच दोष दिलेले आहेत. हे पंडित ह्मणतात. 'मोरोपंत मुळींच कवि नव्हते; इतकेंच काय पण तादृश्य रसिकही नव्हते; ते केवळ भाषांतरकार होते. कांहीं तरी लिहावें, मात्रा आणि यमक साधलें ह्मणजे झालें, किंबहुना मात्रा, यमक व अपरिचित्त शब्द यांतच कायतो रस आहे असें त्यांना वाटत असे.' कित्येक ह्मणतात, 'पंतांची कविता दुर्बोध आहे व संस्कृत शब्दप्राचुर्यामुळें ती क्लिष्ट झाली.' कित्येक ह्मणतात.—'त्यांनीं आपली कविता केवळ कीर्तीसाठीं रचिली आहे, परमेश्वराच्या स्तुतिसाठीं नाहीं; त्यांनीं फार गर्वोक्ति प्रकट केली आहे व त्यावरून त्यांचेठिकाणीं परमेश्वरभक्ति होती असें दिसत नाहीं वगैरे वगैरे.'

'यांपैकीं बरेच आक्षेप आपोआप नाहींतसे झाले आहेत, कांहीं आक्षेपांचें क.० वि. कृ. चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधमालेंतील 'मोरोपंतांचें

कविता' या निबंधांत व त्याचप्रमाणें बाळकृष्ण मल्हार हंस यांनीं आपल्या निबंधावलींत उत्कृष्ट खंडन केलें आहे व कांहीं आक्षेप पंतांची कविता वाचल्याबरोबर नाहींसे होणारे आहेत.' मोरोपंत ईश्वराचे किती प्रेमळ भक्त होते याची साक्ष ज्यानें कोणीं 'केकावली' 'आर्या केकावली' व 'संशयरत्नमाला' हीं प्रकरणें वाचलीं असतील त्याला सहजीं पटणारी आहे. पंतांनीं आपली वाणी, त्यांनींच स्वतः ह्मटल्याप्रमाणें:-

'आर्यकथाछंदानें आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें।
यांहीं माझें तनुवाक्कर्ममनः पाप सर्वथा हरलें ॥ ९ ॥'

चित्तशुद्धि होऊन भगवत्प्रसाद मिळविण्याकारितां ईश्वरी लीलेचें व साधुचरित्राचें भाविक वर्णन करण्यांतच खर्ची घातली आहे. पंतांना कीर्तीची अपेक्षा नव्हती असें आह्मी ह्मणत नाहीं परंतु या बाबतींत त्यांना दोष देण्याला मात्र तयार नाहीं. 'काव्यं यशसेऽर्थकृते' यशःप्राप्तीची इच्छा हा काव्य करण्याचा पहिला हेतु असें मम्मट ह्मणतो; शिवाय कीर्तिसाठीं कोण हपापलेला नसतो! लोकांत आपल्याला चारचौघांनीं भलें ह्मणावें ह्मणून एखादा अक्षरशत्रुही यथाशक्ति खटपट करीत असतो तर मग आमच्या या बिचाऱ्या कवीनें तसा हेतु मनांत धरून काव्य केलें असल्यास आतां तशा हेतूनें त्यानें केलें नाहीं, ही गोष्ट वेगळी—त्यांत त्यानें दोषास्पदसें तें काय केलें? पुनः आणखी वामनपंडितांनीं ह्मटल्याप्रमाणें, 'स्वकीर्तीच्याठायीं प्रचुर रति' असणें हें तर सत्पुरुषांच्या आंगीं निसर्गतःच असणाऱ्या षड्लक्षणांपैकीं एक लक्षण आहे!

'पंत कवि नसून ते भाषांतरकार होते' असें ह्मणणाऱ्यांच्या धाष्टर्याची कमाल वाटते. या पंडितांनीं पंतांच्या काव्यमहोदधींत यत्किंचित् जरी प्रवेश केला असता तरी त्यांनीं पंतांच्या कवितेबद्दल असलीं अनुदार मतें प्रकट करून आपल्या बुद्धीचें प्रदर्शन केलें नसतें. पंतांनीं रामायणादि ग्रंथ मुळास धरून जरी केले आहेत तरी ते स्वतंत्रबुद्धीनें रचल्यासारखे मनोवेधक वठले आहेत. पंतांच्या कवितेंत जागोजाग मनोरम पद्यें, ठिकठिकाणचीं रमणीय वर्णनें, कल्पना वगैरे महाकवीच्या कृतींतुन आढळणारे सर्व प्रकार भरपूर आहेत. 'ज्या कोणास पंतांच्या कवित्वगुणाची परीक्षा घ्यावयाची असेल त्यानें 'केकावली' काव्य पहावें. तें हातीं घेतलें असतां कालिदासाचें गुणसर्वस्व जसें 'मेघदूतांत' आढळणारें आहे, जगन्नाथाच्या

वाणीचें रससर्वस्व जशी 'गंगालहरी' प्रकट करते त्याप्रमाणेंच वरील केकावही प्रस्तुतकवीच्या गुणांविषयीं निर्णायक होईल.'

वरील आक्षेपाप्रमाणेंच 'पंत रसिक नव्हते' असें ह्मणणेंही अगदीं अप्रशस्त आहे. पंतांसारखा रसिक कवि फारच विरळा! ज्यांच्या भाषासुंदरीचें मनोहर व उज्वल स्वरूप व अलौकिक थाटमाट पाहून जोशीबुवांसारखी रसिक मंडळीही तल्लिन होऊन त्यांच्या अगदीं नादीं लागली त्या पंतांस अरसिक ह्मणणें ह्मणजे हंसाला कावळा व घोड्याला गाढव ह्मणण्यासारखेंच आहे! त्यांचीं काव्येंच त्यांच्या रसिकत्वाची साक्ष देतील. पंतांची कविता शृंगारवीरकरुणादि नवरसांनीं कशी नटलेली आहे; हें ज्यांना पाहणें असेल त्यांनीं भारतांतील 'शर्मिष्ठा व ययाति,' 'उर्वशीकृत अर्जुन विलोभन,' 'कींचककृत द्रौपदीप्रमाथ,' 'कीरातार्जुनयुद्ध,' 'भार्गवभीष्मयुद्ध' 'नल दमयंतीला निजल्याजागीं अरण्यांत सोडून जात आहे तो प्रसंग,' 'चारी भाऊ मरून पडले असतां धर्माचा शोक,' 'दुःशासनवध' वगैरे वगैरे प्रसंग अगत्य अगत्य पहावे!

आतां दुर्बोधत्वादि जे आक्षेप पंतांच्या कवितेंत आहेत त्यांचा निकाल त्यांनींच लावून टाकिला आहे. ते ह्मणतात.—

'प्राकृत ह्मणोनि निर्भर हांसोत अतज्ज्ञ नीच मत्कृतिला।
पार जाणशील बा तूं! रसिककविवरा! मनीं चमत्कृतिला ॥१॥
'प्राकृतसंस्कृतमिश्रित यास्तव कोणी ह्मणेल ही कंथा।
भवशीतभीतिभीतस्वांतांला दाविला बरा पंथा ॥ २ ॥'

'ह्मणजे एकीकडे जुने संस्कृताभिमानी व प्राकृतविद्वेषी पंडित व दुसरीकडे केवळ प्राकृताभिमानी लोकांचा पंतांवर कटाक्ष होता. प्राकृतविद्वेषी पंडितांस पंतांनीं जुन्या मराठी कवींप्रमाणेंच उत्तर दिलें आहे; तें असें.—

'गीर्वाणें राघवाचें यश रसिकजना लागतें फार मिष्ट!
तैसें न प्राकृतानें' अचतुर ह्मणती, मानिती तें न शिष्ट! ॥
पीतां गोक्षीर कार्तस्वरमणिचषकें देतसे जेंवि गोडी।
सारज्ञाला पलाशद्रुमदळपुटकें सेवितां तें न सोडी ॥ १ ॥'

ह्मणजे तात्पर्य काय गाईचें दूध सुवर्ण पात्रांतून प्यालें काय, आणि पळसाच्या द्रोणांतून प्यालें काय सारखेंच गोड लागतें; दिवा सुवर्णाच्या समयींत लाविला काय आणि विरूपशा खापरींत लाविला काय तो प्रकाश

सारखाच देतो; उत्तम सुग्रासभोजन सुवर्णपात्रांत जेविलें काय आणि केळीच्या पानावर जेविलें काय, रुचि सारखीच; गंगोदक रत्नकुंभांत भरून ठेविलें काय किंवा मातीच्या घड्यांत भरून ठेविलें काय ? जलांत भिन्नता येत नाहीं; ज्ञान, आनंद व परमार्थ कोणच्याही भाषेचेद्वारें प्राप्त झाले तरी सारखेच. भाषाभिमान सोडून सूज्ञानें अर्थाकडे दृष्टि द्यावी. प्राकृताभिमानी लोकांस पंत ह्मणतात. 'संस्कृत भाषेत शब्दभांडार फार मोठें आहे. मराठी भाषा अद्याप तितकी संपन्न झाली नाहीं; मी नाइलाजानें संस्कृत शब्दांची योजना करीत आहे. माझ्या संस्कृत प्राकृत मिश्रित कवितेची तुह्मीं गुणज्ञ हळूहळू गोडी घेऊं लागलां ह्मणजे कालांतरानें तुह्मांस तिचा परिचय होऊन ती कठीण वाटणार नाहीं व प्राकृत भाषाही येणेंकरून सर्वांग पुष्ट होईल.' पंतांच्या या समर्पक उत्तरांनींही ज्यांच्या मनांतील पंतांसंबंधी असणाऱ्या अनुदारत्वाला 'खो' बसणार नाहीं तर मग त्यांच्यासारखे दुराग्रही तेच असें मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. अशांचें समाधान 'बुझावूं शकेना विधाता तयाला' या वामनपंडितांच्या उक्तीप्रमाणें कोणालाही करितां येणार नाहीं ! आतां येथें मात्र येवढें ह्मटल्यावाचून राहवत नाहीं कीं ज्यांस संस्कृताचा गंधही नाहीं अशांस पंतांची कविता समजण्यास जरा जड जाईल. तथापि रा. रा. मयूरभक्त पांगारकर यांनीं ह्मटल्याप्रमाणें बेताबाताची व्युत्पत्ति, थोडेंसें गीर्वाण भाषेचें ज्ञान व खरी रसिकता अंगीं असल्यास पंतांच्या कवितेची गोडी कोणासही लागेल इतकेंच नाहीं तर त्यांनीं पंतांची आर्या कांहीं दिवस वाचण्याचा अव्याहत क्रम सुरू ठेविल्यास त्यांस परशुरामपंत तात्या गडबोल्यांप्रमाणें दहापांच आर्या वाचल्याशिवाय झोंप येणार नाहीं !

असो. येथपर्यंत पंतांच्या कवितेची योग्य दिशा दाखवून तिच्यावर आक्षेप घेणाऱ्या अहंमन्य पंडितांच्या कांहीं आक्षेपांचा यथाशक्ति समाचार घेतला. आतां आणखी एकप्रकारचे आक्षेपक राहिले. ते ह्मणतात. "पंताची कविता, विविध वृत्तघटित, शब्दचमत्कारवती, यमकानुप्रासांच्या बेड्यांनीं जखडलेली व संस्कृत कवितेप्रमाणें लांब लांब समासांनीं घटित केलेली आहे; अशाप्रकारचे परिश्रम घेऊन तयार केलेल्या कवितेंत प्रसाद कोठला ? रसिकत्व कोठलें ? व ती कविता तरी कसची !" या रसिक अक्षेपकांस उत्तर देऊन त्यांची संभावना करणें या नूतन लेखणीला जरा कठिण आहे; कारण ह्या अंतरंगांतच केवळ तल्लीन होणाऱ्या साधुपुरुषांचें

समाधान करण्याजोगें कसब अद्याप या लेखणीला साधलेलें नाहीं तथापि चार शब्द लिहिल्याशिवाय तिच्यानें राहवत नाहीं. अंतरंगाबरोबर बाहिरंगाचाही विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ असें पहा कीं, एकाद्याजवळ मनमुराद पैसा आहे, स्वतः सद्गुणाचा पुतळा आहे, दयाळु आहे, त्याला पद्मिनीसारखी स्त्री आहे व देवाचार्यासारखी विद्वता आहे, पण एक शरीर जर सुदृढ नाहीं तर त्या सौख्यांचा व सद्गुणांचा काय उपयोग! मनःसौंदर्याबरोबर शरीरसौंदर्यही पाहिजे. एकादें पक्वान्न कोठेंही आणि कसेंही खाल्लें तरी त्याची गोडी सारखीच असते हें खरें; पण तेंच भोंवताली नानातऱ्हेच्या चित्रविचित्र रंगावली काढल्या आहेत; अगरबत्त्यांचा घमघमाट सुटला आहे, अंगास सुवासिक केशराची उटी मर्दन केली आहे, अशा थाटांत एकादें सुंदर रुप्याचें ताट ठेऊन त्यांत चटण्या कोशिंबिरींचे मध्यभागीं सुवर्ण-रत्नालंकारमंडित गौरकरांबुजानें आणून केशरीभात वाढिला तर त्याच्या सेवनापासून जो आनंद व जें सुख उत्पन्न होईल तो आनंद आणि तें सुख तेंच पक्वान्न एकाद्या अशौच व भयाणस्थलीं हातांत घेऊन पिशाच्चवत् सेवन करण्यांत आहे काय? स्त्रीभोगसुख स्त्री कसल्याही प्रकारची असली तरी सारखेंच मिळणार हें खरें आहे; पण जिचें मुखकमल चंद्राप्रमाणें सुंदर व सुप्रसन्न आहे, कंठ कोकिलेप्रमाणें मधुर, कानास आनंद देणारा असा आहे, नेत्राचेठिकाणीं एकप्रकारचें विशेष पाणी खेळत असून जी वस्त्राभरणांनीं अगदीं खचून गेली आहे अशा नवयौवनसंपन्न गजगती स्त्रीकडे पाहून पुरुषांची चित्तवृत्ति अगदीं तल्लीन कां होते? किंवा दुसऱ्या शब्दांनीं ह्मणावयाचें ह्मणजे जिचे गाल खोल, चेहरा म्लान, डोळे मिचमिचीत, आवाज कर्णकटु, अंगावर एक फुटका मणिही नाहीं व जी एक जाडेंभरडें सुती वस्त्र नेसली आहे अशी अप्सरा एकाद्या पुरुषाच्या मनांत न भरण्याचें कारण काय? ह्या दोनचित्रांच्या निवडानिवडीचा निकाल ज्यानें त्यानें स्वतःच्या मनासच विचारून करावा!

आह्मी याचें उत्तर असें देतों कीं, 'हिरा सुवर्णाच्या कोंदणांत जसा खुलतो तसा तो शिशाच्या कोंदणांत शोभा देत नाहीं;' ह्मणजे कविता रसादि अंतर्गुणांनीं व त्याप्रमाणेंच यमकानुप्रासादि बाह्यगुणांनींही मंडित असली पाहिजे. पंतांना यमकानुप्रासयुक्त कविता करण्यास फार परिश्रम पडले असतील असें आह्मांला वाटत नाहीं. प्रथम कदाचित् थोडेसे श्रम पडले असतील परंतु पुढें तें काम त्यांच्या अगदीं अंगवळणीं पडलें असावें

असें दिसतें. शास्त्रीबुवा ह्मणतात; " मोरोपंतांनीं शब्दचित्राचे जे प्रकार केले आहेत ते भारवि व माघ यांच्याप्रमाणें आपल्या मोठमोठाल्या ग्रंथांच्या मध्येंच न करतां अगदीं निराळे केले आहेत; शिवाय ते ह्मणण्यासारखे कृत्रिमही नाहींत. खड्गबंध, गोमूत्रिकाबंध, मुरजबंध, समुद्गयमक, सर्वतोभद्र हे किंवा असले दुसरे प्रकार त्यांच्या रामायणांत मुळींच नाहींत; अष्टोत्तर-शतांपैकीं जीं कांहीं छापून निघालीं आहेत त्यांतील बहुतेक तर निरनिराळ्या छंदांत रचिलीं आहेत येवढेंच काय तें त्यांचें वैचित्र्य; कित्येकांत ' उमा,' ' काशी,' ' शिव ' अशीं नांवें व कोठें कोठें ऋषींचीं नांवें, तीर्थांचीं नांवें वगैरे साधलीं आहेत. तेव्हां एकंदर रामायणसमूहांत अमळ करामतींचीं ह्मटलीं ह्मणजे ' परंतु रामायण,' ' दामरामायण,' ' लघ्वक्षर रामायण,' ' मंत्र-रामायण,' व ' निरोष्ठरामायण ' येवढींच काय तीं होत. पण हीं साधण्यास-ही आमच्या पंतांचे श्रम ह्मटले ह्मणजे हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्प-माळा खेळविण्याचे जितके श्रम तितकेच बहुधा होत ! ' संसारांतले अनेक ताप सोसून व आपलें नित्यकर्म आटोपून बैठकीला दोनदोनशें आर्या सहज रचणाऱ्या पंतांना काव्यरचना फार सुलभ झाली असली पाहिजे. त्यांचे ग्रंथ वरचेवर मार्मिकपणें वाचणाऱ्या रसिकांच्या हें लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं कीं, कथावर्णनप्रवाहांत पंतांची लेखणी झपझप चाले. त्यांची बहुतेक कविता सहज " लिहिली होती, तीही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी" मांडी घालून बसल्यावर पंतांची लेखणी त्यांना प्रसंगीं अनावर होत असे ! पंत जाडे पंडित व स्मरणशक्तीचे मूर्तिमंत पुतळे असल्यामुळें त्यांना ज्या गोष्टी सहज लीलेनें साधत त्या व्युत्पत्तिहीन व संस्कार-विहीन पुरुषाला श्रमसाध्य वाटतात ' यांत कांहीं मोठेंसें नवल आहे असें नाहीं ! कारण पोहतां न येणारास पोहणें, बंदुक व तरवार धरतां न येणा-रास लढाई करणें, अथवा चार शब्दांचाही निरोप न सांगतां येणारास सभेंत उभें राहून पांडित्य करणें जसें बिकट वाटतें तद्वत्च वरील पंडितांस पंतांची कविता कठीण व क्लिष्ट वाटणें साहजीकच आहे व अशांना तींतील खुमारी कळणेंही अशक्यच !

नर्तनांत दृष्टीस पडणारी मजा जशी अंधास नाहीं, गायनकलेंतील मर्म बधिरास नाहीं, वीराचें बाहुस्फुरण रणभीरूस नाहीं, कामुकांचा रोमांचानुभव क्लीबास नाहीं किंवा शर्करामाधुरीची कल्पना रसनाविहिनांस नाहीं तसेंच पंतांच्या काव्यांतील स्वारस्य व रसानुभव वरील पंडितांस कधींही घेतां

येणार नाहीं. तेव्हां 'जोंपर्यंत हजारों महाराष्ट्रजनांच्या हृदयास आमच्या सरस्वतीप्रिय मयूराचा टाहो भेदून जात आहे, जोंपर्यंत त्याचा सारा पिसारा उभारलेला पाहून त्याच्या अप्रतिम वैचित्र्यानें जनसमूह चकित होऊन रहात आहे, जोंपर्यंत मेघदर्शनजनित हर्षभरांत तो नृत्य करीत असतां वाग्देवीच्या नूपुरांचा मंजुळ रव रसिकजनांस त्यांच्या कर्णांची धन्यता वाटवीत आहे' तोंपर्यंत वरील मंडळींनीं 'पंतांची कविता क्लिष्ट, रसहीन, नास्तिक व यमकांनीं जखडलेली' अशी किती जरी कोल्हेकुयी केली तरी ती खऱ्या रसिकांच्या मर्जीतून कधींही उतरणार नाहीं; परंतु उलट त्यांना ती विशेष प्रिय होऊन उत्तरोत्तर ते तिला हृदयासीं अगदीं घट्ट धरितील यांत मुळींच शंका नाहीं! वरील विवेचन वाचूनही ज्यांचे नेत्रपटलावरील दुराग्रहाभ्र विरळ होणार नाहीं, ज्यांच्या हृदयांत सुविचारांचा प्रकाश पडणार नाहीं, ज्यांचे हृदयस्थ कुविचारसर्प या मयूराचा टाहो ऐकून पलायन करणार नाहींत, सुविचाराचा उदय झाल्याबरोबर ज्यांचा हृदयचकोर खडबडून जागा होणार नाहीं, ज्यांच्या अंतःकरणांतील अज्ञानतिमिर विलयाला जाणार नाहीं व ज्यांचा गैरसमजरूप कण्हेरीपुष्पास लुब्ध झालेला मनोभ्रमर तें फूल सोडून मयूरपंतांच्या काव्यकमलवनांत स्वैर विहार करण्याकरितां भरारी मारणार नाहीं त्या हरीच्या लालांस आमचा नमस्कार असो!

आतां उपसंहारादाखल दोन शब्द लिहून वाचकांची रजा घेतों. पंत रामोपासक होते. ज्याप्रमाणें आकाशातून पडलेलें पाणी अखेरीस समुद्रास मिळतें त्याप्रमाणें कोणत्याही' देवतेचें स्तवन केलें तरी तें रामालाच पावतें अशी त्यांची दृढ समजुत होती. 'तीर्थें, क्षेत्रें, संतमहंत, जयंत्यादि पर्वें, संध्यावैश्वदेवादि नित्यकर्में व श्राद्धपक्षादि नैमित्तिक कर्में यांवर त्यांचा पूर्ण विश्वास होता.' कर्म हें चित्तशुद्धीचें साधन आहे असें त्यांचें मत होतें व या मताचा त्याग त्यांनीं यावज्जन्म केला नाहीं. श्रीरामवर्णनाचा प्रसंग आला कीं, त्यांच्या हृदयाला प्रेमाचें भरतें येई; त्यांची प्रतिभा उज्वळ होई, त्यांच्या लेखणीला स्फुरण चढे व त्यांना किती लिहूं असें होई! त्यांच्या काव्याची प्रसिद्धि त्यांच्या जिवंतपणींच झाली होती व प्रसार तर बाबा पाध्ये यांनीं म्हटल्याप्रमाणें—'ज्या उपजताचि गेल्या काशीरामेश्वरा नमायाला' असा झाला होता व याची साक्ष.—

'सुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ।
ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंतांची ॥ १ ॥'

ही आर्याच पटवीत आहे. पंतांसंबंधीं विठोबाआण्णा दप्तरदार ह्मणतात:—

‘ आर्याछंदें जोडुनि रामायणभारतादि आयकवी ।
नायकवीर कवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ! ॥ १ ॥ ’

अशा पंतांबद्दल किती लिहूं असें होतें. अंतःकरण स्फुरण पावतें व हृदयांत आनंदाच्या लाटा उसळतात; पण या लेखणीच्या अंगीं तितकें कौशल्य नसल्यामुळें अंतःकरणांत उठलेल्या विचारांचें प्रतिबिंब तिला कागदावर घेतां येत नाहीं याला काय करावें ?

---

## पंतांच्या कवितेंतील वेंचे.

हा पुढील उतारा इतका करुणरसभरित आहे कीं, तो वाचून ज्याला गहिंवर येणार नाहीं असा रसिकवाचक विरळा. या उताऱ्यांत सीतेला रावणानें चोरून नेल्यावर श्रीरामचंद्राची तिच्या विरहानें जी अवस्था झाली तिचें चित्र पंतांनीं फारच उत्कृष्ट रेखिलें आहे.—दुःखोद्वेग असह्य होऊन राम ह्मणतो:—

‘ हा सीते ! हा सीते ! टाकुनि जावें तुवां न रामातें ।
राहूतें जेंवि सुधा देवि न जिरलीस तूं नरा मातें ॥ १ ॥
हा सीते ! तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु हा सीते ।
हा सीते ! तूंचि मज व्यसनसमुद्रांत सेतु हा सीते ॥ २ ॥
हा सीते ! हा न जगत्प्राण खरा वाघ वायु हा सीते ।
हा सीते ! व्यालचि हा व्यक्त पितो राघवायु हा सीते ॥ ३ ॥
हा सीते ! हा सीते ! हा सीते ! सुदति मुदतिसुखशयने ।
मुख नेत्रा दावुनि पर-लोकीं मज साधि यावया सुख ने ।४।
हा दयिते ! हा जानकि ! हा भामिनि ! हा सुगात्रि ! हा सीते ।
हा सुदति ! हा कृशोदरि ! हा सुंदरि ! हा वरोरु ! हा सीते ५
हा सीते ! मज देतो त्वन्मुखजित चंद्र ताप हा सीते ।
हा सीते ! करितो द्विज-राजहि ह्मणउनि पाप हा सीते ॥ ६ ॥
हा सीते ! कशि कळली त्वद्व्यसनकथा पिकास हा सीते ! ।
हा सीते ! जरि नत मी कशितोंचि तथापि कास हा सीते ! ७

हा सीते ! जे त्वत्कच भारजितकलाप मोर हा सीते ! ।
हा सीते ! ते नाचति मज पाहुनि मजसमोर हा सीते ॥ ८ ॥
बहु लाजवीत होतों करि-केसरि-कीर केकि-हरिणा मी ।
हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥ ९ ॥
वाहति न नद्या न चरति हरिणी चोखी न थान तोक वनीं ।
जेणें विलाप विभुचा मज वदवे सर्वथा न तो कवनीं ॥१०॥'

याहूनही उत्तम भाग पाहणें असल्यास—कीं जो वाचिला असतां जणूं काय करुणरसाची मूर्तिमंत देवताच येथें विलाप करीत आहे असें वाटतें असा हा पहा.—

'कोठें जनकसुते ! तूं गेलीस; धरासुते ! प्रिये ! जाये ! ।
न करीं विनोद; झाला व्याकुल अत्यंत देह माझा; ये ॥ १ ॥
तूं काय कोप धरिला; अपूर्व मृग नाणिला ह्मणून मनीं ।
तरि चंद्रमृगहि आणुन देइन, हें तूं असत्यसें न मनी ॥ २ ॥
श्वशुराला परलोकीं गेलिस जरि तूं करावया नमना ।
पुसल्यावांचुनि कैशी सीते ! झालीस आज या नमना ? ॥३॥
न्यावें मजही तेथें, श्वशुराची प्रार्थना करून, सती ।
भरत करूं राज्यातें, तुजवांचुनि वांचुनी सुखें नसती ॥ ४ ॥
राज्यश्री हरुनि जरी कैकेयीनें वनास पाठविलें ।
तरि तव योगें तें मीं नाहीं कांहीं मनांत आठविलें ॥ ५ ॥
मज राजकन्यके ! तूं वरूनियां पावलीस न सुखातें; ।
खातें हें चित्तातें, सांगों कोणास मी स्वदुःखातें ॥ ६ ॥
हा कमलाक्षि ! तनूदरि ! सुंदरि ! जाये ! प्रिये अये ! सदये ! ।
विधुमुखि ! पिकगर्वापह, अमृताहुनि गोडसें, स्वयें वद; ये ।७।
पंकज, विधु, हरि, गज, पिक, चमरीमृग, कीर जिंकिले होते ।
त्वन्मित्रातें मातें, त्वद्वैरें, पीडितील सखि ! हो ! ते ॥ ८ ॥
हा प्रियतमे ! वियोगज्वलनमखीं होमिलेंस कां मातें; ।
वैरी संतोषविले, टाकुनि यातें वनीं सकामातें ! ॥ ९ ॥
ऐसा रात्रिंदिवसही विलाप करि शोकपर, जसा कोक ।
कोकनदाक्ष सुमित्रातोकसहित तो करी विकल लोक ॥१०॥'

'रामायण' व 'महाभारत' हीं काव्यें वीररसानें अगदीं पूर्णपणें भरलेलीं आहेत व यामुळें त्यांत वीररसाचे प्रसंग हवे तितके सांपडणारे आहेत पुढील एक दोन वेंचे या रसाचीं उत्कृष्ट उदाहरणें होत.

शल्य कर्णाचा उत्साहभंग करीत असतां कर्ण शल्यास ह्मणतो.—

दोघांची काय कथा! जरि कृष्णार्जुन सहस्र येतील।
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हिरोनि घेतील! ॥ १ ॥

अभिमन्यु धर्मराजाला ह्मणतो.—

'व्यूहीं शिरेन शरसा, मागें परतेन एक पदही न।
युष्मत्पदप्रसादें होतिल युष्मत्सपत्न मदहीन ॥ १ ॥'

युद्धशास्त्रविशारद पार्थसुताचे हे उद्गार ऐकून 'बापसे बेटा सवाई' असें कोण ह्मणणार नाहीं! पुनः तो समरगंभीर वीर अभिमन्यु चुलत्यापाशीं आपला रणोत्साह प्रकट करतो.—

'सौभद्र ह्मणे शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज वा।
हरिपोत दंतियूथिं कीं दहनीं करुनिया पतंग जवा ॥ १ ॥'

ज्याचें वय केवळ सोळा वर्षांचें—आईबापांचे मांडीवर लोळण्याचें—राजविलासोपभोग घेण्याचें—त्या समरसिंह अभिमन्यूची 'प्रसंग आला तर धारातीर्थीं देह ठेवीन' ही प्रतिज्ञा ऐकून कोणत्या बापाला धन्य वाटणार नाहीं, कोणती वीरमाता त्याच्या अंगावरून निंबलोण उतरून टाकणार नाहीं, कोणती वीरभगिनी त्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरविणार नाहीं, कोणता ज्येष्ठ बंधु त्याचें कौतुक करून त्याच्या तोंडावरून प्रेमातिरेकानें हात फिरविणार नाहीं, कोणती वीरपत्नी आपल्या हातांत पंचारति घेऊन त्याला ओंवाळणार नाहीं व कोणत्या वीराचें अंतःकरण वीरश्रीनें उचंबळून येणार नाहीं! सोळा वर्षांच्या मुलाचा कोण हा दर्प! केवढा हा अहंकार! व किती हें पौरुष!

धर्मराजाची आज्ञा घेऊन तो बालवीर अभिमन्यु रणभूमीवर जावयाकरितां रथांत बसून निघाल्यावर त्याचा सुमित्र नांवाचा सारथि त्याला ह्मणाला, "हांकिन हरि अरिवरि परि कुरुगुरुभीगांठि कठिण हा पण कीं," यावेळेस अभिमन्यूनें त्याला दिलेलें उत्तरही मोठें समर्पक आहे:—

'हांसुनि सौभद्र ह्मणे, हट्कील हठें रणांत भीमानें।
शक्रार्जुन कृष्णांशीं करितां समर न शिवेल भी मातें ॥ १ ॥'

हे वर अभिमन्यूनें काढलेले उद्गार त्यानें कमें सार्थ करून दाखविले हें बहुतेकांस विदित आहेच! ज्यांना ठाऊक नसतील त्यांना आह्मीं ते धृत-राष्ट्राच्या शब्दांनेंच सांगतों.—

'अंध ह्मणे रे संजय, हें त्या पौत्रासि वर्ष सोळावें ।
सोळावें मांडीवरि, तेणें द्रोणादिकांस घोळावें ॥ १ ॥'

असें हें अभिमन्यूच्या पराक्रमाचें अंगावर थरारून रोमांच उभविणारें वर्णन वाचून अलीकडेही सुमारें दोन अडीचशें वर्षांपूर्वी ज्यानें आपल्या वयाचे सोळावे वर्षींच तोरणा किल्ला घेऊन आपल्या भावी विजयाचें द्योतक असें तोरण बांधिलें त्या महात्म्या शिवरायाची आठवण कोणाला होणार नाही!

सुभद्रेला यतिवेषानें अर्जुनानें पळविलें त्यावेळीं बळरामास अत्यंत कोप आला; त्याचें हें खालील वर्णन पंतांनीं रौद्ररसांत फारच सुरेख केलें आहे.—

'प्रस्फुरदधरदलप्रभु बलभद्र ह्मणे 'खरेंचि सांगा रे ।
कोठें तो कपटपटु? गांठितसे जो पटांत आंगारे ॥ १ ॥
कोठें रथ! मुसळ पुरे. कवच कशाला? धनुष्य राहों द्या ।
वत्सेला निजधर्षणकरखलदंडोत्सवासि पाहों द्या ॥ २ ॥
पर्वीं अर्णव तैसा भगवान् बलभद्र पुष्कळ क्षोभे ।
संध्यारागसुरंजितशरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ ३ ॥'

आतां हे एकदोन मर्मभेदक भाषणाचे प्रकार पहा. दुःशासनाचें वक्षःस्थळ विदारण केल्यावर त्याच्या रक्तानें अंजुळी भरून व मिटक्या मारून तें पीत पीत भीम कर्णदुर्योधनांकडे पाहून ह्मणतो.—

'पीतों हें रक्त तुझें हांसत होतास मज जसा भणगा ।
दुःशासना! तसा तूं पुनरपि गौर्गौः स्व आननें ह्मण गा ॥१॥
आह्मांसि ह्मणत होते जे गौर्गौः क्षुद्रबुद्धि नाचोनी ।
ह्मणतों त्यांतें आह्मीं स्वभुजबळें संकटांत वाचोनी ॥ २ ॥
मज काळकूटदूषित, भोजन दिधलें प्रमाणकोटींत ।
मर्मीं सर्प डसविले काळाच्या घातलेंचि ओटींत ॥ ३ ॥
आर्षीं निमग्न केलें ऐसें अतिदुस्तर प्रमोहांत ।
बांधोनि बुडविलें मग मज सरितेच्या गभीरडोहांत ॥ ४ ॥

जतुगृहदाह घृतीं श्रीस्त्रीवस्त्रापहार; वनवसती ।
दुःखें विराटभवनीं जीं बहु कोणींहि भोगिलीं नसती ॥ ५ ॥
काय करूं काळानें अभय दिलें घेतलासि तूं पदरीं ।
दुःशासना ! कुलक्षयमूळा ! तुज रक्षिता दुजा न दरीं ॥६॥'
ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख विकट ।
प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युता निकट ॥ ७ ॥

गदायुद्धाचे आरंभीं भीम व दुर्योधन यांच्यामध्यें वरील प्रकारचीं बरींच हृदयभेदक भाषणें झालीं. त्यांत ते दोघेही परस्परांना घालून पाडून बोलले. भीमाच्या भाषणाचा नमुना वर दिलाच आहे; आतां हा खालील दुर्योधनाच्या भाषणाचा प्रकार पहा. 'मल्लयुद्धामध्यें निर्बळ मनुष्य चित झाल्यावरही निर्लज्जपणें, 'अखेरीस माझेंच नाक वर' असें ह्मणण्याचें कसें धारिष्ट करतो याचा प्रत्यवाय हें खालील दुर्योधनाचें भाषण वाचून येणार आहे.—

" कुरुराज ह्मणे, ' मंदा मेळविलें बहु विकत्थनें काय? ॥
हाय ह्मणवितों, युद्ध श्रद्धेसह भंगितों तुझा काय! ॥ १ ॥
न्यायें शत्रु मज गदा-युद्धीं जिंकी असा असे कोण? ॥
तूं महिष तोंचि जोंचि न शोणगदाशक्ति दृष्टिचा कोण ॥ २ ॥
न्यायें मज जिंकाया न समर्थ गदारणीं सुनासीर ॥
ये, भूमींत वितिळका व्हाया त्या पांडुच्या सुना सीर ॥ ३ ॥
वदलासि दुर्विचेष्टित माझें जें जें खरेंच, भीमा, तें ॥
मंदा, न तदेकप्रति-कृत घडलें ह्मणुनि लाज मी मातें ॥ ४ ॥
म्यां करुनि तुह्मां वल्कल-धर, दीन, सुचिर वनेंवान फिरविलें ॥
अज्ञातवास दास्य हि करवुनि निजतेज दुःसह मिरविलें ॥ ५ ॥
तुज लाविलें स्वतेजें म्याच कढी भात, वरण घाटाया ॥
वाटाया आज्यपुरण, पापड पोळ्या प्रभृत लाटाया ॥ ६ ॥
कौंतेया, त्वां शारद-वारिधनापरि वृथा व गजावें ॥
बळ असल्या दावावें, प्रथम विकत्थन समग्र वर्जावें ॥ ७ ॥

पंतांच्या काव्यांत सृष्टिसौंदर्य नाहीं असें ह्मणणारांनीं, पंत उपमादिदृष्टांतांत ही सृष्टिसौंदर्याचें वर्णन कसें मनोहर करतात हे खालील दोन तीनच

वेंचे वाचून पहावें ह्मणजे त्यांचें अंशतः तरी समाधान होईल असें वाटतें, मात्र त्यांनीं हे वाचतांना आपल्या डोळ्यावरील दुराग्रहाचा चष्मा अंमळ बाजूला काढून ठेविला पाहिजे.—

'सेना सर्व मिळाल्या धांवुनि अत्यंत शीघ्र दोघांतें ।
जैशा तटिनी गंगायमुनांच्या श्रावणांत ओघातें ॥ १ ॥'
'सहदेव नकुळ दोघे दों भागीं त्यांत धर्म-रथ चाले ।
भासति जाणों क्षितिवरि पूर्णेंदुसमेत शुक्रगुरु आले ॥ २ ॥'
'त्या गहनींच्या दूर्वा मरकतमणिपुंजदीप्तिच्या सवती ॥३॥'

पंतांच्या कवितेंत नूतन व नैसर्गिक कल्पना नसून त्यांची कविता फक्त भाषांतररूप आहे असें शुष्क पांडित्य करणारांनीं एकवार हा खालील उतारा अवश्य वाचून पहावा अशी त्यांस सविनय विज्ञप्ति आहे. हा वेंचा 'संशयरत्नमालेंती' ल आहे. संसारसागरांत बुडत असतां परमेश्वरानें आपणास तारावें ह्मणून कवीनें देवाचा स्तव केला. भक्ताविषयीं कनवाळु देव लवकर कां येईना ह्मणून कवीनें अनेक संशय घेतले, ते या रत्नमालेंत गुंफिले आहेत.—

'उठतां बहुत्वरेनें 'कोठें जातां?' असें तुह्मां देवी ।
पुसती झाली, जाणों पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें ।
प्रेमळ गीत तुह्मांला हरि! हरिणापरिस बहुत वश करितें ।२।
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ।
शरणागत भयशमना! यास्तव येणें नसे तुझें घडलें? ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ।
तत्शुभदैवसमीरें त्यावरि करुणाघन प्रभू वळला ॥ ४ ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंची ।
वसवा पुरें 'पुरे' कां ह्मणतां? धनवंत कण कसा वेंची ।५।
कीं वाटलें खळाला मुक्ति न द्यावी, जशी सुधा सर्पा ।
तरि द्या अघादिकांच्या, घ्या सुवरा, भक्ति मात्र मज अर्पा ६
कीं भीसी मज एका उद्धरितां, लागतील फार झटे ।
तरि कोणाहि न कळतां, न्यावा झांकोनि दास पीत-पटें ॥७॥

की मींच एक उरलों पापी; हें बीज ठेविलें जतन ।
वतन स्वकीय भज कां करितें लक्षाम मंगलायतन ॥ ८ ॥
कीं मार्गीं शुभ उभा असती, प्रेमें उभारुनी बाहे ।
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकसी बा हे ॥ ९ ॥'

पंतांची नीतिमत्ता किती जाज्वल्य होती व व्यवहारांत ते किती चतुर होते याचा निर्णय खालील वचनें वाचलीं असतां तेव्हांच होणारा आहेः—

'श्रद्धेनें भजल्यातें पाषाणहि फलद होय, जो अज्ञ ।
तो ही सद्गुरु होतो, अश्रद्धेनें वृथा महा यज्ञ ॥ १ ॥'
'दुर्लभ वस्तु न वांच्छी, न करी जो नष्ट वस्तुचा शोक ।
आपत्तींत न मोहे, त्या पंडित ह्मणति जाणते लोक ॥ २ ॥'
'दुर्जनसहवास सदा तापद हा काय नरक सामान्य? ।
होईल यास दाटुनि मानधन प्राज्ञनर कसा मान्य ॥ ३ ॥'
'अनुकूळ काळ होतो तेव्हां बळ बुद्धि तेज यश देतो ।
प्रतिकूळ तोचि होउनि माघारें दत्त सर्वही घेतो ॥ ४ ॥'
'पुरुषें आरंभावें कर्म न पौरुष कदापि सोडावें ।
कर्मफळ जसे दैवें स्पष्ट तसें पौरुषेंहि जोडावें ॥ ५ ॥
'चार व्यसनें मृगया, स्त्री, पान, द्यूत यांत जो सक्त ।
तो धर्मच्युत, तत्कृत सत्कृत न महाजनांत, हें व्यक्त ॥ ६ ॥'
'कामें कोपें लोभें नागविले अमित यांस जे भुळले ॥
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीर ही उळले ॥ ७ ॥'
'संसार दो दिसांचा, यश जोडी जो कुलीन तोचि तरे ।
द्यावें बरें ह्मणोनि स्वपरमुखीं हे कुलीनताचि रे ॥ ८ ॥'
'दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें, क्षमा न सोडावी ।
जोडावी कीर्ति, अशी कुलरीति बुधें कधीं न मोडावी ॥ ९ ॥'
'संस्कारधर्मलोपें दुष्टजनसमागम उडे शुद्धी ।
मग गुणवंताची ही सदविक्षेपीं प्रवर्त ते बुद्धि ॥ १० ॥'
'मृत्यु हरितसे समर्थी अमरासहि, कवण मृत्युला चुकवी ।
ऐसें जाणुनि तत्व व्यसनांत न मोह पावती सुकवी ॥ ११ ॥'

'हृदयीं क्षमा असावी, सर्वत्र सदा असो नये पण ती ।
म्हणती क्षमितां दुर्बळ, न क्षमितां करिति दुर्जन प्रणती ॥१२॥
'भूतीं दया असों द्या व्हा इंद्रियषड्रिपुनिग्रहीं धीट ।
सोडुनि अन्यपथ धरा निजधर्माचार मार्ग हा नीट ॥ १३ ॥
'विसरिति अपकारातें उपकारा तेंचि साधु आठविती ।
कीं सोशितां न साविति, होय वपु न सोशितां न आठविती १५'
'बा सत्य धर्म जिकडे तिकडे श्रीकृष्णनाथ जाणावा ।
हा तेथें जय, रविसा प्रार्थुनि नलगे प्रकाश आणावा । १६ ॥'
गति उत्तम होय असें वर्तावें, धर्मनीति रक्षावी ।
चित्तांत पूर्वजांची नित्य स्थिति रीति शांति लक्षावि ॥ १७ ॥'

हीं वर दिलेलीं दहापांच नीतितत्त्वाचीं उदाहरणें वाचून नीतिशिक्षक या नात्यानें पंतांची योग्यता किती दांडगी होती हें सहज लक्षांत येणार आहे. पंतांची कविता किती हृदयंगम व बहारदार आहे व तींत उत्तम कवीच्या अंगीं असणारे प्रसाद, प्रतिभा व प्रेम हे गुण कितपत दिसून येतात, वगैरे गोष्टींची साक्ष वरील उतारे देतील. भाताची परीक्षा पहाण्यास सबंध हंडा उकरावा लागत नाहीं, अंब्याची गोडी पाहण्यास पाटीभर आंबे खावे लागत नाहींत, तूप खवट आहे कीं साजूक आहे याचा निर्णय करण्यास सगळा डबा हुंगावा लागत नाहीं, वस्त्राचा रंग पक्का आहे कीं कच्चा आहे हें पाहण्यास सगळें वस्त्र धुवावें लागत नाहीं, किंवा सोनें बावनकशी आहे कीं, कमी दर्जाचें आहे हें ठरविण्यास तीं सबंध सोन्याची लगड कसाला लावावी लागत नाहीं तर ज्याप्रमाणें भाताच्या एका शितावरून, आंब्याच्या एका फाकेवरून, तुपाच्या एका थेंबावरून, वस्त्राच्या एका कोपऱ्याच्या टोंकावरून व सुवर्णाच्या एका कणावरून वरील सर्व वस्तूंची शहानिशा करता येते त्याचप्रमाणेंच वरील दहापांच वेंच्यावरूनच पंतांची काव्य प्रसवणारी प्रतिभा वायुसारखी वेगवान्, अग्नीसारखी तेजस्वी, जळासारखी निर्मळ, पृथ्वीसारखी विशाल व नभासारखी उच्च होती किंवा नव्हती याचा निकाल लागेल. एखाद्या निस्पृह व निःपक्षपाती रसज्ञापुढें जर हा प्रश्न नेला तर तो वरील वेंचे वाचून एका अधुनिक कवीनें म्हटल्याप्रमाणें असेंच उत्तर देईल कीं,—

'श्रीमन्मयूरकविंची, देते संतोष मानवां कविता ।
असता जरि भूमिवरी, सुरगुरु तरि तोहि मान वांकविता ।१।'

———

# रघुनाथ पंडित.

काव्यासारखी मनोरंजक दुसरी वस्तु नाहीं. मनुष्य कितीही दुःखांनीं पोळलेला असो, चिंतांनीं व्यापलेला असो अथवा प्रापंचिक विवंचनांनीं मग्न हृदय झालेला असो एखाद्या मधुर काव्याचा चुटका त्यानें वाचला किंवा ऐकिला कीं पुरे, क्षणभर तरी त्याच्या चित्तवृत्ति दुःखविवंचना विसरून आनंदांत तल्लीन होतात. खरोखरीच काव्यरसासारखा नितांत मधुररस निदान भूलोकीं तरी दुसरा कोणताच नाहीं. त्या रसांत अशी कांहीं विलक्षण मोहनी आहे कीं. राजापासून रंकापर्यंत सर्व दर्जाच्या लोकांना तो आवडतो. काव्यरसानें रममाण न होणारा मनुष्य पशूच समजला पाहिजे. पशूंना देखील काव्यश्रवणाची गोडी असते. नांगराला किंवा मोटेला जोडलेले बैल आपल्या धन्याचे ' इरीरी पो पो ' किंवा, ' माझ्या नांद्याच्या बैलारे ' हे काव्यशब्द मोठ्या प्रेमानें कान टवकारून ऐकत असतात; व असें गाणें चाललें ह्मणजे त्यांना आपल्या मानेवरील ओझ्याचें जडत्व ही भासत नाहीं. हरीण व सर्प हे प्राणी तर अत्यंत गानलुब्ध आहेत, आणि गायन हा एक काव्याचाच पोटभाग आहे. गुराखी ही पावा किंवा अलगुज वाजवून आपल्या गुरांचें कसें आकलन करीत असतो, व त्या प्रमाणेंच थंडीवाऱ्यापासून स्वतःस उत्पन्न होणाऱ्या क्लेशांचें उपशमन करण्याकरितां कसा लावण्यांच्या लकेरी झोडीत असतो हें ही सर्वत्रांनीं पाहिलेंच आहे. दळणाऱ्या बायका जात्याचे श्रम हलके करण्याकरितां दळतांना जात्यावर ओंव्या ह्मणत असतात. तात्पर्य जगांतल्या असंख्य आधिव्याधींचें विस्मरण पाडण्याचें सामर्थ्य काव्यांत आहे. कविता ही एक ज्ञानानंदजलानें संतत वाहणारी महानदी आहे. ती हंसविते, रडविते, मोहित करते, प्रोत्साहित करिते, चकित करिते, इत्यादि अनेक प्रकारांनीं ती विलास करिते; परंतु ती केव्हा? कविता प्रसवणारा कवि तसा मोहरेदार असेल तेव्हां! ऐहिक वस्तुंवर किंवा क्षुद्र फायद्यांवर दृष्टि ठेवून ' ट ' ला ' ट ' जुळवून कविता करणाऱ्या भाडोत्री कवींच्या काव्यांत वरील प्रकारचा रस व आनंद नसतो, हें कांहीं नव्यानें सांगावयाला नको आहे. दृश्य सृष्टीचा विसर पाडून वर्ण्यविषयाशीं तादात्म्य पावणारे व आत्मरंगीं रंगणारे ज्ञानेश्वर रामदास मयूरपंतादि कवीश्वर फारच विरळ असतात. त्यांच्या वाणींत जी जादू भरलेली असते, जें माधुर्य, जो रस, जी प्रतिमा, जें प्रेम व जी ईश्वरीशक्ति

भरलेली असते ती अन्य ग्रंथकारांत नसते; ह्मणूनच काव्यांना एकप्रकारचें विशेष महत्व असतें. असो. वाचकहो! सांप्रत तुह्मांपुढें असलेल्या या प्रस्तुत चरित्रनायकाचे काव्यांतही अशी कांहीं जबरदस्त मोहनी आहे कीं, वाचावयास हातीं घेतलेला ग्रंथ खालीं ह्मणून ठेववतच नाहीं! प्रथमदर्शनीं कित्येकांना हें ह्मणणें अतिशयोक्तीचें वाटेल, परंतु पुढील उतारे वाचले ह्मणजे त्यांना आमच्या वरील विधानाची सत्यता कळून येईल.

हा कवि शालिवहानशकाच्या सतराव्या शतकाच्या अखेरी अखेरीस झाला असावा असा महाराष्ट्रभाषा पंडितांचा तर्क आहे. बाराव्या शतकांत प्रसिद्धीस आलेल्या ज्ञानेश्वरादि कवि मंडळीची कांहीं तरी मूळपीठिका सांपडते, परंतु अत्यंत दुःखाची गोष्ट ही आहे कीं, या कवीच्या नांवापलीकडे त्याची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं! त्यानें आपल्या काव्याचे अखेरीस स्वतःचा नामनिर्देश करून ठेविला आहे ह्मणून आज आपल्याला त्याचें नांव तरी माहीत आहे, परंतु तें जर त्यानें केलें नसतें तर निदान महाराष्ट्रकविमंडळांत त्याचें नांव तरी निघतें कीं नाहीं याची शंकाच आहे!

मराठींतील बरेचसे प्रसिद्ध कवि, संत, साधु, योगी किंवा भगवद्भक्त या नात्यानें विख्यात आहेत. त्यांतील कित्येकांनीं आपल्या अलौकिक चातुर्यानें, प्रेमळ पण अधिकारयुक्त वाणीनें आणि भक्तीच्या एकतानतेनें समाजावर विलक्षण छाप बसवून, त्याचीं मनें आपल्या अगदीं अंकित करून टाकिलीं व ह्मणूनच लोक त्याना ईश्वरी अंश किंवा अवतार मानीत व अद्यापही मानितात. अशा प्रेमळ भगवन्निष्ठ व्यक्तींचीं चरित्रें त्यांच्या शिष्यांनीं व भक्तांनीं प्रेमभावांनीं लिहून ठेवलेलीं आहेत. **महीपतीबोवा** ताहराबादकर यांनीं अठराव्या शतकांत अशातऱ्हेचीं निरनिराळ्या शेंकडों संतांचीं चरित्रें संकलित करून, **संतविजय, भक्तविजय, संतलीलामृत** व **भक्तलीलामृत** हे अविबद्ध ग्रंथ लिहिले. हे सर्व संत कवि होते, हें सांगावयास नकोच. यांत श्रीज्ञानेश्वरापासून झाडून लहानमोठ्या कवि साधुभक्ताचीं चरित्रें आलीं आहेत; पण त्यांत **रघुनाथ** पंडिताचा नुसता नामनिर्देशसुद्धां केलेला नाहीं! ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम, रामदास, चोखामेळा, सेना न्हावी इत्यादि संतकवींच्या अद्भुत लीला, रघुनाथ पंडितांच्या जीवनवृत्तातांत संभवनीय नाहींत हेंच या चरित्राभावाचें कारण असावें, असें आमच्या अल्पमतीला वाटतें. एकादी कधीं न झालेली व कधीं न ऐकलेली अशी असामान्य किंवा अद्भुत गोष्ट पाहण्यांत किंवा

ऐकण्यांत आली तर तिचें लागलींच कागदावर टांचण करून ठेवण्याकडे मनुष्याची साहजीकच प्रवृत्ति असते. 'चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं' अशी जी एक मराठींत प्रचलित ह्मण आहे ती याच अर्थाची द्योतक आहे; परंतु तशाप्रकारचा चमत्कार या महापंडितांच्या चरित्रांत कांहींच नसल्यामुळें त्यांचें चरित्र कोणीं लिहिण्याचा प्रयत्न केला नाहीं यांत कांहीं मोठेंसें नवल नाहीं.

एकाद्या मनुष्यासंबंधीं कांहीं माहिती काढायला दोन साधनें असतात. एक, त्याविषयीं कोणीं कांहीं लिहून ठेविलेलें असलें तर, किंवा स्वतः-विषयीं त्यानेंच स्वतः कांहीं लिहून ठेवलेलें असलें तर पैकीं दुसऱ्या प्रकारची आमच्यांत बहुतेक अंशीं चाल नाहींच ह्मटलें तरी चालेल; व तदनुरूप रघुनाथपंडितांनीं स्वतःविषयीं आपल्या काव्यांत आपल्या नांवापलीकडे एक चकारशब्दही काढिलेला नाहीं व हें त्यांचें करणेंही, "आपुली आपण करी स्तुति । तो एक मुर्ख" या न्यायानें त्यांच्या शीलास शोभेसेंच होतें. असो. एकंदरींत, रघुनाथपंडितांचें कुलवृत्त व जीवनवृत्त समजण्याला कांहींच साधन नाहीं!

श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं कवींचे तीन वर्ग केले आहेत. ते असे.— धीट कवि; पाठ कवि व प्रासादिक कवि. 'जें जें आपुल्या मनास आलें, दृष्टी पडलें तें शीघ्र वर्णिलें,' असे जे कवि ते धीट कवि; व्युत्पत्तीच्या जोरावर काव्य करणारे ते पाठ कवि. हे दोन्ही प्रकारचे कवि, 'कामिक, रसिक, शृंगारिक, वीर, हास्य, प्रास्ताविक, कौतुक, विनोद इ. अनेक' प्रकारचें वर्णन करणारे असतात; ह्मणून यांना धीटपाठ कवि असें समर्थ ह्मणतात. याहून वरच्या दर्जाचे जे कवि ते अर्थात् प्रासादिक कवि. 'भक्तिहीन जें कवित्व । या नांव ढोंगमत,' असा त्यांचा सिद्धांत आहे. तात्पर्य, 'ईश्वरनिष्ठ स्वानुभवी पुरुषांचे स्वैरालाप ह्मणजे उत्तम प्रासादिक कविता होय' असें समर्थांनीं काव्याचें व कवीचें लक्षण बांधिलें आहे. समर्थांच्या वरील व्याख्यांप्रमाणें रघुनाथ पंडितांच्या काव्याची विचक्षणा केली तर रघुनाथपंडित पाठकवींच्या वर्गांत येतात; परंतु साहित्यशास्त्रांत, 'ऐकल्याबरोबर अर्थबोध करून देऊन अंतःकरणाला व्यापून टाकणारा जो धर्म तो प्रसाद' अशी जी प्रसादाची व्याख्या केली आहे, तिजवरून पहातां पंडितांच्या काव्यांत 'प्रसाद' हा गुण पूर्णपणें आढळतो व ह्मणून रघुनाथपंडित प्रासादिक कवि होते, असें ह्मणण्याला कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

ह्या कवीनें केलेला असा एकच लहानसा ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्याचें नांव 'नलदमयंतीस्वयंवराख्यान' 'सीतास्वयंवर,' 'रुक्मिणीस्वयंवर,' किंवा पार्वती परीणय,' या संज्ञांवरून पाहतां या ग्रंथालाही 'दमयंतीस्वयंवर' अथवा 'दमयंतीपरिणय' अशी संज्ञा दिली असती तर ती बरी दिसली असती; परंतु 'नलदमयंतीस्वयंवराख्यान' हीच संज्ञा फार दिवस चालत आलेली दिसते. हा ग्रंथ संस्कृतभाषेंतील 'नैषध' काव्याच्या आधारानें केलेला आहे. हा फार सरस असून त्यांत माधुर्य इतकें भरलें आहे कीं, तो आरंभापासून शेवटपर्यंत वाचल्यावांचून मनाची तृप्ति होत नाहीं व एकदां वाचला तरी पुनः पुनः वाचावासा वाटतो.

'नलदमयंतीस्वयंवर' हा विषय आधींच शृंगाररसप्रधान असल्यामुळें बहुधा सर्वांस आवडणारा आहे. तशांत कवीची रसानुकूल रचना व मनोरंजन करण्यासारखी वाणी; मग काय पहावयाचें आहे ! दूधशर्करेचाच संयोग तो ! अशाप्रकारची वस्तुतः स्थिति असल्यावर तो सकलजनसंमत झाला यांत काय मोठेंसें नवल. तसें नसतें तर बरीक नवल होतें खरें.

रघुनाथपंडितांच्या कवितेंत प्रास, यमक इत्यादि शब्दालंकार व उपमा रूपक-उत्प्रेक्षा इत्यादि अर्थालंकार विपुल असून पुनः ते चांगले साधले आहेत. छंद गोड असून ते नानाप्रकारचे योजले आहेत व पुनः त्यांची योजनाही पण अत्यंत समर्पक अशी झाली आहे. शब्दरचना जरी संस्कृत-मिश्रित आहे तरी ती क्लिष्ट नाहीं व वर्णन चमत्कारिक असून तें अमर्याद अतिशयोक्तीनें दाट भरलेलें आहे. तात्पर्य, रघुनाथपंडितांची भाषासरणी अत्यंत रसाळ, कोमळ, रंगेल व प्रसंगविशेषीं हृदयद्रावक आहे. हा ग्रंथ तयार होऊन आजमितीला जरी दोनशें अडीचशें वर्षे झालीं आहेत, तरीही पण भाषेंत जुनाटपणा मुळींच आढळत नाहीं असें म्हटलें तरी चालेल; त्याचप्रमाणें तिला जबरीनें कृत्रिम वळणही कोठें दिलेलें भासत नाहीं. सरस्वतीचा प्रवाह जणूं काय एकसारखा धो धो वहात चालला आहे, असा भास होतो. नलाचें, त्याच्या उपवनाचें, उपवनांतील सरोवराचें, दमयंतीचें व तिच्या नगराचें वर्णन करतांना, दमयंतीकडे भेदिलत्व करण्याकरितां पाठविलेला हंस लौकर परत न आल्यामुळें राजा नळाच्या चित्तवृत्तीचें वर्णन करतांना किंवा तरुणांच्या मनाला उमळवून टाकणाऱ्या इतर प्रसंगाचें वर्णन करीत असतांना पंडिताची वाणी ईश्वरीप्रसादानें विकसलेली व काव्यप्रतिभेनें अगदीं रसरसलेली आढळते.

पुढील वेंचे वाचले असतां, आमच्या वरील विधानांची सत्यता वाचकांच्या सहज लक्ष्यांत येणारी आहे.—

जिच्या अनुपम लावण्यास भुलून देवाधिदेव अमरेंद्रानेंसुद्धां स्वयंवरासाठीं स्वर्गाहून उडी घातली, त्या दमयंतीच्या सौंदर्याचें कवि वर्णन करितो.—

॥ श्लोक ॥

" धाता करींच करितां मृदु हे न होती ॥
या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला रस पूर्ण केली ॥
ओतींव हे न घडितां कृात बोलिजेली ॥ १ ॥
जें अंतरंग पिंवळें सरसीरुहाचें ॥
भासे मनांत मज आंग तसें तियेचें ॥
गोरोचना परिस गौर असें गणावें ।
सोनेंच बावनकशी न कसें म्हणावें ॥ २ ॥
राया तिचें मुख सुधाकर या द्वयाला ।
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असतां नसतां कलंकी ।
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ३ ॥
चांपेकळीपरिस ही सरळस नाकीं ।
जीचा धरी अधरविद्रुम भावना कीं ॥
भासे मनांत मज बिंबफळ भ्रमानें ।
कीं सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें ॥ ४ ॥
नोहेच नाभि तरि काय सुरंग आहे ।
रोमावली गमतसे मज शृंखळा हे ॥
हे मंद मंद पद सुंदर कुंददंती ।
चाले जसा मद धुरंधर इंद्रदंती ॥ ५ ॥ "

किती मार्मिक वर्णन हें! व कल्पना तरी किती विशाल! 'सृष्टि निर्माण करतां करतां ज्या हाताना घट्टे पडले त्याच हातानीं जर मी इला (दमयंतीला) घडीन तर ती नाजूक होणार नाहीं' असें ब्रह्मदेवाला वाटूनच जणूं काय त्यानें तिची मनोमय मूस ओतिली! अहाहा! किती

तरी बहारिची कल्पना ही! या स्थलावरून उपमादि अर्थालंकार किती उत्कृष्टरीतीनें कवीचें साधिलें आहेत, हें वाचकांच्या लक्षांत सहज येईल.

हंसाला धरणाऱ्या नलाचें व नलानें धरलेल्या हंसाचें पंडित वर्णन करितात.—

श्लोक.

" त्यांतील एक कलहंस तटीं निजेला।
जो भागला जलविहार विशेष केला॥
पोटींच एक पद लांबविला दुजा तो।
पक्षीं तनू लपवि भूप तया पहा तो॥ १॥
टाकी उपानह पदें अतिमंद ठेवी।
केली विजार वरि डौरहि मौन सेवी॥
सारी करीं वलय ऊंच अशा उपायीं।
भूपें हळूंच धरिला कलहंस पायीं॥ २॥
कल कल कलहंसें फार केला सुटाया।
फड फड निजपक्षीं दाविलें कीं उडाया॥
नृपतिस मणिबंधीं टोचितां होय चंचू।
धरि सुदृढ जया त्या काय सोडील पंचू॥ ३॥

वरील वेंच्यांत स्वभावोक्ति अलंकार फारच मजेदार साधला आहे. असें स्वभावोक्तीचें उत्कृष्ट उदाहरण वाचकांना अन्यत्र क्वचितच पहावयाला मिळेल. एकाद्या रम्य सरोवराच्या तटाकीं स्वच्छंदानें विहार करणाऱ्या पक्षाचें, एकाद्या पक्ष्यास धरण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसाच्या त्यावेळच्या हावभावाचें व त्याचप्रमाणें सुटण्याकरितां धडपडणाऱ्या पक्षाचें वर्णन वरील श्लोकत्रयांत कवीनें अगदीं हुबेहुब केलें आहे!

अशाप्रकारें नलराजानें हंसाला पकडल्यावर त्याच्याबरोबर 'उपवन-कलकेली' करण्याकरितां गोळा झालेले दुसरे हंस भयानें दशदिशा पळून गेले. त्यावेळची हकीकत सांगत असतांनां रघुनाथपंडितांनीं एक शेरा ठोकला आहे, तो हा.—

" कठिण समय येतां कोण कामास येतो!"

हा वरील त्रिकालाबाधित सिद्धांत प्रमाणें देऊन सिद्ध करून दाखविण्याची कांहीं गरज नाहीं. संसारामध्यें असणाऱ्या मनुष्याला याची साक्ष

पदोपदीं येते. श्रीमज्ज्ञानेश्वरमहाराजांपासून तों तहत् महीपतीपर्यंतच्या सर्व संत-कवींनीं मनुष्यजातीच्या कल्याणार्थ हा सिद्धांत समजावून सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे!

नानाप्रकारें नळाची करुणा भाकून ही जेव्हां त्याचे हातून सुटका होईना तेव्हां तो हंस आपल्या कुटुंबाचें स्मरण करून शोक करितो.—

॥ श्लोक ॥

‘ म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ।
कांता काय वदों नवप्रसव ते साता दिसांची तशी ।
पाता त्या उभयांस मी मज विधी घातासि योजितसे ।
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ! ॥ १ ॥

दिंडी.

सखे माझे परतोनि घरा जातां । तुवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां । कशी होशिल तें आठवितों आतां १
थोर होतिल बाळकें तुझीं बाळे । तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोक-शाळे । मला आठवितां हृदय तिचें पोळे २”

हें हंसाचें भाषण हृदयाला द्रव आणणारें आहे. याठिकाणीं कवीनें दिंडी वृत्ताची जी योजना केली आहे, तीही वरील प्रसंगास अगदीं शोभेशीच आहे असें वाटतें व त्यांत त्याचें चातुर्यही पण चांगलें दिसून येतें. आपली आतां येथून सुटका होत नाहीं असें जाणून हंसाचे मनांत एकदम त्याच्या घरचें चित्र उभें राहिलें त्यामुळें त्याचा कंठ दाटून येऊन वरील हृदयोद्गार तो मोठ्या कष्टानें काढीत आहे, असा केवळ श्रवणमात्रेंकरून भास होतो!

हंसाच्या तोंडचें दमयंतीचें लावण्यवर्णन ऐकून विरहानळानें त्रस्त झालेला नळराजा त्याला ह्मणतो.—

श्लोक.

“ वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ।
चालून मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
चक्रापरीच सजलों असतां फिराया ।
हंसा तुझा उदय होय सुखी कराया ॥ १ ॥

ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी ।
दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥
आहे जणों जवळि हे गज-राज-गामी ।
ऐसाच भाव तंव बोलतसें तिला मी ॥ २ ॥

भृंगें विराजित नवीं अरविंद-पत्रें ।
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ।
आहा वृथा उतरलों भिजलों वि लोकीं ॥ ३ ॥

हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ।
म्यां मानिला निटिलदेश तिचाच सांचा ॥
शंखद्वयीं धरुनि कौंकुम कीर-वाणी ।
लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥ ४ ॥"

अशाप्रकारें आपल्या स्थितीचें वर्णन करून नळानें त्या हंसास दमयंती-कडे दौत्य करावयास पाठविलें. त्यावेळीं कवि ह्मणतो मला वाटतें कीं, नळानें हंसाला पाठविलें नाहीं तर.—

दिंडी.

" गमे चंपक-कुसुमौघ-हार मेला । पाठवाया युवतीस सिद्ध केला ॥"

सुवर्णदेहधारी हंसाला कवीनें सुवर्णचंपककुसुमगुच्छाची दिलेली उपमा किती हृदयंगम व चमत्कृतिजन्य आहे. या उपमेला कवि पूर्णोपमा असें ह्मणतात.

दमयंतीच्या नगरीचें ह्मणजे कुंडिनपुरीचें वर्णन 'चूर्णिका' ह्मणून एक गद्याची चाल आहे तींत कवीनें फारच सुंदर केलें आहे.—

चूर्णिका.

" सकल भुवनललामाय माना । मानाधिक-वि-भव-धनिक-सदन शत-विराजमाना ॥ कलश-जानित मुनि चकित-जलधि शरणाति-विस्तृत-परिखांतरी पायमाना । चंद्रशाला-विराजित सुर विमाना ॥ जिचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभचि माना । वासव चाप-जयास कमाना ॥ ऐसी कुंडिन नामधेय नगरी राजहंसें पाहिली ॥ १ ॥"

श्लोक.

कोणी वणिग्जन विकी तुळितां तराजें ।
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ।
घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ १ ॥"

तेथें त्या नगरीशेजारींच हंसानें एक बाग पाहिली. तिचें वर्णन कवि करितो:—

"जेथें सु-शीतळ महीतळ सांद्र साई ।
जाई जुई फुलमयी बहु आंब-राई ॥ १ ॥"

वरील वर्णनांत कवीनें अतिशयोक्तीची अगदीं कमाल केली आहे. कवि ह्मणतो कीं, कुंडिननगरीस सभोंवतीं खंदक असून ते इतके मोठे होते कीं, त्यांत समुद्रसुद्धां मावला असता! त्याचप्रमाणें तो पुनः ह्मणतो, देवांचीं विमानें फार सुंदर असून तीं पृथ्वीपासून फार उंचावर चालतात, तरी पण कुंडिननगरींतल्या चंद्रशाला ह्मणजे वरच्या माड्या त्यांपेक्षांही सुंदर आणि उंच होत्या! वरील वर्णन ह्मणजे अतिशयोक्ति अलंकाराचें एक उत्कृष्ठ उदाहरण आहे!

पुढें त्या पुष्पवाटिकेंत दमयंतीची व हंसाची एकांतीं गांठ पडल्यावर त्यानें तिला नळांकडील वर्तमान सांगितलें. नळाचें वर्णन ऐकून दमयंती नळावर अनुरक्त झाली त्यावेळीं तिच्या त्या चेष्टा पाहून हंसानें तिला विचारिलें, "तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे?" ह्या हंसप्रश्नाचें उत्तर दमयंतीनें मोठ्या चातुर्यानें आपल्या कुलशीलास शोभेलेंच दिलें आहे; तें असें:--

श्लोक.

"मी जाण देवनळही स्वकरीं धराया ।
सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
काळें करूनि सुख जोंवरि होय लेखीं ।
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ १ ॥"

प्रस्तुत श्लोकांत कवीनें श्लेषालंकार योजून दमयंतीच्या मनांतला भाव फारच नाजुकरीतीनें व्यक्त केला आहे. या श्लोकाचा अर्थ दोन चार

तऱ्हेनें लावतां येतो. ( पहिला अर्थ ) ' कांहीं काळानें जोंपर्यंत नळ मला वरील तोंपर्यंत देवनळही हातीं धरण्याला ह्मणजे लेखनद्वारा परस्परांचें मनोगत परस्परांस कळविण्यामध्यें सुख करून घेतलें पाहिजे. मला जास्त बोलण्याला लाज वाटते. तूं चतुर आहेस. तुला आणखी सांगणें नको. ( दुसरा अर्थ. ) हे नलराज या व या आपल्या दासीला स्वकरीं धरा. मी अतां जाणती आहे. हे हंसा ! मी स्वतः होऊन त्यांच्याकडे कशी जाऊं ? मला लाजलज्जा कांहीं नाहीं कां ? [ बाकीचा अर्थ पुर्ववत्. ] ( तिसरा अर्थ. ) हंसा ! मला त्यांत लाज ती कसली वाटावयाची ? ' हे नळराज ! या व या दमयंतीला स्वस्त्री ह्मणून स्वकरीं धरा, ' असें मी कांहीं काळानें सांगेन. आजच सांगवत नाहीं. नळराज मला वरून आपलीशी करीपर्यंत मला लेखनद्वारांच सुख करून घेतलें पाहिजे. ( चवथा अर्थ. ) नळ हा देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्याप्रमाणें कांहीं काळानें त्याचें प्राप्तिरूप सुख होईपर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणिग्रहण करण्यास योग्य आहे, असें सांगेन काय ? तात्पर्य कीं, ' तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं ' ह्मणून तूं पूर्व श्लोकांत विचारिलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय ? असें सांगण्याला त्यांला लाज नाहीं काय ? देव असले तरी सांगणार नाहींत. ' असें दमयंतीनें उत्तर दिलें. ह्यांत लाजेमुळें सांगत नाहींत पण मनांतून तसेंच असतें असें सुचविलें. ह्यांत मला नळच इष्ट आहे, असें दमयंतीनें दर्शविलें. "

नळाच्या विरहानलानें होरपळलेल्या दमयंतीचें कवि वर्णन करतो.—

श्लोक

" न रंजे कारंजें निरखुनि फणी ते फणफणी ।
मुदेनें मोदेना नळगुणगणीं जे गुणगुणी ॥
न बैसे जे सेजे वरि न परिसे जे शुकगिरा ।
न नाहे मानाहे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १ ॥ "

या एका श्लोकांतच प्रियकराच्या विरहानें व्याकूल झालेल्या विरहिणींच्या अवस्थेचें चित्र कवीनें अगदीं हुबेहुब रंगविलें आहे ! आमच्या वांचकांपैकीं ज्यांनीं नाथांचें रुक्मिणीस्वयंवर वाचिलें असेल त्यांस वरील श्लोक वाचून कृष्णविरहानें विद्ध झालेल्या रुक्मिणीची आठवण झालीच असेल ! रुक्मिणीस्वयंवराचें व दमयंतीस्वयंवराचें बहुतेक अगदीं सादृश्यच आहे. इकडे विदर्भराजाधिपतीची कन्या केवळ नळाच्या सौंदर्याचें व गुणाचें वर्णन श्रवण

करूनच मदनविव्हळ झाली, तिकडे ही विदर्भेश्वराचीच कन्या कृष्णगुणानुवाद ऐकूनच त्याच्यावर अनुरक्त झाली. इकडे दमयंती व नळ या उभयतांत दौत्याचें काम हंसानें केलें तिकडेही रुक्मिणीचा मनोदय एका हंस मनुष्यानेंच [ हंस ह्मणजे श्रेष्ठ व मनुष्यजातींत ब्राह्मण हीच जात श्रेष्ठ आहे, ह्मणून याठिकाणीं सुदेव ब्राह्मणाला हंस असेंच ह्मटलें आहे ] कृष्णाला जाऊन कळविला. इकडे इंद्रासारख्या सुरेश्वरास वाळ्यावर बसवून दमयंतीनें नळाच्या गळ्यात माळ घातली, तिकडे शिशुपालासारख्या राजांच्या तोंडास पानें पुसून श्रीकृष्ण रुक्मिणीस घेऊन गेला ! असो.

दमयंतीस नळाचें ध्यान लागून ती मूर्च्छित पडली असतां, तिची आई तेथें धांवत आली. दमयंतीला कांहीं दुखणें झालें आहे असें समजून ती कांहीं औषधपाणी देण्याची धांवाधांव करूं लागली तेव्हां—

आर्या गीति.

"ते शीतलोपचारीं जागी झाली हळूंच मग बोले ।
औषध नलगे मजला परिसुनि जननी बरें ह्मणुनि डोले ॥ १ ॥"

याठिकाणीं नळप्राप्तीनें मी बरी होईन असें सुचविणें असून तिला गुरुजनासमोर तसें स्पष्ट ह्मणण्याला लाज वाटूं लागली; ह्मणून कवीनें तिच्याकरवीं 'नलगे' या श्लेषयुक्त पदाची योजना केली. याठिकाणीं कवीचें अवर्णनीय चातुर्य दिसून येतें.

स्वयंवराच्यावेळीं दमयंती राजसभेमध्यें वर निवडण्याकरितां आल्यावर तिला तेथें जमलेल्या राजांची चांगली माहिती असून जी मोठी चतुर होती अशी तिच्याबरोबर असलेली तिची शारदा नामक सखी तिला राजांची माहिती सांगते.

श्लोक.

"हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावली कंधरीं ।
हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे आदरीं ॥
हा राजीवदलाक्ष सद्गुणनिधी फारा जनांचा महा ।
थारा हाच वरीं, रिपूंशि परते साराव्याचा पहा ॥ १ ॥"

अशाप्रकारें शारदेनें पुष्कळ राजांची नामावली घेतली; परंतु तिला त्यांपैकीं एकही पसंत पडला नाहीं. अखेर जेथें इंद्र, अग्नि, यम व वरुण नलरूप धारण करून बसले होते व जेथें खरा नळही बसला होता तेथें ती आली. तेव्हां शारदा तिला त्यांची माहिती करून देत आहे.—

"ज्यांचीं पदें धरिति देव शिरोललामीं ।
स्वाराज्य जो मिरवितो गजराजगामी ॥
जो वज्रपाणि बहु लोचन कांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १ ॥
साहील कोण सजणे बहु तेज याचें ।
मध्यस्थरूप धरितो हरिचे यमाचे ॥
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ २ ॥
संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणाशा ।
पाप्यांस दंड धरितो करितो विनाशा ॥
देहीं जया मिरवितें घनकांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ ३ ॥
आधार हाच सजणे बहु जीवनाचा ।
रक्षी दयेकरुनि मान ऋषीजनाचा ॥
यादांस फार ह्मणती जन सौख्यकारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ ४ ॥
होतील नंदनविलास जयास तो हा ।
आहे धनंजय ह्रि धर्महि जाण तो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजवितां विहारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ ५ ॥"

"प्रथम श्लोकांत शारदेनें इंद्राला 'बहुलोचन' हें विशेषण जोडिलें आहे. यावरून तिनें दमयंतीला असें सुचविलें कीं, इंद्र हजार डोळ्यांचा आहे अर्थात् तो कुरुप असल्यामुळें वरण्यास अयोग्य आहे. द्वितीय श्लोकाच्या आरंभीच अग्नीच्या तापाची असह्यता सुचवून तो वरण्यास योग्य नाहीं असें तिला सूचित केलें. तिसऱ्या श्लोकांत 'घनकांति' ह्या शब्दांनीं यम काळा आहे, असें सुचवून तो तुला वरण्यास अयोग्य आहे, असें दर्शविलें. चवथ्या श्लोकांत वरुण इतरांचें बरें करण्यांत सर्वदा गुंतलेला असतो व त्यामुळें त्यास स्वतःच्या पत्नीशींही बोलण्यासवरण्याला वेळ होत नाहीं असें सुचवून तो तुला वरण्यास योग्य नाहीं, असें सुचविलें. पांचव्या श्लोकांत [illegible] कवीनें आतां कमाल करून सोडली आहे. या श्लोकांत त्यानें आपली

सर्वच चतुररचना ओतली आहे असा भास होतो. ह्या श्लोकांत कवीनें वरच्या चारही देवांचे गुण नळामध्यें आहेत असें शारदेकरवीं दमयंतीस कळविलें आहे. ‘ नंदनविलास ’ शब्दानें इंद्रला सुचविली. इंद्राकडे नंदन-वनांतले विलास व नळाकडे आनंदकारक विलास. ‘ धनंजय ’ शब्दानें अग्निता सुचविली. ‘ धनंजय ’ असें अग्नीचें नांव आहे; तसा नळही आहे. नळपक्षीं ‘ धनंजय ’ या शब्दाचा अर्थ पुष्कळ द्रव्य मिळविणारा असा घ्यावयाचा. धर्म हें यमाचें नांव आहे. नळही धर्म ह्मणजे नीतिमान आहे; ‘ रत्नाकरीं विहारी ’ ह्मणजे समुद्रांत राहणारा वरुण आहे, तसा नळही आहे. नळपक्षीं रत्नाकरीं ह्मणजे रत्नांच्या खाणींत ( रत्नसमुदायांत ) विहारी ह्मणजे खेळणारा, ह्मणजे ज्यापाशीं पुष्कळ रत्नें आहेत असें सुचवून नळाकडे वरुणता सुचविली; परंतु वरुणाला स्वपत्नीशीं बोलण्याचालण्यालासुद्धां बनत नाहीं, असा वरतीं वरुणाचें वर्णन करिताना त्याकडे दोष सांगितला आहे, तो दोष नळाकडे न यावा ह्मणून ‘ तुज विराजविता ’ असें विशेषण दिलें आहे. ह्मणजे ह्यावरून तुला तो रत्नांच्या अलंकारांनीं मढवून काढून खुश ठेवील असें सुचविलें. “ नळरूपधारी ” ह्मणजे नळाचें रूप धारण कर-णारा असा वरतीं चार श्लोकांत अर्थ घेऊन येथें ह्मणजे पांचव्या श्लोकांत ‘ रूपधारी ’ ह्मणजे सुरूप नळ असा घ्यावयाचा. ”

अशाप्रकारची सश्लेषकविता मराठींत फारच थोडी आढळते. श्लेषरचना करण्यांत तरी निदान रघुनाथ पंडितांचा हात धरणारा कवि मराठींत दुसरा कोणीच झाला नाहीं; असें ह्मटल्यवांचून आमच्यानें रहावत नाहीं. असो.

अशी चमत्कारिक कविता उतरून घेण्याजोगी पुष्कळच आहे, परंतु ती घेतली असतां मजकूर फार वाढेल. हें आख्यान संस्कृतांत ‘ नैषध ’ ह्मणून जें उत्तम काव्य आहे, त्याच्या आधारानें व तोच नमुना घेऊन रचिलें आहे; व याला खालील श्लोकाचा चांगला आधारही पण आहे.—

श्लोक.

“ लोकीं सौरभ काव्य नाटक कलालंकारचूडामणी ।
सर्वां नैषधविद्वदौषध असे विख्यात वाग्धोरणी ॥
हे त्याचीच टिका टिकोनि घटिका ऐकेल जो आदरें ।
बोले त्या रघुनाथ पंडितकवी भेटे हरी सादरें ॥ १ ॥ ”

---

# अमृतराय.

अभंग.

"घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुम्ही आईका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना तेथें धांव घेई । राहीं विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥"

हा तुकोबारायांनी आपल्या पंचेंद्रियांना केलेला उपदेश कितीतरी प्रेमळ आहे ! परंतु तो आह्मां विषयीजनांना काय उपयोग ? पारमार्थिकानांच त्याचा उपयोग. वस्तुतः प्रत्येक मनुष्य जर आपल्या इंद्रियांचें नियमन करून त्यांना वरील अभंगांत सांगितलेल्या कामाकडे लावील तर किती बहार होईल ! असें केल्यावर त्याला 'नराचा नारायण व्हायला' कितीसा वेळ लागणार ? परंतु आह्मां प्रापंचिकांची दृष्टि वरील उपदेशाचे अगदी उलट असते. पारमार्थिकांची रसवंती रामनामांत नेहमीं रंगलेली असते परंतु आह्मांस एकमेकांच्या उलाळ्यापाखाळ्या काढून वर्दळीस येण्यापलीकडे दुसरा रस गोड लागत नाहीं ! त्यांचे नयनचकोर परमेश्वराच्या मुखचंद्रापासून स्त्रवणाऱ्या अमृताचें पान करण्यांत निमग्न असतात; परंतु आमची दृष्टि विषयावर व स्वार्थावर नेहमीं टपलेली असते ! त्यांचे कान भगवंताचे गुणानुवाद श्रवण करण्यांतच काय तें सुख मानतात; परंतु आमच्या कानांना अचकट विचकट व विषयपर गाणीं ऐकण्यापलीकडे दुसरा व्यवसाय माहीत नसतो ! त्यांचा मनोभ्रमर भगवत्पादारविंदीं रुंजी घालण्यांतच एकसारखा तल्लिन झालेला असतो; परंतु आमचें मन "आजचा दिवस बरा चैनींत गेला, आतां उद्यांचा कसा जाईल" या विवंचनेंतच रात्रंदिवस तळमळत असतें ! त्यांचा जीव परमेश्वराकडे ओढ घेत असतो; आणि विषयसुखाला लाळचावलेल्या आमच्या जीवाला स्त्रीदर्शनाशिवाय चैन पडत नाहीं ! तात्पर्य आमचें वर्तन प्रत्येक बाबतींत त्यांच्या अगदीं उलट असतें. 'मृत्युलोकींचें सारेंच उफराटें' असा ज्ञानेश्वरांनीं जो सिद्धांत करून ठेविला आहे त्याला बाध कोण आणणार ? साधुसंतांनीं आपला अनुभव आह्मांकरितां बोधरूपानें सांगून ठेविला आहे. पण त्याचा आह्मी उपयोग करून घेऊं तेव्हां ना ?

बोधासारखा हितकारी असा दुसरा मेवा नाहीं; पण तो कोणाला? चाखील त्याला! श्रीसमर्थांनीं दासबोधासारखा अनुपम ग्रंथ लिहून त्यांत सर्वांच्या उपयोगीं पडेल असाच बोध ग्रथित केला आहे; पण त्याचा खरा फायदा कल्याणस्वामींनीं किंवा शिवबांनीं जसा घेतला तसा अन्य कोणीं घेतला आहे काय! तुकोबारायांनीं भाराभर अभंग लिहिले व त्यांचें आजतागाईत हजारों तेली–माळी–कोळी पाठांतर करीत आले आहेत पण त्यांचें चीज करणारे निळोबारायांसारखे हरीचे लाल किती सांपडतील! कविवर्य मोरोपंतांनीं आर्यांना आर्यवाणीनें उपदेश केला पण त्याची खरी चव पांगारकरांसारखे एकदोन असामी सोडून बाकी कितिकांनीं घेतली? शाळेमध्यें पंतोजी व घरींदारीं गुरुजन, 'शिवी कोणा देऊं नये, कोणासंगें भांडूं नये' असें पोरांच्या नित्य कानीं कपाळीं ओरडत असतात; पण त्या सांगण्याप्रमाणें अगदीं पाय फुंकून चालणारीं मुलें आजमितीला किती आढळतील? फार तर बोटावर मोजण्याइतकींच. एका कानानें ऐकून घेऊन दुसऱ्या कानानें सोडून देणारींच फार! अशी जरी वस्तुतः स्थिति आहे तरी उपदेश करण्याचें काम कोणी सोडून दिलें आहे काय? अर्थात् नाहीं. पेरलेलें बी जसें सगळेंच वाया जात नाहीं किंवा भुईवर पडलेलें गोमय जसें माती घेतल्याशिवाय रहात नाहीं त्याच न्यायानें जनसमूहाला केलेला उपदेश अगदींच वाया जात नाहीं. तदनुरूप वर्तन करणारे कांहींजण तरी सांपडतात; म्हणून 'आपल्यापुरतें काम आपण करावें,' हें तत्त्व साधुलोक पाळल्याशिवाय रहात नाहींत; परंतु तसें करतांना त्यांची दृष्टि फळाकडे मात्र नसते. असो तात्पर्य, कल्याणस्वामी, शिवबा, निळोबाराय यांसारखीं उपदेशाचें खरें चीज करणारीं माणसें अलीकडच्या काळांत फार दुर्मिळ होत चाललीं आहे, हें फार शोचनीय आहे प्रस्तुत चरित्रनायकाच अंगीं उपदेशग्रहणशक्ति किती जबर होती व त्यामुळें त्यांच्या जीवनचारित्रांत कसा फरक पडला, हें पुढील भाग वाचला म्हणजे लक्ष्यांत येईल,

अमृतराय औरंगाबादेस रहात असत. हे जातीचे देशस्थ ब्राह्मण यांच्या मातापितरांविषयीं व. जन्मकालाविषयीं काहींच शोध लागत नाहीं. औरंगाबादेस विसामोरो म्हणून एक मोंगलसरकारचा मुत्सद्दी होता; त्याचे पदरीं हे होते. याचा स्वभाव फार थट्टेखोर असे. असें सांगतात कीं, यांनीं मध्वमुनीश्वर म्हणून एक साधु होता त्याची थट्टा केली; त्यावरून त्यांनीं त्यांस बोलावून नेऊन बोध केला कीं, ईश्वरानें तुला अमृततुल्य वाचा दिली आहे

व तुझ्या आईबापांनीं तुझें नांवहि तसेंच ठेविलें आहे, तर तूं आपल्या वाणीचा असा व्यय करून ती विफळ करितोस, त्यापेक्षां तिची जर ईश्वर-स्तवनाकडे किंवा लोकोपकाराकडे योजना करशील तर फार चांगलें होईल. हा बोध ऐकून अमृतरायास पश्चात्ताप झाला. तेव्हांपासून त्यानें मध्वमुनीश्वर ह्यांस गुरु करून आपलें लक्ष्य परमार्थसाधनाकडे लाविलें.

मध्वमुनीश्वरांची महाराष्ट्रकविवृंदांतील उत्तमांत गणना होत असल्यामुळें त्यांच्याबद्दल येथें चार शब्द लिहिले असतां ते अप्रासंगिक होतील असें वाटत नाहीं. महाराष्ट्रचरित्रकारांनीं यांची हकीकत अगदीं भिन्न भिन्न अशी दिलेली आढळते. महिपतीबोवा ताहराबादकर यांनीं आपल्या भक्तिलीलामृताचे शेवटीं या साधुपुरुषाचें चरित्र दिलें आहे, ते ह्मणतात— ' मध्वमुनी हा जनस्थानचा ह्मणजे नाशीकचा रहाणारा. यास पांडुरंगाचा साक्षात्कार होता. याची कविता साधी असून अत्यंत प्रेमळ आहे. तो उत्तम कीर्तन करी. कीर्तनांत तो स्वतःचीच कविता ह्मणत असे मुंबईंत कान्होजी आंग्रे ह्मणून एक सरदार होता. तो फार धर्मशील व उदार असून आल्यागेल्यांचा फार आदरसत्कार करीत असे. त्याचे पदरीं चौदा पंडित होते. त्यांत भास्करराय मुख्य पंडित होता. त्याला प्राकृतभाषेंत केलेले ग्रंथ आवडत नसत, यामुळें तो प्राकृत कीर्तन करणाऱ्या हरिदासांचा फार द्वेष करी. एकेदिवशीं मध्वनाथ फिरत फिरत कान्होजीकडे गेले. त्यानें मध्वमुनीच्या कीर्तनाचा बेत करविला. रात्रौ कीर्तनप्रसंगीं मध्वमुनींनीं प्राकृत कविता ह्मटल्यावरून भास्कररायास फार क्रोध आला. नंतर नाथांचा व त्या पंडितांचा मोठा वाद झाला. त्यांत भास्कररायाना हार खावी लागली.

औरंगाबादेंत लक्ष्मणपंत ह्मणून कोणीएक ग्रहस्थ होता. तो मध्वमुनींच्या मागें टाळकरी असे. कांहीं कारणानें त्याच्यावर सरकारची इतराजी झाली व ह्मणून त्याला तुरुंग पहावा लागला. तें वृत्त ऐकून मध्वमुनींना फार वाईट वाटलें. त्यांनीं एकाग्रमनानें परमेश्वराचा अगदीं धावा मांडिला. त्यावेळीं श्रीविठ्ठलांनीं काजीचें रूप धरून हाजीमहंमदखान नामक कोतवालास शासन केलें व लक्ष्मणरावास बंधमुक्त केलें. पुढें तो कोतवालही विरागी होऊन फकीर झाला.

वृद्धापकाळामुळें मध्वमुनींना पंढरीची वारी होईना. तेव्हां त्यांना श्री पंढरीनाथांनीं दृष्टांत दिला कीं, ' आता मीच तुझ्यासंनिध येतों; तूं येथें येण्याचे व्यर्थ श्रम करूं नकोस. उद्धवभट्ट जोशी यांच्या आंगणांत दीड

पुरुष खोल खड्डा खण ह्मणजे त्यांत तुला माझी स्वयंभू मूर्ति सांपडेल.' त्याप्रमाणें खणून पाहिल्यावर त्यांना विठ्ठलरखुमाईच्या मूर्ति सांपडल्या. नंतर त्यांनीं त्या मूर्तींची योग्यप्रकारें स्थापना केली. वृद्धापकाळीं मध्वनाथ हे सेंदूरवाडें येथें रहात असत.'

राजारामबोवा प्रासादी आपल्या भक्तमंजरी नामक ग्रंथांत ह्मणतात; 'मध्वनाथाचा जन्म नीरानदीच्या तीरीं 'कळबोली' या गांवीं झाला. हे अश्वलायनशाखी ब्राह्मण. यांचा जन्म शिवरात्रीस झाला ह्मणून आईबापांनीं यांचें नांव 'महादेव' असें ठेविलें. महादेवाची पांचवे वर्षी मुंज झाली. पुढें यानें जांभूळवनांत श्रीदत्ताची तपश्चर्या केली. तेव्हां दत्तानेंच यास अनुग्रह दिला; व नांव मध्वनाथ ठेविलें. मध्वमुनीचा जन्म शके १६६९ शुक्ल संवत्सर माघ कृष्ण १४ स झाला.' पुढील हकीकत वरीलप्रमाणें.

नरहरी धुंडिराज माळू हा आपल्या 'भक्तकथामृत' नामक ग्रंथांत ह्मणतो –'मध्वमुनि हा नाशिक येथें राहणारा याच्या बापाचें नांव नरहरि व आईचें नांव द्वारावती. या जोडप्यास नवसासायासांनीं एक पुत्र झाला. त्याचें नांव त्यानीं त्र्यंबक असें ठेविलें. सातारकर शिवाजी महाराजाचे जवळ हा कांहीं दिवस होता. यास प्रारंभीं त्र्यंबक गोसावी असेंच ह्मणत. यानें त्रिंबकरावाचा आश्रित अंबाजीपंत या नांवाचा होता, त्यास अनुग्रह देऊन त्याचें नांव 'अमृतराय' ठेविलें व त्यास परमार्थमार्गास लाविलें. हा त्र्यंबक गोसावी शेंदूरवाडें या गावीं रहात असे. याठिकाणीं मध्वाचार्यांची व यांची गांठ पडली. आचार्यांनीं याचें पुढें 'मध्वमुनि' असें नांव ठेविलें; व तेव्हापासून हा मध्वमुनि याच नांवानें प्रसिद्ध आहे.'

मध्वमुनीचा समाधिकाल शके १६९६ विरोधि संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा असा अलीकडील शोधकलोक मानतात अशाप्रकारें मध्वमुनीसंबंधी ज्या हकीकती प्रसिद्ध आहेत त्यांचा एकमेकींशीं मेळ बसत नाहीं. तथापि त्याच्या कवितेबद्दल कोणाचा मतभेद नाहीं. सर्व महाराष्ट्र ग्रंथकारांत मध्वमुनीची रसवंती अति रसाळ ह्मणून मशहूरच आहे. याचीं पदें ज्याला माहीत नाहींत असा हरिदास बहुतकरून सापडावयाचाच नाहीं. 'धनेश्वरचरित्र' या नावाची यानीं एक लहानशी ओंवीबद्ध गोष्ट लिहिली आहे. ही धनलोभ्याची हकीकत फार गोड आहे. असो.

कटिबंध किंवा कटाव ह्मणून एक कवितेचा प्रकार आहे. अमृतरायांची बहुतेक कविता याच वृत्तांत आहे. वामनाचा जसा श्लोक किंवा तुकारामाचा

जसा अभंग अथवा मोरोपंतांची जशी आर्या तसा अमृतरायांचा कटाव. आजपर्यंत अमृतरायांच्या कटावासारखा कटाव कोणत्याही कवीस साधला नाहीं. त्यांनी पदेंही पुष्कळ केलीं आहेत ते मोठे शीघ्रकवि होते. ते पद्यरचना इतकी जलद रीतीने करीत असत कीं, लेखकास ती लिहिण्यास अवकाश सांपडत नसे. त्यांची कांहीं कविता पुराणांतील कित्येक प्रकरणांवर आहे व कांहीं बोधपर आहे. यांच्या कवितेंत अर्थगौरवापेक्षां शब्दगौरव विशेष आहे. परंतु ह्यांची वर्णन करण्याची शैली फार चित्तवेधक असल्यामुळें आणि त्याचप्रमाणें ह्यांच्या कवितेंत प्रास व यमकें फार आहेत ह्मणून ती लोकांस फार आवडते. ह्यांनीं कांहीं कविता हिंदुस्थानी भाषेंतही केलेल्या आहेत.

दामाजीपंतांची रसद, द्रौपदीवस्त्रहरण, शुकचरित्र, ध्रुवचरित्र, सुदामचरित्र, जीवदशा, रामचंद्रवर्णन, गणपतिवर्णन, दुर्वासयात्रा इत्यादि लहानमोठे ग्रंथ त्यांनीं केले आहेत. ह्यांवर प्रायः ह्यांनीं कटाव रचिले आहेत.

अमृतरायासंबंधीं याहून जास्त अशी कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. त्यांच्या काव्याचें परिशीलन करतां असें दिसतें कीं, ते मोठे चतुर पंडित होते. त्यांचा स्वभाव रंगेल व विनोदी होता. समाधीटपणा हा एक त्यांचा स्वाभाविक गुण असून ते विशेष निःस्पृह असत. त्यांचीं कांहीं कांहीं पदें इतकीं सुरस व सखोल आहेत कीं, तीं श्रोत्याच्या व वाचकांच्या हृदयांचा भेद केल्याशिवाय रहात नाहींत. हे महाराष्ट्रांत अत्यंत लोकप्रिय होऊन गेले; व ही लोकप्रियता होण्याचें मुख्य कारण त्यांचे अप्रतीम वक्तृत्व. ह्या महापुरुषांनीं कथेच्या रूपानें लोकस्थितीची उन्नति करण्याचें जणूंकाय अगदीं ब्रीदच बांधिलें होतें. त्यांची वक्तृत्वशक्ति इतकी मनोवेधक होती कीं, त्यांचें कीर्तन सुरू असतां श्रोत्यांच्या मनोवृत्ति प्रहरानुप्रहर सारख्या तल्लीन होऊन रहात असत. भाविकजनांच्या मनांत धर्म व नीती यांचीं तत्त्वें उत्तमरीतीनें बिंबून प्रपंचाचा तिटकारा व परमार्थ संपादण्याची इच्छा हीं अत्यंत प्रबळ होत असत. इतकेंच नव्हे, तर दुर्जनांच्या पाषाणहृदयांनाही पाझर फुटून ते कुमार्ग टाकून सत्पथाकडे वळल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतात. त्यांची कथा विशेष मनोहर होण्याचें कारण ह्मटलें ह्मणजे त्यांचें शीघ्रकवित्व होय. कोणत्याही आख्यानावर जरी कीर्तन चाललें असलें तरी तात्कालीक कवित्वस्फूर्तीनें त्यांच्या कीर्तनास रंग भरल्याशिवाय कधींच रहात नसे. वाणी मधुर, भाषा सरळ व सुबोध, त्यांत पुन्हा यमकानुप्रासांची गर्दी मग काय पहावयाचें आहे. दुग्धशर्करेचाच संयोग तो; मोरोपंत ह्मणतातः—

" कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा ॥
भलत्या मुखांतुनि अशी सुरसखनि निघेल काय जी वाचा ॥१॥"

वरील आर्येंत पंतांनीं अमृतरायास बृहस्पतीचा अवतार असें ह्मटलें आहे; तें योग्य नाहीं असें कोण ह्मणेल ! त्यांची कविता वाचली असतां ते खरोखरीच बृहस्पति होते असें वाटतें.

असें सांगतात कीं, नानासाहेब पेशवे ह्यांनीं त्यांची एक कथा करविली होती, ती ऐकून त्यांस संतोष झाला, आणि त्यांनीं त्यांची फार प्रशंसा केली. ह्या गोष्टीवरून अमृतराय १५० दीडशें वर्षांपूर्वी होते असें दिसतें.

त्यांनीं आपल्या गृहस्थितीचें चित्र रेखाटलें आहे त्यांत एका श्लोकांत ह्मणतात. आपली स्त्री कशी होती तर.—

" दारीं देत कडी सदां कडकडी बोले महा वांकडी ॥
दाणे चोरुनि फांकडी न कळतां घेते मुळे कांकडी ॥
खाते ती जसि माकडी वसवसा दांतीं दिसे खेंकडी ॥
यायोगें अमृतेश्वरासि रुचली गंगातिरीं झोंपडी ॥ १ ॥ "

यावरून असें दिसतें कीं, ' अमृतरायांची पत्नी अत्यंत कर्कशा व जाचक स्वभावाची होती. तिच्यापासून त्यांना सुखप्राप्ति कधींच झाली नसावी. हा तिचा दुःस्वभावच बहुतेक त्यांच्या निस्सीम वैराग्यवृत्तीस कारण झाला असावा असें वाटतें. त्यांनीं घरदार सोडून गंगातीरीं झोंपडी घातली होती व तेथेंच ते जाऊन राहिले होते असें वरील श्लोकांत स्पष्टच ह्मटलें आहे. असो. त्यांनीं शके १६७५ त आपल्या देहाचें विसर्जन केलें असावें, असें अधुनिक महाराष्ट्र पंडिताचें मत आहे.

---

## अमृतरायांच्या व मध्वमुनींच्या काव्यांतील वेंचे.

अमृतरायांचे कटिबंध फारच लांब लांब आहेत. एक एक कटाव पांच पांच सहा सहा चौकांचा आहे. त्यामुळें येथें सबंध उतरून घेतां येत नाहीं. दुर्वासऋषि छळ करण्यास आले तेव्हां द्रौपदीनें कृष्णाचा धांवा केला त्याविषयीं अमृतरायानें वर्णन केलें आहे.—

" तंव ते द्रौपदि वृंदावनिं जाऊनि वृंदापतिवृंदारकजनवृंदवंद्य जो, वृंदानायक वृंदावनिं ज्या वास निरंतर, प्रार्थिति सुंदर, दनुजभयंकर,

रूपमनोहर, नामचि मुरहर, तेंचि ब्रह्मनिर्गुणनिरामय, निर्विकल्पनिःसंगनिरन्वय, निर्भयचिन्मय, व्यक्ताव्यक्ताचे येउनि राहे त्यामति बाहे, धांव धांव बा तूं श्रीरंगा, अद्वयरंगा, भवभयभंगा, तूं निःसंगा, षड्रिपुनाशन महाशौर्या, उत्पत्ति-स्थिति संहृतिकार्या, साक्षी तूं या पर्यायें पाहातां निजनिपुणा, एकवेळ दावि तूं चरणा करि कीं करुणा कैवारी तूं पांडवप्राणा— ”

असेंच दुसऱ्या एका कटिबंधांत त्यांनीं ईश्वराचें यथार्थ व गोड वर्णन केलें आहे.—

“ जो सुज्ञ समर्थ सनातन सर्वोत्तम सर्वेश सर्वगत सर्वसाक्षी, सर्वांतरव्यापक, सर्वसखा हृदयस्थ सदा जवळीच असे, सकळांत वसे, कवणा न दिसे परि कर्म शुभाशुभ पाहतसे, अधिकार असे, फळ भोगितसे, हरि दूरि नसे,–”

“ जीवदशा ह्मणून त्यांनीं एक सुंदर कटाव केला आहे. तो फारच मजेदार आहे. त्यांत गर्भावस्थेपासून मरणापर्यंत मनुष्याच्या आयुःक्रमांत घडून येणाऱ्या गोष्टींचें फारच बहारदार वर्णन केलें आहे. तो येथें सबंध घेतों.

“ सज्जनहो निजगुज आपुलें उमजाना, हरिलागिं भजाना ॥ धृ० ॥ नऊमास गर्भांत सांपडे, मूत्र-मलादिक फार सांकडें, तनुसि तोडिति जंतू कीडे, बहु श्रमानें बाहेर पडे, स्मरण मुळींचें सर्व विसरला, सोहं कोहं रडूं लागला, दिवसां मासां वृद्धि पावला, क्षणक्षणा अपघात चुकला, धनमदगर्व फार दाटला, अहंपणाचा पूर लोटला, पांचा विषयांकाजि बाटला, पापाचरणें मनीं काटला, भला थाटला, संसार अपार, थोर करितो कारभार, महाल मुलुख जागीर इजारा, कमाविसदारी, भारि पसार सावकारी, हत्ती घोडे सैन्य शिबीका, बा पोषाख कानिं चौकडा, सुंदर वनिता प्रिया न वोढा, शहाणपणाचा गर्व गाढा, मनसोब्याचा करी निवाडा, वाडा रंगींत रंगमहाल, सोनेरी बैठका, जरी भर्जरी तमाम ऐने, काम मुलायम, फिरंगाणी विल्लोरी फाणसें, मिनेगारि किनखापी पडदे, खणोखणीं रेशमी गालिचे, बागबगीचे, राग-रंगामधिं गुंग बेटा, निसंग मोठा,

अभिमानाचा चढला ताठा, उन्मत्त खोटा, धर्माविषयीं फार करंटा, त्याच्या बंधुंनिं धरल्या वाटा, अग्नि तस्कर करिति चपेटा, आटापीटा, राजदंड ऊदंड उदेले, भंड निघाले, लंडपणें प्रचंड भोगिलें, परोपरीची छीथू अवघी, मारामारी जरबंद कडाकड सोटे मारी, कमचा पाठीं उडती भारी, या या परिचे जाच शरीरीं, हृदयीं मस्तकीं शिळा भारी, वोढितां जड खोडी बेडी, पायिं रोकडी, प्राप्त देहुडी, तरी येइना कबूल कवडी, अधिकारी घरदार सांवडी, सर्वहि नेलीं घोडींपीडीं, उरली नाहीं एकही कवडी, पहिली होती बिनी वांकडी, शालजोडिला शेला जोडी, देवद्विजगुरु तडीतापडी, त्यांसि क्रोधें फार झडाडी, ईश्वर त्याची मस्ती मोडी, आतां कैंची उप्पर माडी, देशधडीवर गुढी लाविली, दुष्कर्माचीं अभ्रें दाटलीं, पहा पहा रे डोळे उघडूनि, पुढें यातना यम-लोकींच्या, नानापरिच्या, जाणोनि ऐथेंचि का सावध व्हाना, हरिलागिं भजाना ॥ १ ॥"

भाऊबंदकी मोठी कठीण आहे. तिच्यापायीं मनुष्याचे कसे कसे हाल होतात याचें वर्णन कविरायांनीं वरील कटावांत थोडक्यांतच पण फार बहारदार केलें आहे.

सुदामचरित्रांत रायजी सुदामदेवाचें वर्णन करितात.—

"जाहले हातपाय त्या नळ्या, नाडी दिसती वरी वेगळ्या, सुकलें मांस पडल्या वळ्या, नखिं वेष्टियल्या आंगोळ्या, उपोषणें चिरकालें झालीं, सरकाळें अंगाचीं वाळूनि, देह तपें जाहलासे जर्जर, उभा अस्थिचा केवळ पंजर, तो भूनिर्जर, निगमागर्भ कृश दुर्भर, बोटीं दर्भ पवित्र, सदा मुखीं स्तव, ब्रह्मसूत्र सित गळां, परि निव्वर दोडका, तेंवि रोडका, धर्म जोडका, अडका जवळि नाहिं तथापि—"

पुढें उभयतांच्या भेटीच्या वेळचें कवि वर्णन करितात.—

'चौथें मुक्त द्वार हरीचें, वेंघतांचि देखिलें हरीनें, लगबग लगबग, अंबी रुक्मिणी, बसली ते पर्यंकीं लोटुनी, उडी घालुनी, धांवत धांवत त्वरें येउनी, ब्राह्मणचरणीं मस्तक ठेवुनी, दंडवतानें मिठी घालुनी, उठीं उठीं ह्मणतांचि सुदामा, चहूं भुजीं कडकडुनि आलिं-

शुनि, प्रेमबाष्प वारि लोचनीं, स्फुंदत स्फुंदत कडे घेउनी, नाचत नाचत, पूर्ति नव्हे प्रियमूर्ति द्विजाची, निजासनीं बैसविली ॥ श्रीकृष्णें सुदामजीला सोन्याची नगरी दिधली ॥"

पैशाशिवाय जगांत रहाणारांचें कांहीं चालत नाहीं. पैसा आहे तर सर्व कांहीं आहे. 'सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ति' हें सुभाषित प्रसिद्धच आहे. सांप्रत सर्व आर्यावर्तच निष्कांचन झाल्यामुळें जवळ पैसा नसला ह्मणजे कसे काय हाल होतात याचा अनुभव बहुतेक सर्वांस आहे. त्याची व्याख्या करण्याची वस्तुतः आतां कांहीं गरज नाहीं. या पैक्यासंबंधीं रायजी ह्मणतातः—

पद.

'अर्जि तुह्मी ऐका । सखि सहोदर ह्मणती पैका ॥ धृ० ॥ पैक्यापासून कामकाज । पैका मिळवी बहुत व्याज । पैका मायेचें निजबीज । पैका बहु रक्त महाराज । कागद रोखा ॥ सखि० ॥ १ ॥ पैक्यापासुन कारभार । पैका हिंडवी दारोदार । पैका दुःखाचा डोंगर । पैका गर्वाचा सागर । बुडवी कटका ॥ सखि० ॥ २ ॥ पैक्यापासून पुराणश्रवण । पैका करी वेदपठण । पैका करी नृत्यगायन । ज्याला पैका न मिळे कधीं तो नित्य फिका ॥ सखि० ॥ ३ ॥'

पैक्यानें खिसा गरम असला ह्मणजे त्याची जगांत कशी चलती असते याबद्दल रायजी ह्मणतात.—

कटाव.

'आहारे मूर्खा जन्मोनी काय केलें रे ॥ ध्रु० ॥ पैसा पाहुनि ह्मणती या जी, रौप्यपाट मांडिला बसाजी, वाजीवर गोमाशी ताजी, तैसे गुलाम करिती हांजी, अर्जी विनविति फर्जी, जैसा गुर्जर श्वानापरि धांवती, या या ह्मणती, अडणीवरती सुवर्णताटीं, रत्नखचित वाट्या मांडुनि, पाट रुप्याचे, सोले ओले, मिरें धणें चमचमित फोडणी हिंगाची, ती भुकटी घालुनि तीक्ष्ण आमटी, दाटी जाहली, पदार्थांची, पात्रीं शाखा चोखा, आंबे साखरलिंबें, दाळिंबाचे दाणे काढुनि, नीतळ शीतळ, पन्हें फुटाचें, तिखटमिठाचें, थालिपिठाचें, मिष्ट बहु तें पिष्ट, बदामी वाटुनि डाळी, भजीं निराळीं, घोंस दोडके, वांगीं सगळीं, चवळी चिवळी, आणि पडवळी, मेथी पोथी केळे, राय आवळे, भात

शुभ्र तो जिरेसाळिचा, खाजी करंजी, घ्याजी दाजी, आग्रह करिती साखरखांडा, उंडा भरपूणोचा घोंडा, तोंडापुरता घोळिति गोंडा ॥ आहा रे मूर्खा जन्मोनी का० ॥ १ ॥'

याच विषयावर त्यांनीं आणखी पद्य केलें आहे, तें वरील कटावाहून कांहीं अंशीं सरसच आहे, असें ह्मटलें तरी चालेल. तें पद्य असें.—

पद.

'बा तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ ॥ धृ० ॥ हे कोण बायकोचे साले । तुपावेगळा घांस न गिळे । तांदुळ रांधियेले मोकळे । केलें बेंबीचें ऊखळ ॥ बा तुझा० ॥ १ ॥ हे कोण बायकोचे मामे । घरांत वागती रिकामे । साखर शाल्योदन खाणें । भोजनभाऊ केवळ ॥ बा तुझा० ॥ २ ॥ बहिणी सासू घरासि येती । फराळाच्या पंक्तीं बैसती । नातीं कोरकोरून काढिती । सर्व मायेचा गोंधळ ॥ बा तुझा० ॥ ३ ॥ अमृतराय ह्मणे रे मूर्खा । किती भुललासी मायेच्या सुखा । अंतीं जासी एकटा नरका । भज सद्गुरु दयाळ ॥ बा तुझा० ॥ ४ ॥'

सद्गुरूचा लाभ झाल्याशिवाय जीवात्मा स्वानंदसाम्राज्यीं विराजमान होत नाहीं हें समजावून सांगण्याकरितां मध्वमुनीश्वर ह्मणतात.—

॥ पद ॥

'तो नर गति चुकला । स्वानंदातें मुकला ॥ तो नर० ॥ ध्रु० ॥ सद्गुरु-वर दा वाणी । नाहीं नाहीं ज्याचे श्रवणीं ॥ तो० ॥ १ ॥ शास्त्र पाहुनि वक्ता । बोलत फार अनुभव नसतां ॥ २ ॥ धर्म-वासना कांहीं । ज्याचें मानसिं तिळभर नाहीं ॥ ३ ॥ संतसंग हरिभक्ति । क्षणभरी न ये मनांत विरक्ति ॥ ४ ॥ मध्वनाथ ह्मणे भाव । सद्गुरु वाचुनि कैंचा देव ॥ ५ ॥'

श्रीकृष्ण सर्व गायी घेऊन चारायला निघाले त्या प्रसंगास अनुसरून हें खालील पद आहे.

॥ पद ॥

मनमोहन मुरलीवाला । हृदयीं आला ॥ ध्रु० ॥

रुचली उंच घोंगडि त्याला । प्रिय कोमल तुळशीचा पाला ।
चारित वृंदावनिं वत्साला । वाटे प्राणसखा हा चिमण्या गोप
मुलांला ॥ १ ॥
गोरस गोप वधूंचें प्याला । ढेंकर देउनि उदरीं घाला ।
चिन्हें शुभ्र दिसति अधराला । त्याहुन वरि कलगी तुरा खुलला
गुछाला ॥ २ ॥
पाहुनि वत्स व्रजवनितांला । करतळिं ठेवित दहींभाताला ।
अंगुलिकांवरि शाकफळाला । कांखे वेताटी हरि खोंवित जठरीं
वंशाला ॥ ३ ॥
पाहुनि श्रीमत्‌भागवताला । आशय पुसुनि बरा संताला ।
भूमात्री भगवंताला । पाहतां अमृतेश्वर हरि अवघा एकाचि झाला ।४

या उभय गुरुशिष्यांच्या काव्योदधींतून आणखी पुष्कळ सुंदर सुंदर रत्नें वाचकांना दाखवितां आलीं असतीं, परंतु त्या उदधींत दुसरी उडी मारण्याइतका आतां दम न राहिल्यामुळें निरुपाय आहे!

---



# अनंतफंदी.

दुस्तर संसारसमुद्र ज्या नौकेच्या साह्यानें सतर भासतो, मनोभुवनाला आवृत्त करणाऱ्या अज्ञानतमाचें ज्या ज्ञानसूर्यानें निवारण केलें जातें, आप्तबांधवांचे मायापाश ज्या कातरीनें कातरले जातात, अंतःकरणांत व्यसनाच्या भडकलेल्या दुर्निवार्य आगीचें ज्या दयाजलानें शमन करितां येतें, आधिव्याधींनीं व तापत्रयांनीं त्रस्त झालेल्या जीवात्म्याला ज्या कल्पलतेच्या सुखकर, शीतल व दाट छायेंत विश्रांति मिळते, मुक्तिवस्त्राचा तंतु ज्या चातींतून निघतो, ती नौका, ती कातर, ती कल्पलता, ती चाती, तें दयाजल व तो ज्ञानसूर्य ह्मणजे सत्संगति होय. अशा या सत्संगतीची महति गावी तितकी थोडीच. सत्संगति दुष्टबुद्धीचें निरसन करून चित्त निर्मळ करते; त्याप्रमाणेंच पापाचा सतत नाश करून सर्वांवर दया करावयाला शिकविते. तात्पर्य सत्संगति या जगांत कोणतें मंगलकृत्य करीत नाहीं? सर्व कांहीं करते ! 'तनु त्यागितां कीर्ति मागें उरावी' हाच प्रत्येकाचा जीवितहेतु असतो. हा जीवितहेतु साध्य करण्याकरितां प्रत्येक मानवप्राणी आपापल्यापरी धडपड व कष्ट करीत असतो. ही धडपड व हे कष्ट सुयशस्कर होण्याकरितां प्रत्येक सुविचाराचा आश्रय करावा लागतो; ह्या सुविचाराची उत्पत्ति आत्म्याशीं दोन हितगुजाच्या गोष्टी बोलल्याशिवाय होत नाहीं व हितगुजाच्या गोष्टी सत्संगाशिवाय करतां येत नाहींत. या सत्संगाच्याच साह्यानें **अनंतफंदींना** आपला कवितारूप कीर्तिध्वज दक्षिणमहाराष्ट्रांत अखंड फडकविता आला आहे; तो वृत्तांत येणेंप्रमाणें:—

या फंदी कविरायांचा जन्म नगर जि० पैकीं संगमनेर येथें शके १६६६ त ह्मणजे सन १७४४ त झाला. यांच्या वडिलांचें नांव उपलब्ध नाहीं; जननीचें नांव राऊबाई किंवा राणूबाई असें होतें. यांचें उपनांव घोलप; हे यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. यांचे पूर्वजांचा धंदा गोंधळीपणाचा व थोडाफार सराफीचा होता. यांनीं लहानपणीं कांहीं विद्याभ्यास केला कीं नाहीं हें समजण्याला जरी कांहीं मार्ग नाहीं तरी पण त्यांनीं आपल्या नांवापुढें जोडलेल्या 'फंदी' या टोपण नांवावरून वरील शंकेचें निराकरण होण्याजोगें असून त्यांच्या स्वभावाची परीक्षाही बरीच होण्याजोगी आहे. यांची वृत्ति मोठी रंगेलपणाची व महत्वाकांक्षी असावी असें दिसतें. रा. रा. शंकर तुकाराम शाळिग्राम यांचेसंबंधानें असें ह्मणतात कीं, "फंदींनीं

आपल्या हातांनीं लिहून ठेविलेली **श्रीमाधवग्रंथाची** प्रत आह्मांला त्यांचे घरींच पहावयाला मिळाली ती अगदीं खराब अक्षरांनीं लिहिलेली आहे. ”

वरील अभिप्रायावरून असें ह्मणावयास हरकत नाहीं कीं, फंदींचें शिक्षण यथायथाच झालेलें होतें; तथापि अशी जरी गोष्ट होती तरी यांच्या काव्यावरून एवढें निर्विवाद सिद्ध आहे कीं, बहुश्रुतपणा, भाषानैपुण्य, वक्तृत्व व निस्पृहता हे अजब गुण लहानपणापासूनच यांचेठायीं होते. या आमच्या ह्मणण्याची सत्यता मर्मज्ञ व रसिक वाचकांना पुढील उतारे वाचले ह्मणजे कळून येणारी आहे. हे कीर्तन करण्यांत चतुर होते, इतकेंच नव्हे तर या कलेंत त्यांचा हात धरणारा कीर्तनकार त्यावेळीं रामजोशांशिवाय दुसरा कोणी नव्हता. असो. फंदींची येवढी जी ख्याति झाली ती याच अप्रतिम गुणावरून होय पूर्ववयांत यांनीं जें कांहीं काव्य केलें तें उत्तान व अत्यंत शृंगारपर असून विषयाचें उद्दीपन करणारें आहे. यांस महासाधु **भवानीबोवा** संगमनेरकर यांचे वरप्रसादेंकरूनच प्रथमतः कवित्वस्फूर्ति झाली असें सांगतात; ती गोष्ट अशीः—हे भवानीबोवा साधू एक अवलियावृत्तीचे पुरुष असत. यांची समाधि संगमनेरीं आहे. अक्कलकोटच्या स्वामीसारखाच यांचा प्रकार असे. हे कोणाला अपशब्द बोलले किंवा यांनीं कोणाला ताडन केलें कीं, त्याचें कल्याण खास व्हावयाचेंच असें समजत असत. अशाविषयीं लोक त्यांच्या पुष्कळ गोष्टी सांगतात. असो. फंदीबुवा लहानपणापासूनच खोडकर असत. त्यांच्या व्रात्यपणाबद्दल घरी कधीं कागाळ आली नाहीं असा दिवसच जात नसे. व्रात्य मुलाच्या खोड्या कशा असतात याचा थोडाफार अनुभव बहुधा सर्वत्रांना असतोच. ही स्वारी एकदा घरांतून बाहेर पडली ह्मणजे दोन पावलेंसुद्धां सरळ ह्मणून जायची नाहीं समवयस्क मुलगा भेटला ह्मणजे—मग तो परिचित असो कीं अपरिचित असो—त्याची कांहीं खोडी केल्याशिवाय त्यांना चैन ह्मणून पडायचेंच नाहीं त्याची एकादी नसती कुरापत काढून त्याच्या श्रीमुखांत तरी देतील, त्याचे कान तरी उपटतील, तंगडी तरी धरतील, निदान कांहींच सापडलें नाहीं तर त्याला चिमटा तरी घेतील; हातांत छडीबिडी असली तर मग विचारावयासच नको; तिला गरके देऊन एकाद्याची टोपी तरी उडवितील. अशा दोनचार मूर्ति जर एकत्र झाल्या तर मग ‘ गाढवांचा गोंधळ व लाथांचा सुकाळ ’ झालाच ह्मणून समजा ! यावरून तात्पर्य एवढेंच काढावयाचें कीं, मर्दुमकी, तेज व विनोदसंमिश्र मायावीपण ह्याचें बाळकडू ह्या वयांतच

मानवाला पानलेलें दिसतें. अपवादादाखल जर एखादें मेषपात्र आढळलेंच तर तो झांकला वाण किंवा 'बावळी मुद्रा व देवळीं निद्रा' या कोटींतला आहे असें समजावें! अशांतूनच अजरामर कीर्ति करून जगाला भूषणभूत होणारा हैदर, क्लाइव्ह किंवा फंदीसारखा एखादा पुरुष निपजत असतो!

असो. फंदींचा अशा प्रकार नेहमीं होता ह्मणून आई एक दिवस थोडें रागें भरली. हे राजेश्री रुसून जे बाहेर गेले ते रात्रीं घरीं ह्मणून परत आले नाहींत! भवानीबोवांचे मठांत जाऊन निजले. दुसरे दिवशीं आई इकडे तिकडे शोधीत शोधीत भवानीबोवांचे मठांत आली तों स्वारी तेथें होती. मग घरीं येण्याविषयीं तिनें त्यांची पुष्कळ मनधरणी केली, परंतु हे हालेनात! आईनें 'दादा, पुता करून' 'नारसिंह अवतार दाखवून' व किंचित् हाताचा ही प्रयोग करून पाहिला पण त्यांनीं तिला दाद ह्मणून दिली नाहीं! अखेर तिनें भवानीबोवांपाशीं मुलाचीं सर्व गाऱ्हाणीं सांगितलीं. तीं सर्व ऐकून घेऊन भवानीबोवा आपल्या विलक्षण तऱ्हेच्या भाषणांत त्यांना बोलले 'जा घरीं' जीव येथून,' तरी फंदींची स्वारी हलली नाहीं. मग एक धोंडा घेऊन तें त्यांच्या मागें लागले व शेवटीं तो धोंडा त्याजवर फेंकिला आणि फंदींस घालवून दिलें. याच दिवसापासून 'अनंतफंदी' स कवित्वस्फूर्ति प्राप्त झाली असें ह्मणतात!

यापुढें फंदींनीं तमाशा आरंभिला व त्यांत ते स्वतःच्याच लावण्या ह्मणत असत. त्यावेळीं याचे तमाशांतील साथीदार एक 'मलकफंदी' दुसरे 'रतनफंदी' तिसरे 'राघवफंदी' आणि चवथे हे खुद्द 'अनंतफंदी' यांस 'फंदी' हें नाव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वीं संगमनेरास 'मलकफंदी' ह्मणून कोणी एक फकीर होता; तो लोकांत नेहमीं चमत्कारिक रीतीनें वागत असे ह्मणून लोक त्यास 'फंदी' असें ह्मणत. त्या फकिराचा आणि अनंतफंदींचा फारच स्नेह व त्यावरून लोक यास ही 'फंदी' ह्मणूं लागले!

असो. पुढें हें फंदीचतुष्क तमाशा घेऊन एकवेळ होळकरशाईंत गेलें. त्यासमयीं होळकरांचे राज्याची लगाम अहिल्याबाईचे हातीं होती. हें फंदीमंडळ होळकराची त्यावेळची राजधानी जी महेश्वर तेथें येऊन दाखल होताच अहिल्याबाईनीं चालीप्रमाणें कोणी विन्मुख जाऊं नये ह्मणून यांचा एक दिवस राजवाड्यांत तमाशा करविला. फंदींचें कवन ऐकून तमाशा झाल्यावर त्या साध्वीनें यांस उपदेश केला कीं, तुह्मीं ब्राह्मण असून अशा कर्मांत कवित्वबुद्धि खर्च करितां त्यापेक्षां हीच कविता स्वार्थ आणि परमार्थ

साधेल अशारीतीनें प्रसिद्ध कराल तर आपल्याबरोबर अन्यजनांचेंही हित होईल ! वरील गोष्टीवरून अहिल्याबाईची परमार्थावर दृष्टि कशी होती व तिला गुणांची व गुणीजनांची परिक्षा किती होती, हें उघड दिसतें ! तिच्या सारखी साध्वी स्त्री निदान राजकुलांत तरी सांपडणें दुर्मिळ ! या बाईचें नांव ज्याला माहीत नाहीं असा एकमुद्धां भारतवासी जन आढळणार नाहीं ! प्रख्यात महाराष्ट्रभाषालेखक वि. कों. ओक या बाईबद्दल असें लिहितात कीं, " आधीं दुनियेमध्यें चांगलीं माणसें फार थोडीं निपजतात. त्यांत राजे-रजवाड्यांच्या कुळांत तर फारच कमी. इतिहासाकडे पहावें तों क्रूर, दुष्ट, दुराचारी, मत्सरी व लोभी मनुष्यांच्या झुंडीच्या झुंडी दृष्टीस पडतात. काळ्या रेतीच्या अफाट मैदानामध्यें जशीं मध्येंच चार पांच मोत्यें चमकावीत तसें हें एक मोतीं आमच्या हिंदुस्थान देशांत ईश्वरीकृपेनें पैदा झालें होतें, व त्याबद्दल प्रत्येक स्वाभिमानी पुरुषाला आनंद, प्रेम व आदर वाटला पाहिजे! " पुष्कळ इंग्रजी इतिहासकारांनीं व आमच्या देशांतील त्यांच्या बगलबच्यांनीं या साध्वीची व इंग्लंडची प्रख्यात राणी जी इलिझाबेथ् तिची तुलना करण्याचा प्रयत्न केला आहे व इला तिच्या पंक्तीस नेऊन बसविलें आहे ; परंतु आमच्या हीन दृष्टीला तर ही तुलना ' अग्नि व पाणी ' यांच्या तुलनेसारखीच विपरीत दिसते, मग आमच्या दृष्टींतच कांहीं व्यंग असल्यास नकळे, कारण असें पहा,—अहिल्याबाईला आत्मस्तुति अगदीं आवडत नसे व याचें प्रमाण पाहिजे असल्यास मोरोपंतांनीं तिच्या स्तवन-पर ज्या कांहीं कविता केल्या होत्या त्या सर्व तिनें नदींत बुडविल्या हें होय! इलिझाबेथ् अत्यंत स्तुतिप्रिय होती. अहिल्याबाईला आपल्या सौंदर्याचा तिळमात्र गर्व नसे. इलिझाबेथ्ला स्वसौंदर्याचा गर्व इतका अनिवार होता कीं, तिनें प्रत्यक्ष आपल्या ' मेरी क्वीन् ऑफ स्कॉट्स ' नामक मावस बहिणीला कैद करून तुरुंगांत टाकलें व तिचा अखेर भलतेंच निमित्त पुढें करून शिरच्छेद केला. अहिल्याबाईनें गोरगरिबांस पुष्कळ दानधर्म केला. इलिझाबेथ्नेंही दानधर्म केला पण तो कोणास तर आपल्या प्रेमपात्रांस! अहिल्याबाई आपला बराच काळ ईश्वरभजनांत व पुराणश्रवणांत घालवी. इलिझाबेथ् आपला वेळ आपल्या प्रेमपात्रांशीं विनोद करण्यांत घालवी! पतिनिधनापासून अहिल्याबाईनीं रंगाचें पांघरूण वर्ज केलें होतें इतकेंच नाहीं तर तिनें राजभूषणांचा ही त्याग केला होता. इलिझाबेथ् आपल्या प्रेमपात्रांच्या संगांत आजन्म कुवार राहिली व तिनें लोकांनीं आपणांस

सुंदर ह्मणावें ह्मणून देहाचे सर्व कांहीं चोजले पुरविले. अशाप्रकारच्या ह्या इंग्रजांनी व त्यांचीच 'री' ओढणाऱ्या एतद्देशियांनी केलेल्या तुळनेंतील वास्तविक प्रकार निदान आह्मांला तरी 'राजा बोले व दळ हाले' अशा-तळाच दिसतो, व याहून जरा कडक लिहावयाचें ह्मणजे 'बैल गाभण तर होय साहेब त्याला नववा महिना लागला आहे' अशापैकींच दिसतो!

असो. अहिल्याबाईनीं वरील केलेला सदुपदेश ऐकून फंदींची वृत्ति पाल-टली व त्यांनी तात्काळ आपल्या हातीं असलेल्या डफाच्या कड्यावर बुक्की मारून तें फोडिलें. अहिल्याबाई तमाशाची बिदागी देत असतां ती न घेतां स्वारी तशीच संगमनेरीं माघारीं आली व यापुढें फंदींनीं तमाशा करावयाचा नाहीं असा निश्चय केला.

फंदींचा हा निश्चयदुर्ग ईश्वरीइच्छेच्या अढळ खडकावर न उभारला गेल्यामुळें ग्रामस्थमंडळींनीं स्वामी अनंताच्या प्रातिवार्षिकोत्सवाचे वेळीं त्याच्या तळाशीं आग्रहाचा व भीडेचा सुरुंग लावून तो ढासळून पाडण्याचा यत्न केला व त्यांत त्यांना यश ही आलें. फंदींनीं त्यादिवसापासून पुन्हां तमाशाला आरंभ केला. हा तमाशाचा क्रम पुनः पूर्ववत् चालू झाला नाहीं तोंच अहिल्याबाईची स्वारी पुण्यास जाण्याकरितां संगमनेरीं आली. ही स्वारी ज्या रस्त्यानें जात होती त्याच रस्त्यावर माणसांची गर्दी त्यांच्या दृष्टीस पडली. ही गर्दी कशाची असा तपास करतांच 'येथें तमाशा होत आहे' अशी त्यांस खबर कळली. तमाशा कोण करीत आहे असा शोध करतांच त्यांस अनंतफंदींचें नांव कळलें. त्यासरसीं त्या राजकारणी स्त्रीस पूर्वीचे गोष्टीची आठवण झाली व त्या झपाट्यात त्या फंदींचें डोकें मारावें असा इरादा करून रागानें माघारीं फिरल्या. फंदीस ही वार्ता कळतांच त्यांचा नूर एकदम खाडकन् उतरला, परंतु अशा आणीबाणीच्या प्रसंगीं ही त्यांच्या समयसूचकतेनें त्यांस दगा दिला नाहीं! त्यांनीं नर्तकास व आपल्या साथी-दारांस तात्काळ तेथून घालवून दिलें व आपल्या मागें एक टाळकरी उभा करून 'हरि तुझि मुरली घरवेणी' या मध्वमुनीश्वरांच्या प्रेमळ पदावर कीर्तनास आरंभ केला. अहिल्याबाई येऊन पाहतात तों कीर्तन चाललें आहे. त्यांना कीर्तन श्रवणाची मोठी हौस असे! त्या येऊन कथा ऐकण्यास बसल्या-वर फंदींनीं इतकी कांहीं बहार करून मांडली कीं, क्रोधानें अगदीं संतप्त होऊन आलेल्या अहिल्याबाई देखील अगदीं गार झाल्या. फंदींसारखा रसभरीत वक्ता, अहिल्याबाईसारखा प्रेमळ श्रोता व वेणुसुधेसारखें मनाचें

मनपणच नाहींसें करणारें करुणशृंगार रसपरिपूरित आख्यान! मग काय? दूधशर्करेचाच संयोग तो! या आमच्या पुण्यशील साध्वीनें फंदीस तात्काळ एक भरजरी पोषाख आणि सुवर्णाची कडीं इनाम दिलीं! कीर्तन करण्याचा विचार फंदींच्या मनास आजतागाईत कधीं शिवलाही नव्हता, परंतु अशा दुर्धर प्रसंगांतून पार पाडण्यास जी कला त्यांच्या उपयोगीं पडली तीच कला पुढें फंदींनीं शेवटपर्यंत चालविली! आणि तमाशाचा नाद अजीबात सोडून दिला.

फंदींनीं कीर्तन करण्याचे कामांत फारच उत्तम लौकिक संपादन केला होता व याच अलौकिक गुणावरून त्यांचें नांव आज १०० शंभर वर्षें महाराष्ट्रांत सारखें दुमदुमत आहे. यांना आपल्या हयातींतच आपल्या कीर्तीचे पोवाडे महाराष्ट्रजनतेच्या तोंडून ऐकावयास सांपडले. असा हा अपूर्व सुयोग मोरोपंतादि एकदोन महाराष्ट्रकवींशिवाय इतरांस पहावयास मिळाला नाहीं! होनाजीबाळानें फंदींवर एक पोवाडा केला आहे; तो असा.—

'फंदी अनंत कवनाचा सागर। अजिंक ज्याचा हातखंडा॥ चमत्कार चहूंकडे चालतो। सृष्टीवर ज्याचा झेंडा॥ धृ०॥ मूळ संगमनेर ठिकाण त्याचा। कीर्ति उदय जैसा अर्की। नविन तऱ्हा नारळी डोइला। पदर पागोट्याची फिर्की। वाचावंत संपत्ति सारखी। बहुतांचें तनमन हरकी। लांगे लुंगे कवि भेदरले। अवघ्यांवर त्याची गुर्की। समोर गातां कोणि टिकेना। मनामधिं बसली कर्की। धन ज्याचा हातचा मळ। केवळ तोच रुपयांचा हांडा॥ चम०॥ १॥ फंदी आनंदी छंदी वरदी। ब्राह्मण त्यावर गुरुकृपा। सरस्वती जिव्हाग्रीं अक्षयी। भंग नसे ज्याचा हरपा। कवन बहुत उदरामधिं भरलें फणस जसा मोठा कापा। भाळीं त्रिपुंडी टिळा केशरी। कस्तुरीचा वरती छापा। मोठमोठ्या राज्यांमधीं महशूर। जगजाहीर चारी तर्फा। आकट विकट कवनांच्या चाली। नित्य नव्या अक्षयिं थापा। विद्या अभिमान नाहीं जयाला। असा कंचा धुंडा॥ चम०॥ २॥ नांवाचें चांदणें जगाचे। मुख्य मुख्य खासे खासे। कीर्तनरंगीं झडा घालिती। मानवला सर्वत्रांशिं असे। पुढें मागें ऐसा नसे दुसरा। मृत्युलोकिचा रहिवाशी। पहा रत्न पंधरावें माता। धन्य जन्मली हो त्याशीं। असा पुरुष चिरकाळ असावा।

गुणनिर्गुण पंडितराशी । होनाजिबाळ ह्मणे जगावा । बहुत काळ आयुष्य याशीं । अवीट ज्याची करणी ऐकतां । देहप्राण होतो थंडा । गुरव त्याचे संगें सोबती । कुशल कला जाणे उदंडा । चमत्कार चहूंकडे चालतो । सृष्टीवर ज्याचा झेंडा । फंदी अनंत कवनाचा० ॥ ३ ॥

होनाजी बाळानें उदारबुद्धीनें फंदींचें जें हें वर वर्णन केलें आहे तें अगदीं शब्दशः खरें आहे. फंदींची निस्पृहता वाखाणण्यासारखी होती. हे बुवा एकेदिवशीं बेलबागेंत कीर्तन करीत असतां दुसऱ्या बाजीरावाचे नानाफडणविसांच्या पश्चात् नवीन झालेले कारभारी सदाशिव माणकेश्वर हे तेथें देवदर्शनास आले. हे नवीन कारभारीसाहेब पहिल्यानें हरदास होते, शिवाय हे कविता पण उत्तम करीत असत. त्यांजवर ह्या रावबाजी महाराजांची मर्जी प्रसन्न झाली व त्यांनीं सर्व राजसूत्र त्यांच्या गळयांत बांधिलें. तेणें-करून यांची कवित्वबुद्धि तर लोपलीच पण वरील राजसूत्रही यांस विशेष शोभादायक झालें नाहीं. असो. कारभारीसाहेबांची स्वारी येतांच सर्व श्रोते-मंडळी त्यांस खडीताजीम देण्याकरितां उभी राहिली. त्या गर्दींत हरदास-बोवाही जरा थांबले; आणि या भाऊसाहेबांस नमस्कार करून लोडाकडे हात दाखविला. तेव्हां कांहीं तरी बोललें पाहिजे ह्मणून सदाशिव माणके-श्वर हरदासास ह्मणाले कीं, 'कां हें केव्हांपासून धरिलें.' या निस्पृह हरदासानें उत्तर केलें कीं, 'आपण विणा खालीं ठेविला आणि आह्मीं उचलिला !' किती चोख उत्तर हें ! हें कारभारीसाहेबांचे जिव्हाग्रीं झोंबल्या-शिवाय राहिलें असेल काय ? फंदी खरें बोलण्याच्या कामांत प्रत्यक्ष राजा-चीही भीड ठेवीत नसत. एकेदिवशीं रावबाजींनीं फंदीबोवास आपणावर कविता करण्यास सांगितलें तेव्हां फंदीस ही दोन टोले द्यावयास मिळालेली सुवर्णसंधी त्यांनीं वाया जाऊं दिली नाहीं. त्यांनीं तावडतोब खालील कविता करून ह्मटली.—

ओंव्या.

" वडिलांचे हातचे चाकर । त्यांस न मिळे भाकर । अजागळ ते तूपसाकर । चारूनि व्यर्थ पोशिले ॥ १ ॥ सत्पात्राचा त्रास मनीं । उपजे प्रभूचे मनांतुनी । ज्या पुरुषास न पुसे कोणी । आधीं त्याला भजावें ॥ २ ॥ तट्टू ज्यास न मिळे कधीं । पालखी द्यावी तयास आधीं । मडकें टाकून भांड्यांत रांधी ताट वाट्या भोजना ॥ ३ ॥

द्रव्य देऊन आणिक आणिक । नवे तितुके केले धनिक । जुन्याची तिबूनि कणिक । राज्य आपुलें हरविलें ॥ ४ ॥ जो पायलीची खाईल क्षिप्रा । पालखी द्यावी तया विप्रा । निराक्षर एकाद्या विप्रा । त्याला क्षिप्रा चारावी ॥ ५ ॥ एकेदिवशीं व्हावी खुशाली । स्वारी-पुढें शंभर मशाली । एकेदिवशीं जेशी निशा आली । मशाल एकही नसावी ॥ ६ ॥ मेण्यांत बसावें जाऊनी । कपाटें घ्यावीं लाऊनी । स्वरूप कोणा न दावूनी । जागे किंवा निजले कळेना ॥ ७ ॥ हुताशनीच्या सुंदर गांठ्या । शेर शेर साकरेच्या पेठ्या । विप्रकंठीं जैशा घंट्या । उगाचि कंठ्या घालाव्या ॥ ८ ॥ तशाच राख्या जबरदस्त । संभाळितां जड होती हस्त । दौलत लुटूनि केली फस्त । हस्त चहूंकडे फिरविला ॥ ९ ॥ तुरा शिरीं केवढा तरी । बहुतचि मोठा चक्राकारी । हार गजरे नखरेदारी । सोंगापरी दिसावें ॥ १० ॥ हात हात रेशमी धोतरजोडे । चालतां ओझें चहूंकडे । आंगवस्त्र दाहदां पडे । चरणीं खडे रुतताती । ११ । पोषाग दिधले बाजीरायें । मोच्यांस पैका कोठें आहे । तैसेच अनवाणी चालताहे । शास्त्री अथवा अशास्त्री ॥ १२ ॥ घडींत व्हावें क्रोधयुक्त । घडींत व्हावें आनंदभरित । घडींत व्हावें कृपण बहुत । घडींत उदार कर्णापरी ॥ १३ ॥ घडींत व्हावी सौम्य मुद्रा । घडींत यावा कोप रुद्रा । घडींत घ्यावी क्षणैक निद्रा । स्वेच्छाचारी प्रभू हा ॥ १४ ॥ "

याहून निस्पृहीपणाचें दुसरें उदाहरण देणें कठीण आहे ! प्रसिद्ध रामशास्त्री प्रभुणे यांनीही एकदां नारायणरावांच्या वधप्रसंगीं रघुनाथरावांना कसें चोख उत्तर दिलें होतें तें निदान महाराष्ट्रीयांना तरी सांगावयास नको आहे ! तरी पण प्रभुण्यांच्या उत्तरापेक्षां आम्हांला फंदीच्या वरील उत्तराची विशेष किंमत वाटते; कारण दादासाहेब कांहीं तरी विचारी होते व शिवाय ते त्यावेळीं मसलतीवरही नव्हते; आणि रायबाजी तर पेशवाईचे पदावर आरूढ झालेले असून शिवाय ते पूर्ण अविचारी होते. असो.

हें कवन बाजीरावसाहेबांस म्हणून दाखविण्याचे पूर्वीच फंदींनीं आपलें बिऱ्हाड राजवाड्यातून काढून पुण्याबाहेर माबुड्यांस नेलें होतें ! तें ऐकून रावबाजींची मर्जी रुष्ट झाली हें सांगावयास नकोच ! बरोबरच आहे, कारण

कडु कारळ्याच्या शेतांत, लबाडाचे हेतूंत व कलावंतिणींच्या वचनांत काय जीव ? कातड्याचा रुपाया चडोमरीला लावून बाजारांत गेलें तर त्यापासून काय फलप्राप्ति होणार ? लांकडाच्या तरवारीवर विश्वासून व ती कमरेला लटकावून युद्धाला जाणारा वीर युद्धांत काय दिवे लावणार ? त्याचप्रमाणें लहरी राजाच्या मर्जीवर विश्वास ठेवणाऱ्या मूर्खाला जरी कांहीं प्रसंगोपात लाभ झाला तरी अखेर तो शिरच्छेदासारखा महालाभ थोडाच गमावणार ! असो. पुढें मग फंदी दोनतीन महिनेंपर्यंत वाड्यांतच गेले नाहींत. कांहीं दिवसांनीं मग श्रीमंतांनींच त्यांना वाड्यांत बोलावून नेलें. फंदी आल्यावर, त्यांनीं 'प्रभु बाजिराव उदार भोळे सांब जसे । ज्याचें दैव उघडेल त्याला मनस्वी पैका देत असे' असें रायबाजीवर एक नवीन कवन करून ह्मणून दाखविलें. मग काय ! प्रभूंची मर्जी लागलीच खुष झाली व त्यांनीं 'नाशीक' शहर फंदींना जहागीर देण्याचें योजिलें परंतु त्यानीं या अशाश्वत महाराजांचें देणें मुळींच नाकारिलें, कारण त्यांस एवढें पूर्वपणीं माहीत होतें कीं, ही लहरींत मिळालेली देणगी पुढें लहरींतच जाणार ! यानीं चिरकाल चालेल अशी कोणतीच देणगी मिळविली नाहीं. पुढें 'सवाईफंदींनीं' ह्मणजे यांच्या मुलांनीं मात्र गाईकवाडींत पांचशें रुपयाचें वर्षासन मिळविलें. तें अद्यापपर्यंत याचे वंशजाकडे चालत आहे. फंदीचे वंशज बडोद्यास गेले ह्मणजे शहरांत येण्याकरितां सरकारची गाडी, छत्री व मशाल पाठवून आणविण्याची चाल अद्यापपर्यंत चालू आहेच.

फंदींना काव्य करतांना डोकें खाजवून विचार करण्याची पाळी कधींच येत नसे ते उत्तमप्रकारचे शीघ्रकवी होते. खालील गोष्टीवरून त्यांचें शीघ्रकवित्व कसलें दांडगें होतें याचा वाचकाना कांहीं तरी अनुभव येईल. श्रीमच्छंकराचार्यांची स्वारी एकेवेळीं संगमनेरी असतां कांहीं कुटिल ग्रामस्थानीं स्वामी शंकराचार्यांस विनंति केली कीं, 'अनंतफंदी हे ब्राह्मण असून स्नानसंध्या मुळींच करीत नाहींत, आणि तमाशा मात्र नेहमीं करीत असतात. हें कळतांच स्वामींनीं फंदीस बोलावणें पाठविलें. बोलावणें येतांच फंदी स्त्रीवेषधारी नर्तकासह सर्व सरंजाम घेऊन तेथें गेले. तो थाट पाहिल्याबरोबर स्वामींनीं 'तुमची जात कोण ?' असा प्रश्न केला. 'ब्राह्मण' ह्मणून फंदींनीं उत्तर दिलें. हें ऐकताच संध्या ह्मणून दाखविण्याविषयीं स्वामींनीं आज्ञा केली. फंदींनीं ही मागें पुढें न पाहतां डफावर थाप मारिली, आणि संध्येंतील पहिल्या चोवीस नामाची लावणी करून ह्मणून दाखविली ! ती अशी.—

"केशवकरणी अघटित लीला नारायण तो कमा। जयाचा सकल जनावर उमा ॥ माधवमहिमा अगाध गोडी गोविंदाचे रसा। पीतजा देह होइल थंडसा ॥ विष्णु स्मरतां विकल्प जाती मधुसुदनानें कसा। काढिला मंथन समयीं जसा ॥ वेष धरुनि कापट्य मोहिनी भाग करी निमनिम। गाइल्या उद्धरती आधम ॥ अनंत भगवंताचीं नांवें त्यांतुनि हीं उत्तम ॥ गाइल्या० ॥ १ ॥ त्रिविक्रमानें त्रिताप हरिले भक्तांचे सर्वही। वामनें दान घेतली मही ॥ श्रीधरसत्ता असंख्य हरती दुष्टांचे गर्वही। वंदिल्या ऋषिकेशाच्या रही ॥ पद्म-नाभ धरियेले तेथुनि देव झाले ब्रह्मही। दामोदरें चोरिलें दहीं ॥ गाती मुनिजन नारद तुंबर वसिष्ठादि गौतम ॥ गाइल्या० ॥ २ ॥ संकर्षण स्मरतांना षड्रिपु नाशातें पावती। स्मरारे वासुदेवाप्रती ॥ प्रद्युम्नाचा करितां धांवा गजेंद्रमोक्षा गती। अनिरुद्ध न वर्णवे स्तुति ॥ क्षीरसागरिंचें निधान पुरुषोत्तम हा लक्ष्मीपती। स्मरारे अधोक्षजातें प्रती ॥ अपार पापें स्मरतां जाती वाचें पुरुषोत्तम ॥ गाइल्या उद्ध०॥ ३ ॥ प्रल्हादाचे साठीं नरहरि स्तंभीं जो प्रकटला। अच्युतें काल-नाथ मर्दिला ॥ जनार्दनाची अघटित लीला कीर्तनिं ऐकूं चला। उपेंद्रा शरण जाइ तो भला ॥ हरिहर स्मरतां त्रिवार वाचा दोष सर्व हरियला। गोकुळीं कृष्णनाथ देखिला ॥ रामलक्ष्मण ह्मणे तयाच्या नामें गेला भवभ्रम ॥ गाइल्या उद्धरती आधम ॥ अनंत भगवंताचीं नामें त्यांतुनि हीं उत्तम ॥ गायिल्या० ॥ ४ ॥

ही लावणी ऐकून स्वामींची मर्जी सुप्रसन्न झाली हें काय सांगावयाला पाहिजे! स्वामींनीं त्यांना बहिष्कृत न करतां सोडून तर दिलेंच पण वरतीं आणखी चांगला आशीर्वाद ही दिला! याच्याहीपेक्षां बिकट प्रसं-गांत फंदींना त्यांच्या अनुपम कवित्वशक्तीनें तारिलें आहे. एकदा हे कवि आपल्या तमासगीर मंडळीसह माळव्यांतून घराकडे येत असता त्यास सात-पुडा पर्वताचे मध्यभागीं भिल्लांनीं गाठिलें व त्यांच्या भोंवती गर्दी करून त्याचा सर्व आजबाब लुटला! फंदींनीं तो आणीबाणीचा प्रसंग लक्षांत आणून त्या भिल्लांवर व त्यांचे नायकावर एक लावणी केली व ती त्यांस ह्मणून दाखविली. तें कवन ऐकून ती सर्व भिल्लमंडळी संतुष्ट झाली व त्यांनीं फंदींनें

नवें घेतलेलें द्रव्य त्यांस परत करून आणखी शिवाय एक पोषाख आणि दोनशें रुपये वर दिले. बरोबर पांच भिल्ल देऊन त्यांस संगमनेरचे वेशी-पर्यंत पोंचतें केलें. भिल्ल–रामोशी यांची गांठ रानांत पडल्यावर नुसता तोंडांतून शब्द निघण्याची मारामार मग त्यांच्याचपासून उलट पारितोषिक मिळविणें तर लांबच राहिलें! पण हें फंदींचें धारिष्ट पहा काय विलक्षण तें! असले चतुरस्त्र, प्रसंगावधानी व समयसूचक पुरुष सध्यां कितीक सांपडतील बरें!

यांच्या कुटुंबाचें नांव म्हाळसाबाई; यांस दोन पुत्र होते. एक श्रीपत-फंदी व दुसरे बापूफंदी. जेष्ट चिरंजिवास लोक 'सवाई फंदी' म्हणत असत. बापूफंदी हे पूर्ववयांतच निवर्तले. सवाईफंदीही आपल्या बापा-सारखीच चांगली कविता करीत असत. यांच्या कवितेचे शेवटीं 'फंदी मूळ' असें नांव असतें. यांची कविता फारशी उपलब्ध नाहीं तरी पण यांच्या नांवचा एक पोंवाडा आह्मांस सांपडला आहे. त्यावरून वाचकांस यांच्या कवितेची बरीच ओळख पटेल असें वाटतें. ती कविता अशी.—

"उध्या केशरी टिळा कस्तुरी कमालखानी हार गजरे । गहे-नाजी बहेनाजी अक्षइ जवळ पालखिच्या हुजरे ॥ जुनीं माणसें तीं कणसाला महाग गैर त्याची बुज रे । चार चटारी भटारि हलके जाणुनि घे अलबत मुजरे ॥ सुंदर स्त्री दुसऱ्याची तिसरा दे बैल गुतून अवता । शाल्योदन मिष्टान्न भोगता सवाशेर ज्याचा सवता ॥ चोविस वर्षें चैन भोगिली राज्यक्रांति जाणून नवता ॥ ध्रु० ॥ उध्या० ॥ १ ॥ जो नीचकर्मी लड्शी गुर्मी कुटुंब दाखल नजराणा । प्रभु फार संतोष न किमपी दोष निजा इजजवळ जाणा । असे अवश्य घडवी अडवी तिडवी चार प्रहर दाम घा ताणा ॥ दौल-तीस बाजीराय करिल अपाय म्हणत होते नाना । खेळ करुनि उफराटा वरंटा पाटा रयतेच्या भवता ॥ शाल्यो० ॥ ध्रु० ॥ कुल-कल्ला त्रिंबकजी इंगुळ अगदिं राहिलें दिडखोट । पंढरपुरीं महाद्वारीं शास्त्री ठार केले कर्मच खोटं ॥ चौकुन मग इचकोबा हाय सुकुन गेले मोठ । आल येतांच चंडाळ गडावर पदरीं काय पडला धोट ॥ सर्वांची रग जिरली म्हणुनि ताळे भरली आला दीप मालवता । फंदी मूळ म्हणे असति विरस! कां गादि पुण्याची घालवता ॥ शाल्यो ॥३॥"

वरील पोंवाड्यावरून सवाई फंदीही आपल्या वडिलांप्रमाणेंच अत्यंत निस्पृही होते हें स्पष्ट दिसतें. यांचे वंशज अद्याप संगमनेरीं असून तेही आपल्या पूर्वजांप्रमाणेंच निस्पृह व बाणेदार आहेत। असो. अनंतफंदींचा अंत शके १७४१ त ह्मणजे इ. स. १८१९ त झाला. यावरून असें दिसतें कीं पेशवाईचे ऐन बहारीचे वेळीं यांचा जन्म होऊन तिची अखेरी होण्यापूर्वीच यांनीं आपली अखेरी साधून घेतली. मरणकाळीं यांचें वय पाउणशें वर्षांचें होतें. यांनी ग्रंथ असा एकच केला. त्याचें नांव 'श्रीमाधवग्रंथ' सदरहु ग्रंथ ओवीबद्ध असून फारच सुंदर आहे. यांत 'श्रीमंत माधवराव नारायण-भट पंडित पंतप्रधान यांनीं शके १७१७ ह्मणजे इ. स. १७९५ त अश्विन शुद्ध द्वादशीस गणपति रंगमहालावरून कारंज्यावर उडी टाकिली व पैंगि-मेस निवर्तले' या गोष्टीपासून रावबाजी गादीवर बसेपर्यंत निरनिराळ्या मुत्सद्यांच्या मसलतीमुळें ज्या उलाढाली व घडामोडी झाल्या त्यांचें थोड-क्यांत पण सुरस रीतीनें वर्णन केलें आहे. यांतील एक उतारा शेवटीं दिलाच आहे त्यावरून या ग्रंथाची किती किंमत आहे हें लक्षांत येईल. यांची स्फुटकविता बरीच आहे. यांनी कटाव, फटके आणि लावण्या फार केल्या आहेत. क्वचित् श्लोक, आर्या, पदेंही कथेंत ह्मणण्यासाठीं केलीं त्यांपैकीं अद्याप बरीच अमुद्रित आहेत. कांहीं लावण्या व वर नमूद केलेला 'श्रीमाधव ग्रंथ' एवढेंच काय तें यांचें काव्य मुद्रित होऊन निघालें आहे. या माधवग्रंथांतील ओंव्या ज्ञानेश्वरीच्या ओंव्यांच्या पद्धतीवर आहेत. एकं-दरीत पाहतां यांची कविता सरळ, सुबोध व मनाला रमविणारी असून मनांत तात्काळ ठसणारी आहे. यांच्या कवितेचें स्वरूप एका कवीनें ह्मटल्याप्रमाणें 'गुर्जरी स्त्रियांच्या उरोजांप्रमाणें अगदीं झांकलेलें नाहीं किंवा महाराष्ट्र-स्त्रियांच्या उरोजांप्रमाणें अर्धवट झांकलेलेंही नाहीं तर तें मल्याळी स्त्रियांच्या उरोजांप्रमाणें अगदी खुलें आहे. मराठी कविता यमकानुप्रासांच्या शृंखलांनीं अगदीं जखडलेली आहे असें ह्मणणारांनीं एकवार तरी इच्याकडे दृष्टि फिरवावी अशी त्यास या लेखकाची लीन विज्ञप्ति आहे! परंतु त्यांना हें शुद्ध-स्वरूप कितपत पसंत पडेल हें हा लेखक जाणून आहे. कारण कावीळ झालेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें सर्वच पिंवळें दिसतें त्याचप्रमाणें पक्षपाताचा चष्मा डोळ्यावर घालून मिरविणारांना या कविता देवीच्या स्वरुपांत ही कांहीं तरी दोष दिसणारच! त्याला आमचाच काय पण कोणाचाच उपाय नाहीं! आतां कोणी फंदीवर असें दोषारोपण करितात कीं ईश्वरानें 'फंदी-

जवळ उत्तम बुद्धिरूप तांदूळ दिले होते त्यांचा त्यांनीं एकदम लावणीरूप भात करून टाकिला. तात्पर्य त्यांच्या ह्मणण्याचा भावार्थ असा कीं, फंदींनीं आपल्या कवितेला फटका मारून लावणीच्या रंगणावर धरिलें नसतें तर बरें झालें असतें! या आक्षेपाला आह्मीं विशेष पाल्हाळाचें उत्तर न देतां एक श्लोकच येथें देतों ह्मणजे झालें:—

'अगारे कांतारे कुचकलशहारे मृगदृशां ।
मणेस्तुल्यं मूल्यं सहजसुभगस्य द्युतिमतः ॥ १ ॥

कालिदास.

जें रत्न आहे तें घरीं असलें, रानांत पडलें असलें किंवा तरुणीच्या स्तनहारांत गुंफलेलें असलें, तरी त्याची योग्यता सारखीच; कां कीं तें स्वभावतःच तेजस्वी व सुंदर असतें!'

---

## फंदींचे काव्यांतील उतारे.

### उपदेशपर फटका.

लंडे गुंडे हिरसे तट्टू ह्यांची संगत धरूं नको। नरदेहासी येऊन प्राण्या दुष्ट वासना धरूं नको ॥ धृ० ॥ भंगी चंगी बदकी सटकी ह्यांच्या मेळ्यांत बसूं नको। बिकट वाट वहिवाट नसावी धोपटमार्गा सोडुं नको। संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको। चल सालसपण धरूनि निखालस बोला खोट्या बोलुं नको। परधन परनारी ह्यांस पाहुनी चित्त भ्रष्टुं हें देऊं नको। अंगिं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको। नास्तिकपणांत शिरूनि जनाचा बोल आपणा घेऊं नको। भली भलाई कर कांहीं पण अधर्ममार्गी शिरूं नको ॥ चाल ॥ मायबापावर रुसूं नको। दूर एकला बसूं नको। व्यवहारामधीं फसूं नको ॥ चा० प० ॥ परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करूं नको ॥ १ ॥ लंडे गुंडे० ॥ वर्म काढुनी शरमायाला उणें कुणाला बोलुं नको। बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करून हेवा झटूं नको। मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहुं नको। एकाहुन एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको।

हिमायतीच्या बळें गरिबगुरिबांला तूं गुरकावुं नको। बहुत कर्ज-बाजारी होउनि बोज आपुला दवडुं नको। स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन कोणा होऊं नको॥ चाल॥ विडा पैजेचा उचलुं नको। उणी तराजू तोलुं नको। गहाण कुणाचें डुलवुं नको। असल्यावर भिक मागुं नको॥ चा० प०॥ नसल्यावर सांगणें कशाला गांव तुझा भिड धरूं नको॥ २॥ छंदे गुंडे०॥ उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको। बरी खुशामत शहाण्याची ही मूर्खाची ती मैत्रि नको। कष्टाची बरी भाजीभाकरी तूपसाकरेची चोरी नको। दिली स्थिति देवानें तींतच मानी सुख कधिं विटूं नको। असल्या गांठीं धनसंचय कर सत्कार्यीं व्यय हटूं नको। आतां तुज ही गोष्ट सांगतों सत्कर्मा ओसरूं नको। सत्कीर्ती नौबदीचा डंका गाजे मग झंकाच नको॥ चाल॥ सुविचारा कातरूं नको। सत्संगत अंतरूं नको॥ चा० प०॥ गावयास अनंतफंदीचे फटके मागें सरूं नको॥ ३॥ छंदे गुंडे०॥

या एकाच फटक्यांत कितितरी सुरस बोध भरला आहे व तो पुनः किती स्पष्ट आहे! या फटक्यांतील उपदेशाच्या विरुद्ध वागणारांचे काय काय धिंडवडे होतात ते जगांत अमळ डोळे उघडे ठेवून वावरणारांचे लक्षांत आल्यावाचून राहणार नाहींत. "व्यक्तीव्यक्तीमध्यें हिताहिताचें रणकंदन चाललेलें असतें, ज्या प्राप्तिसमुद्राचें मंथन चाललें असतां सुख आणि विशेषेंकरून दुःखाच्या लाटा उसळलेल्या दिसतात, ज्या नभोमंडळीं धन-तारा प्राधान्येंकरून चमकत असतो व स्वार्थ उपग्रह त्याभोंवतीं भ्रमण करीत असतो, ज्या राज्यांत नीतिदेवतेचा दिवसाढवळ्या खून झालेला दिसतो व अनीति देवतेचा गौरव आणि व्याजस्तुति हे केविलवाणे देखावे जेथें सज्जनांस पाहण्याचा प्रसंग येतो, तें राज्य, तें नभोमंडल, तो प्राप्तिसमुद्र व तें रण-कंदन म्हणजे व्यवहार होय." व असा हा व्यवहार कोणाचे लांजांत न राहतां चोखरीतीनें कसा करावा याचें उत्कृष्ट विवेचन फंदींनीं वरील फटक्यांत फारच उत्तम केलें आहे!

हा खालील उतारा श्रीमाधवग्रंथाच्या सहाव्या अध्यायांतील आहे. यांत दुसरे बाजीरावाचेवेळीं यशवंतराव होळकरानें पुण्यावर स्वारी करून

पेंढाऱ्यांचें सहाय्यानें महाराष्ट्रदेशांत जी धुळधाण उडवून दिली तिचें यथातथ्य वर्णन केलेलें आहे:—

ओंव्या.

"एक मस्तकीं एक तळीं। चापकानीं झळाळी। उष्ण वरती तळतळी। हस्त सकळीं मारावया ॥ १ ॥ कर्ण घ्राणीं दारू भरिती। वरूनि बत्ती लाविती। तिळमात्र दया नुपजे चित्तीं। शिवाय कुरघोड्या वेगळ्या ॥२॥ शेंदोनशांस करावें ओणवें। उडूनि त्यांवरी बैसावें। राख मीर्ची घालूनि द्यावे। तोबरे मुखीं घोड्यांच्या ॥ ३ ॥ अशक्ताची करावी घोडी। वर बसवावा जगजेगडी। स्वस्थपणें ओढीत गुरगुडी। तोंड झोडी चापकानें ॥ ४ ॥ चराठांची सरासरी। त्याची करावी गळसरी। मग तो डोळे वटारी। प्राण जाऊं पाहतो ॥ ५ ॥ खटमार ह्मणजे जगविख्यात। वरकड मार त्याचे आश्रित। ही टूम ईश्वरें अनुश्रूत। कोठूनि काढिली कळेना ॥ ६ ॥ इंद्रियातें बांधोनि दोरी। उचलूनि त्याचे तराजू करी। एक येतां जातां मारी। कोठवरी सोसाव्या यातना ॥ ७ ॥ कांकडे घेऊनियां आपुले हातीं। समग्र दाढीमिशा जाळिती। एक मोचासुद्धां हाणिती। मुखावरी ब्राह्मणाच्या ॥ ८ ॥ मुखावाटे वाहे रुधिर। तों पुन्हां मारिती वारंवार। आरडताती जैचे ढोर। हे उपचार शरीराचे ॥ ९ ॥ पायांस बांधावीं चऱ्हाटें। झाडांशीं टांगिती उफराटें। मग ते ब्राह्मण अथवा मराठे। कोण तेथें निवाडितो ॥ १० ॥ पींकपाणी यावें रंगा। ह्मणजे चारावें तुरंगा। रयत गेली भवभंगा। केवढा दंगा ओढवला ॥११॥ घरदार लुटावें सर्वपरी। घरधनीच धरावा बिगारी। बायकामुलें लहानथोरी। बिगार अवघ्यांनीं पोंचवावी ॥ १२ ॥ ओलें काष्ट जैसें पिरगाळावें। तैसें मनुष्य धरूनी मुरगाळावें। गळ्यांत बांधोनीया दावें। ओढावें जैसें मेंढरूं ॥ १३ ॥ एक नाशीक पिरगाळिती। एक उगेंच गालोरे घेती। एक उडूनिया बैसती। घोड्यापरी माणसावरी ॥ १४ ॥ एक ह्मणती आमुचा घोडा। मोडू याचिया माकडहाडा। लुटोनि आणिला ज्याचा वाडा। त्याच्या अपेष्टा ह्या केल्या ॥ १५ ॥ ऐशीं अर्भकें उत्पन्न झालीं। त्यांनींच ही पृथ्वी लुटिली।

दीनवदनें मनुष्यें केलीं । घरोघर भिकारी जाहले ॥१६॥ रकटें ज्यांनीं पांघरावें । एकदांच त्यांचीं उपटलीं दैवें । शालजोडींत पर्ण बांधावें । मोट जैशी चावळ्याची ॥१७॥ कोळदांडे घालुनिया एकसरी । झाडासि टांगताती हारोहारी । जळतकाष्ठें घालिती शिरीं । मांस तोडिती सांडसानें ॥१८॥ दुधाडी ठेवावी वक्षःस्थळीं । एक उगाच बोटें मुरगाळी । एक नाकपुडी पिरगाळी । एक निपसितो दाढीमिशा ॥१९॥ एकदांची धंरूनिया शेंदोनशें । बळदांत कोंडावीं माणसें । पुनः त्यांचें स्मरणही नसे । जिवंतपणें किंवा मेले ॥ २० ॥ असो पुरुषांची जेव्हां ऐसी दशा । मग ठेविल्या असतील स्त्रिया कैशा । मनास ज्याच्या आवडेल जैशा । त्यानें तैशा भोगाव्या ॥२१॥ चांगल्या अथवा ओंगळी । ज्यास जी मिळे क्षुधाकाळीं । तोच तिला कवटाळी । भ्रताराचे सन्मुख ॥ २२ ॥ तो अविचार सांगतां यथायुक्त । दोष घडेल आणि वाढेल ग्रंथ ॥ हे अविचाराचे पर्वत । कोठवरी सांगावे ॥ २३ ॥ असो श्रीमाधव जातां देव भेटी । बंडें भ्रष्ट केली बहुधा सृष्टि ॥ पुढें दुष्काळही त्याचेच पोटीं । बंडानिमित्त जाहला ॥ २४ ॥ अन्न न मिळे मनुष्यातें । कोट्यावधी पडलीं प्रेतें ॥ जननी आपुलिया बाळकातें । हिरवेंच लागे भक्षावया ॥ २५ ॥ वृक्षास न राहे एकपर्ण । मग अपक्व राहतील कोठून ॥ सोलतरोठे बरबडे भक्षुन । तरी वांचले नाहींत ॥ २६ ॥ वृषभ धेनु सूकर श्वानें । गज मंडुकें गणपती-वाहनें ॥ सर्वही भक्षिले भिकाऱ्यानें । शेवटीं प्राण गेले हो ॥ २७ ॥ असंख्यात पर्वताचे पर्वत । विदोबिदीं शिरें लोळत । काक घारी श्येनें बहूत । प्रेतालागीं तुडवीती ॥ २८ ॥ असें जें भक्षुं नये तें भक्षिलें । शेवटीं ईश्वरें उपेक्षिलें । त्यांतून चवथाई रक्षिले । तीन हिस्से गतप्राण ॥ २९ ॥ हातानें तोलावें सुवर्ण । धान्य मोजावें ताजव्यानें । अच्छेर दीडपाव दाणे । रुपयास देहीं न मिळे ॥३०॥ अन्नावांचुन चालले प्राण । लोक जाहले ते निर्धन । मायांच्या गळां मिठी घालून । मुलेंबाळें आक्रंदती ॥ ३१ ॥ अन्नाकारितां प्राण गेले । अधम कैचे रस्त्यांत मेले । तेथें भिकारी अवतरले । त्या प्रेताला

भक्षावया ॥ ३२ ॥ जैसे दाणे काढिती कणसाचे । मग काय प्रयोजन बिटोरियांचें । तैसें मांस रक्त भक्षावें त्यांचें । सांपळे हाडाचे लोळती ॥ ३३ ॥ तें मांस ज्यानें भक्षिलें । सर्वेचि त्यांचे प्राण गेले । असो ऐसे लक्षानुलक्ष मेले गणीत कोणा न करवे ॥ ३४ ॥ कोणी गृहस्थ ठेवावा चाकरी । तो आधीं चोरून भक्षितो भाकरी । इतकी धान्याची अखेरी । कधीं पाहिली न ऐकिली ॥ ३५ ॥ स्त्री पाहतसे भ्रताराचें मढें । तिच्याही न पाहवे पोटाकडे । तान्हें लेकरूंही न घेववे कडे । त्याचीही आस्था सोडिली ॥ ३६ ॥ कोण प्रेताला ओढितो । येथें अवघ्यांचा प्राण जातो । कोण कोणाचा समाचार घेतो । यांत वांचतो कोणता ॥ ३७ ॥ सरी सर्वत्रालागीं जाणा । एकसारख्याचि वेदना । धनाढ्यातें न मिळे दाणा । मग निर्धन कैसा ॥ ३८ ॥ प्रताप असतो यत्किंचित । परंतु कवीचा लाघव बहुत । तैसा येथें अनर्थ अत्यद्भुत । कवीनें यत्किंचित वर्णिलें ॥ ३९ ॥ महा अभिमानी देखण्या नारी । त्या घरोघर लागल्या दाण्यावारी । घरधनी वरूनि काठ्या मारी । मग अभिमान कोठें राहिला ॥ ४० ॥ बंड आणि महर्गतेचा संयोग । या उभयताचा घडतां योग । प्रळय झाला यथासांग । रुसावयाला जागा न ठेविली ॥ ४१ ॥ स्वामीचा जो घात योजिती । शेवट त्याच्या ऐशा गती । सत्क्रियेशीं न जागती । ते अधोगती मरताती ॥ ४२ ॥ "

वरील उताऱ्यांत पेंढाऱ्यांनीं माय देशांत जी धामधूम व दाणादाण उडवून दिली, लोकांची जी त्रेधा व तिरपिट केली, जीवित व वित्त यांचा जो धुव्वा उडविला व सर्वत्र धांगडधिंगा घालून जी पुंडाई माजविली या सर्वांचें वर्णन हुबेहुब व फारच हृदयंगम काढिलें आहे. या वर्णनांत कदाचित् कवीचें लाघव व थोडीशी अतिशयोक्ति असण्याचा संभव आहे परंतु असल्यास फारशी नाहीं व रसापकर्षक तर कोठेंच नाहीं. या फंदींनीं केलेल्या वर्णनांत सत्यापलाप फारसा नसावा, किंबहुना मुळींच नसावा असें रामजोशाचे लावणीवरून वाटतें. त्या लावणीचाही थोडासा भाग आम्हीं पुढें जोशीबुवांचें चरित्रांत दिलेला आहे. तो भाग आणि हा भाग ताडून पाहिला असतां वाचकांची अंशतः तरी खात्री होईल. त्याचप्रमाणें पेंढा-

त्यांनीं केलेल्या दुष्कृत्यांविषयीं इतिहासकारांनीं केलेलें वर्णन व वरील वर्णन यांतही फारसें अंतर नाहीं या ओंव्या वाचतांना अंगावर शहारे येतात व हृदय अगदीं भरून येतें. आतां येथेंच असा हा राक्षसी प्रकार झाला होता असें मात्र कोणीं समजूं नये. प्रलयकालाचीं व क्रांतीचीं हीं चिन्हेंच असतात. फ्रान्स देशांत गेल्या शतकांत जी मोठी राज्यक्रांति झाली किंवा गेल्या एक दोन वर्षांत रशिया देशांत राजसत्ताक मंडळींनीं जो प्रलय करून सोडला व प्रजेच्या ज्या हालअपेष्टा केल्या त्यांचा इतिहास ज्यांनीं वाचला असेल त्यांस वर वर्णिलेलीं पेंढाऱ्यांचीं कर्में फारशीं अचाट होतीं असें वाटणार नाहीं. सध्यां आर्यावर्तांतही बंगाल्याकडे याच मासल्याच्या कांहीं गोष्टी चालल्या आहेत; त्या जरी अगदीं अशा नाहींत तरी पण यांतल्याच !

आतां फंदींच्या काव्यांतील एक विनोदपर चुटका देऊन आपण फंदींचा निरोप घेऊं.

॥ लावणी ॥

पति तर केवळ शुद्ध दांडगे घागरगडचे हंस जसे । पाणी वाहतां खटीं पडल्या खांदीं कावड डुलतसे ॥ धृ० ॥ चवला पुरती करी मजूरीं कंबर बांधुनि हजीर असे । अक्षरशत्रू ' ओ ना मा सी ' हें तों ठाऊक स्वामि नसे ॥ तंबाखूचा मोठा चाळा नाहिं मुखावर तेज-कळा । दोटक्यांनीं भले दांडगे पाझर येईना खडकाला ॥ परि निव्वळ फत्तर । पति तर केवळ० ॥ १ ॥ तूं तर केवळ देवाघरची सुखरणिमध्यें श्रेष्टपणीं । नाजुक साजुक कळी प्रफुल्लित पातळ पुतळी ठेंगणी ॥ राजस गोंडा स्वहस्त कमळीं गौर वर्ण तनु देखणी । विशाळ डोळे बुबुळ फुलकुलित नाहिं कुठें तिळतुल्य उणीं ॥ शांत प्रकृती हास्यमुखी सुंदराकृती हो सदा सुखी । रंभा पाहुनि लज्जित होउनि तव गुणश्रवणीं पडति गळा ॥ पति तर केवळ० ॥ २ ॥

वरील लावणींत फंदींनीं जगांत हरहमेष दिसून येणाऱ्या पतिपत्नीमधील वैपरित्याचें फारच सुबक वर्णन केलें आहे. पति गुणी तर पत्नी दुर्गुणी, पत्नी सुंदर तर पति कुरुप, पति शिक्षित तर पत्नी अशिक्षित असाच विजोडाचा फार्स जगांत बहुतेक दिसून येतो. सारखा जोडा पहावयास मिळणें दुर्लभ आहे !

# कविराय रामजोशी.

मदोन्मत्त होऊन अनावर झालेला हत्ति अंकुशानें ताळ्यावर येतो; माजलेल्या घोड्याला ताळ्यावर आणण्याकरितां चाबकाचा उपयोग करावा लागतो; ताब्याबाहेर गेलेले वृषराज वेसणीनें वठणीवर येतात; ओढाळ गाईला कह्यांत आणण्याकरितां तिच्या गळ्यांत लोढणें बांधावें लागतें; मूर्खाला कुमार्गापासून परावृत्त करून सन्मार्गाला लावणें असल्यास त्याला चौदावें रत्न दाखवावें लागतें; बहकलेल्या समंजस मनुष्यास शुद्धीवर आणण्याचें काम वाक्प्रहार करतो व असें केल्याशिवाय वरील मंडळी सरळ मार्गाला लागत नाहीं. वृक्ष खच्ची केला ह्मणजे तो फोफावतो, त्याला सुंदर फळें लट्कतात, त्याच्या पारंब्या भूमींत जाऊन त्यापुढें त्याला आधार देतात व अशाप्रकारें तयार झालेल्या त्या वृक्षाची शीतळ छाया सूर्यतापानें त्रस्त झालेल्या अतीथ अभ्यागतांना शांतिसुख देते; परंतु नुसत्या खच्ची करण्यानें हें काम भागत नाहीं तर त्यास जमीन, हवा, पाणी, सूर्यप्रकाश इत्यादि साहित्यांचीही अपेक्षा व आवश्यकता असते. त्याप्रमाणें मनुष्यालाही जगापुढें येऊन नांवलौकीक मिळविण्यास कांहीं साहित्य लागत असतें. त्याला सामान्यतः कालदेशवर्तमानाचें साह्य ह्मणतात. वृक्षांच्या लावणीचा, त्यांला पाणी घालण्याचा, खच्ची करण्याचा व खत घालण्याचा काल ठरलेला असतो तसा मनुष्याचा नसतो; कारण वृक्षाच्या मोठेपणाची मर्यादा जशी ठराविक असते तशी माणसाची नसते. मनुष्याचा मोठेपणा वृक्षाप्रमाणें त्याच्या उंचीवरून किंवा जाडीवरून मोजावयाचा नसून तो त्याच्या कीर्तीवरून, चालचलणुकीवरून व मनावरून मोजावा लागतो. वाल्मीक, कालिदास, शिवाजीमहाराज, रामदास असे कितीएक सत्पुरुष आपापल्यापरी लहानाचे मोठे होऊन व आपल्यामागें आपला कीर्तिध्वज अखंड फडकत ठेऊन गेले आहेत पण त्यांच्या मोठेपणाचे साहित्यांत किती तरी फरक आहे! कशास कांहीं मेळ ह्मणून नाहीं. तरी 'काळाची अनुकूलता' ह्या सदराखालीं त्या सगळ्यांचा समावेश होतो. हा काळ सांगून येत नाहीं. आणून येत नाहीं. तो आपोआप व सहजासहजीं येतो आणि मनुष्याच्या उन्नतीस साधनीभूत होतो. त्या मासल्याची थोडीसी चमत्कृति जोशीबुवाच्या चरित्रांत आहे.

ह्या कविरायाची जन्मभूमी सोलापूर येथें आहे. तेथें पुतळे जोशी व भोंडजोशी या नांवाचे दोघे बंधु रहात असत. ते यजुः शाखी देशस्थब्राह्मण.

यांस सोलापूरची जोशीपणाचीवृत्ति मुसलमानी राजापासून मिळाली होती त्यावेळचे मुसलमान या धोंडजोशास विनोदानें 'फत्तरजोशी' असें ह्मणत असत. असो. ही वृत्ति अद्यापपर्यंत त्यांच्या वंशजाकडे चालू आहे हेच रामजोशी यांचे मूळपुरुष जोशीबुवांचा जन्म शके ११८४ त ह्मणजे इ. स. १७६२ या वर्षी झाला. यांच्या वडलांचें नांव जगन्नाथ जोशी असें होतें. जगन्नाथजोशी यांस दोन पुत्र होते. ज्येष्ठ चिरंजिवांचें नांव मुद्गलजोशी व कनिष्ठ हे वरील रामजोशी. यांचे घराण्यांत संस्कृतभाषेची अभिरुचि सर्वांसच होती. त्यांतून मुद्गलजोशी यांची संस्कृतभाषेच्या ज्ञानाविषयीं अतोनात ख्याति होती. त्यांनीं 'यदुवंश' नामक महाकाव्य संस्कृतभाषेंत रचिलें आहे. कालिदासाच्या 'रघुवंशा' प्रमाणेंच याचेही एकोणवीस सर्ग असून ते आम्रमंजरीप्रमाणें रसानें थबथबलेले आहेत; परंतु हें काव्य अद्याप कोणी छापिलें नाहीं असें वाटतें. आमच्या कविरायांना मात्र वीस वर्षांचें वय होईपर्यंत संस्कृत शिकण्याची बुद्धि झाली नाहीं. यांनीं हीं वीस वर्षें सतत तमाशा पाहण्यांत व कडें वगैरे वाजविण्यांत घालविलीं. यांच्या या गुणामुळें यांना घरांत कोणीही चांगलें पहात नसे. मुद्गलजोशी तर यांचा अत्यंत तिटकारा करीत. ते नेहमीं यांची कुलांगार, कुलघातक या विशेषणांनीं संभावना करीत असत. तरी यांच्या हृदयांत प्रकाश ह्मणून पडला नाहीं. यांचा आपला पूर्वक्रम सुरूच असे, पुढें एकेदिवशीं मुद्गलभटांना कांहीं कारणांवरून अत्यंत राग आला व त्या आवेशांत त्यांनीं कविरायांवर यथेच्छ तोंडसुख घेतलें. दुःशब्दांचा सर्व कोश रिता पाडिला व मेघगर्जनेचें पर्यवसान ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टींत होतें त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या रागाचा शेवट कविरायांना घराबाहेर काढून लावण्यांत केला; व पुनः तुझें मुखावलोकन करणार नाहीं अशी शपथ वाहिली. मनुष्याचे गुण प्रकट होण्यास कांहीं विशेष प्रसंग घडून यावे लागतात, असें जें ह्मणतात त्याचाच प्रत्यय येथेंही आला !

फाटक्या वस्त्राला दोरा घालून धड करितां येतें, फुटक्या भांड्याला डाग दिला ह्मणजे तें नीट होतें, शस्त्राघाताचा घाव औषधोपचारानें बरा होतो परंतु फुटकें मोतीं व तुटकें मन कशानेंही सांधतां येत नाहीं. बाह्य वस्तूंना विस्तवानें लागलेली आग पाण्याच्या योगानें विझवितां येते परंतु अपमानाग्नीची मनोभुवनांत भडकलेली आग कशानेंही विझत नाहीं, बाह्यसृष्टींतील खाचा, खळगे दगडमातीनें भरून काढतां येतात पण मनःसृष्टींतील दुःशब्दांनीं

पडलेली खाच कशानेंही भरून काढतां येत नाहीं; भूमिदुर्गाला सुरुंग लावून पाडलेलीं भगदाडें दुरुस्त करितां येतात; परंतु मनोदुर्गाला दुर्वचांचा सुरुंग लावून पाडलेलें भगदाड कशानेंही बुजवितां येत नाहीं; त्याप्रमाणें या मानी पुरुषाच्या मनांत मुद्गलभटांच्या अपशब्दाची ठिणगी जाऊन पडतांच तेथें आगीचा एकच डोंबाळा झाला त्यांतील अविचाराचीं वाढलेलीं झुडपें चटसारीं जळालीं; कुसंगतीचा वृक्ष शेंड्यापर्यंत होरपळून गेला इतकेंच नाहीं तर तो मूळापासून उन्मळून खालीं पडला; व त्याठिकाणीं त्या सुमुहूर्तावर उपरतीचें बीजारोपण झालें. बरोबरच आहे कारण जगांतही असाच अनुभव येतो कीं, ज्या जमिनींत मुळींच तृण नाहीं व झाडझुडुप नाहीं किंवा जींत अतोनात तृण व झाडझुडुप आहे तीच जमीन साफसूफ करून बीजारोपण करण्यास सोईस्कर जाते परंतु जींत थोडथोडें तृण आहे ती साफसूफ करण्यास विशेष आयास पडतात. तात्पर्य काय कीं, सद्बोधाचे साह्यानें अगदीं जो मूर्ख असेल त्याचें मन वळवितां येतें परंतु जो धड मूर्खही नाहीं व धड शहाणाही नाहीं त्याचें मन ब्रह्मदेवालाही वळवितां येत नाहीं!

असो. त्या झटक्यासरशीं कविरायांची स्वारी एका अंगवस्त्रानिशीं जी घराच्याबाहेर पडली ती पंढरपुरास येऊन दाखल झाली. येथें आल्यावर ते पंतांचे व्याही व मित्र असे जे प्रख्यात वेदमूर्ति बाबापाध्ये त्यांचेजवळ विद्याभ्यासास राहिले. मुद्गलभटांच्या दुःशब्दरूप नांगरानें पोखरून व निस्तृण करून सुपीक केलेली मनोभूमि, तींत बाबा पाध्यांसारख्या विद्यारूप कृषीकर्मांत कसलेल्या कृषीवळानें विद्येचें बीजारोपण केलें, रोपटा उगवल्यावर त्याला गुरुकृपेचा कोमल सूर्यप्रकाश व शिकण्याची हाव हीच कोणी एक हवा मिळाली, त्यांत पुनः त्या रोपाला सुशील बुद्धिरूप जल मुबलक मिळालें मग तो कविरायाच्या मनोभूमींतील विद्यावृक्ष जोरानें फोफावला व त्याला लवकरच हुरूपाच्या मनोहर कलिका येऊन इच्छित फळें लटकलीं यांत काय नवल! मनाप्रमाणें विद्याव्यासंग पुरा झाल्यावर गुरूंची अनुज्ञा घेऊन कविराय ज्येष्ठ बंधूंना भेटण्याकरितां सोलापुरीं आले. त्यावेळीं मुद्गलजोशी तापानें आजारी होते. त्यांनीं बंधूंना घरीं आलेलें पाहिल्याबरोबर शिव्यांचा वर्षाव सुरू केला; आणि ह्मणाले कीं, 'तूं आमच्या कुळांत केवळ आह्मांला बट्टा लावण्यास उत्पन्न झाला आहेस; जर गीर्वाण भाषेचीं दोन अक्षरें शिकला असतास तर मला आज असें बोलण्याची पाळी आली नसती व माझ्या पुराणाला आज माझ्या आजारीपणामुळें जो

खंड पडला आहे तोही पडली नसता!' हें ज्येष्ठांचें बोलणें कविरायांनीं मुकाट्यानें सहन केलें व ह्मणाले, 'पोथी दिल्यास मी आज पुराण सांगेन.' मुद्गलजोशांचा स्वभाव मुळचाच तापट होता व आतां तर ते आजारीपणानें अगदीं कावून गेले होते. त्या आगींत कविरायांचें वरील बोलणें तेलासारखें जाऊन पडतांच दादासाहेबांचा कोपाग्नि अगदीं भडकून गेला व त्या सपाट्यांतच कविरायांचे अंगावर संतापानें पोथी फेंकून देऊन ते ह्मणाले, 'गाढवें जर गूळ + + + तर कुंभार भीक कां मागते? तुणतुण्याची तार लावून कडें वाजविण्यांत आणि पुराण सांगण्यात किती महदंतर आहे हें मला पक्कें ठाऊक आहे.'

रामजोशांनीं पंढरपुरीं जाऊन गीर्वाण भाषेचा व्यासंग केला होता ही गोष्ट मुद्गलजोशांना कळली नव्हती असें वाटतें! असो. रामजोशांनीं दादांचे बोलण्याकडे लक्ष न देतां पोथी उचलून ठेवून दिली. पुराणाची वेळ झाल्याबरोबर कविरायांची स्वारी पोथी घेऊन देवळांत गेली. कडें वाजवून तमाशांत साथ करणारे फंदीजोशी पुराण सांगावयाचा आव घालून व्यासपीठावर आरूढ झालेले पाहून पुराणश्रवणासाठीं आलेल्या ग्रामस्थांनीं त्यांची टर उडविण्याचा बेत केला. इकडे पुराणीकबोवांनीं वीणा लाऊन 'या कुंदेंदु तुषार हार धवला०' या भगवद्ध्यानास आरंभ करतांच त्यांच्या त्या गोड लकेऱ्यांत श्रोतृवृंद थिजून गेला. पुराणीकबोवांनीं पुराणांत फारच बहार करून सोडली. सर्वांच्या तोंडून वाहवा! वाहवा! शाबास! शाबास! असे उद्गार निघूं लागले. त्यांची पुराण सांगण्याची ती अप्रातिम शैली पाहून सर्वांस फार कौतुक वाटलें; कविरायांचें नांव सर्वतोमुखीं झालें. मुद्गलजोशाचे कानावरही हा लौकिक लवकरच गेला. प्रकृतीस अंमळ आराम पडल्यावर त्यांनीं मुद्दाम चोरून येऊन स्वारीचा तो पुराण सांगण्याचा अपूर्व थाट पाहिला. त्यांसही त्या अलौकिक गुणाचें आश्चर्य वाटलें; व ते त्या दिवसापासून रामजोशांवर प्रेम करूं लागले.

जोशीबुवा कीर्तन करण्याची कला पंढरपुराहून शिकून आले होते. त्यांची घरची स्थिति समाधानकारक नसून गरिबीचीच असल्यामुळें त्यांस या धंद्यावरच आपला चरितार्थ चालविणें भाग पडलें. गांवोगांव हे कीर्तन करीत हिंडत असत. हे बाहेर फिरावयास निघाले ह्मणजे यांच्याबरोबर पत्नी रमाबाई, उपपत्नी ऊर्फ अंगवस्त्र चिमाबाई, एक सुंदर घोडा, दोन कुत्रीं, दोन पोपट, दोन माकडें, एक रेशमी कापडण्यांचा झोंपाळा इत्यादि

पेट एकाद्या जहागिरदाराप्रमाणें बराच सरंजाम असे. या सर्व थाटामुळें याचा खर्च नेहमीं आद्यापेक्षां जास्त असे. यांस पैसा पुष्कळ मिळत असे परंतु हे नेहमीं लवलवीत असत! उचापत काढल्याशिवाय यांचा एक दिवस जात नसे. खालील आख्यायिका त्यांच्या कर्जबाजारीपणाची चांगली साक्ष देते.

रामजोशी दरसाल तुळजापुरास नवरात्रांत कीर्तन करण्यास जात असत. त्याबद्दल त्यांस सरकारांतून पंचवीस रुपयांची नेमणूक करून दिलेली होती. सालाबादप्रमाणें एक सालीं येथें आल्यावर कविरायांनीं येथील एका वाण्याकडून पासष्ट रुपयांची उचापत केली. निघतेवेळीं वाणी रुपयांची फेड केल्याशिवाय जाऊं देईना. त्यानें बुवांच्या मागें पैशाकरितां तगादा लाविला मग या स्वारीनें ती हकीकत आपल्या बंधूस खालील श्लोकाचे द्वारानें कळविली; तो श्लोक असाः—

‘ येथें येउनि आज दीड महिना पासष्ट मुद्रा पहा ।
झाली शुद्ध उचापत प्रभुवरें केली बिदागी दहा ॥
येथें वार्षिक पंचवीस मजला देऊनि बा तोडितो ।
दादा तीस दिल्याशिवाय मजला वाणी कसा सोडितो ॥१॥’

कविरायांच्या अंगीं समयसूचकता हा एक अप्रतिम गुण होता. हा गुण अंगीं नसल्यास प्रसंगोपात मनुष्याची किती फजिती उडते हें सर्वत्रांस माहीत आहेच. यांची स्वारी एकदां कीर्तनासाठीं इचलकरंजीवर घोरपडे यांचे घरीं गेली असतां आश्रितमंडळींत आपल्या बिदागीविषयीं चर्चा चालली आहे असें त्यांना समजलें. मग काय? कथा ऐन रंगांत आल्यावर बोवांनीं तात्काळ एक आर्या करून म्हटली व आपला कार्यभाग साधून घेतला ती आर्या अशी.—

‘ भोजासम कविताप्रिय, कर्णापरि दानशूर घोरपडे ।
ऐसें असतां माझ्या, देणगीचा कां? तुह्मांसि घोर पडे ॥१॥ ’

ही समयसूचकता पाहून घोरपड्यांनीं त्यास योग्यतेप्रमाणें देणगी दिली. तात्पर्य असली चतुरता व समयसूचकता बिरळाच!

याचवेळीं सोलापूर मुक्कामीं सोयरोबा अंबिये या नांवाचे एक सत्पुरुष रहात असत. हे नाथसांप्रदायी असून मोठे कविही होते. यांची कविता भक्तिरसपर आहे. याचे चरित्र व त्यांच्या कवितेचे मासले पुढें एका निराळ्या प्रकरणात देण्यांत येतील. असो. नाथाचे मठांत जोशांचें कीर्तन कर-

विण्याचा एकदां बेत केला. परंतु मठाधीशांस बुवांची रंगेल व फंदीवृत्ति पसंत नव्हती व ह्मणून ते त्यांचा नेहमीं तिरस्कार करीत. 'आमच्या मठांत कीर्तन व्हायला नको व त्या दारुड्याचे येथें पायही लागावयाला नकोत.' असें ह्मणून नाथांनीं कीर्तनाला 'खो' दिला. मंडळींना फार वाईट वाटलें व त्यांचा विरस झाला; परंतु रामजोशांनीं त्यांचें समाधान करून त्यांना सांगितलें कीं, 'तुमची इच्छा असल्यास आपण मठाचेच बाहेरच्या बाजूस पाल देऊन तेथें कीर्तन करूं.' हें ऐकून मंडळीला अत्यंत आनंद झाला व त्यांनीं मोठ्या हुरूपानें मांडव वगैरे घालून कथेची सर्व तयारी केली. मृदंगावर थाप पडून ईशस्तवनास आरंभ होण्याचाच अवकाश! मांडवाकडे लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या! बुवांनीं कीर्तनांत अगदीं बहार करून सोडली. मंडळी आनंदानें डोलूं लागली. कथा अगदीं रंगांत आल्यावर बुवांनीं त्या दिवशींच्या प्रकारावरही पुढील लावणी तात्काळ करून ह्मटली.—

'भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा। धरिसी तरी हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी। जरा तरी समज धरी अंतरीं ॥ हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं। मठाची उठाठेव कां तरी ॥ वनांत अथवा जनांत हो कां मनांत व्हावें परी। हरीचें नांव भवांबुधि तरी ॥ चाल ॥ काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लांकडें। हीं काय भवाला दुर करतिल माकडें। बाहेर मिरविशी आंत हरिशिं वांकडें। अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा ह्मणविशी बुधा। हरिरस सांडुन घेशी दुधा ॥ भला० ॥ १ ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ काम कोपला। आंतुनि, बाहेर ह्मणविशी भला ॥ वित्त पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला। असें हरि ह्मणतो नुमजे तुला ॥ दांभिक वर संभावित अभ्यंतरिं नाहिंस बिंबला। बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चा०॥ तूं पोटासाठीं करि खटपट भलतिशी। परि भक्तिरसाविण हरि भेटल काय तुशीं। काय मौन धरुनिया गोमुखिला जाळिसी। स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला मुधा। न जाणसि वांजी ह्मणसी सुधा ॥ भला० ॥ २ ॥ टिळा टोपिवर शिळा पडो या दिळात करिसी जपा। तथापि न होय हरीची कृपा ॥ दभ-

मुष्टिच्या गर्भि धरुनियां निर्भर पशुची वपा । जाळिशी तिळा तांदुळा तुपा ॥ दंडकमंडलु बंड माजविशि मुंड मुंडिशी तपा । न सार्थक लटक्या साऱ्या गपा ॥ चाल० ॥ ही बार बार तलवार येइल काय पुन्हां । ह्या दुर्लभ नरदेहांत ठविशी कुण्हा । भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा । वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित्त न द्विधा । सदा हरि कविरायावर फिदा ॥ भला जन्म हा० ॥ ३ ॥

ह्या लावणींत कविरायांनीं मठाधिपतींची कान उघाडणी करून दांभिक मंडळीवर चांगलाच कोरडा उडविला आहे ! घरीं बायकांचेसमोर कपालदंड गंडादि इंद्रियांना आपाद भस्माचे त्रिपुंड्र लावून वेदांताचें बंड माजवून ' अखिल ब्रह्मांड हरीचे मायेनें व्यापिलें आहे ' असें उद्दंड वाक्पांडित्य करणाऱ्या व हरण्याच्या दुकानांत जाऊन देहापर्यंत अस्तन्या मारून 'इराण और लाव एक अंडा ' अशी प्रचंड गर्जना करणाऱ्या व स्वतुंडानें देशहिताच्या खंड न पाडतां लंब्या लंब्या बाता झोंकणाऱ्या पुंड धर्मलंडाना वरील लावणींत कविरायांनीं चांगला थंडा थंडा उपदेश करून त्यांची कंड चांगलीच जिरवली असें ह्मणावें लागतें !

असो. कविराय शाक्त असल्यामुळें ते मद्यपान करीत असत असें ह्मणतात; व याच जनवार्तेला अनुसरून नाथांनीं त्यांना दारुडी हें विशेषण लाविलें असावें· असें वाटतें. सोलापूरच्या ब्रह्मवृंदांनींही त्यांच्यावर हाच मद्यपानाचा आरोप ठेवून त्यांना बहिष्कृत केलें होतें. पुढें कांहीं दिवसांनीं श्रीमत् शंकराचार्यांची स्वारी कर्मधर्मसंयोगानें त्याठिकाणीं येऊन पोहोंचली. रामजोशी यांजजवळून मोठा दंड घेतल्याशिवाय त्यास पंक्तिपावन करावयाचें नाहीं असा तेथील मंडळीनें बेत करून तो स्वामींस कळविला. स्वामींनींही त्या गोष्टीला आपलें अनुमोदन दिलें· स्वामींची स्वारी रामजोशी यांचे घराजवळच श्रीविठ्ठलाचे मंदिरांत उतरली होती त्याच मंदिराचे ओटीवर एक मोठा बटवा सोडून ऊन खात बसण्याचा जोशीबोवांचा नित्यक्रम असे. एके दिवशीं असें झालें कीं, रामजोशी प्रातःकालापासून दुपारपर्यंत त्याच ओटीवर बसून राहिले. दुपार झाल्यावर स्वामींनीं जोशीबावांस विचारिलें कीं, आज स्नान वगैरे करण्यास कां उठलां नाहीं ? जोशीबावांनीं मोठ्या विनयानें सांगितलें कीं, ' सकल जगाच्या गुरुंनीं ज्याचा तिटकारा केला त्यास या जगांत राहून तरी काय करावयाचें आहे ? ' इतकें बोलून त्यांनीं आचार्यांवर तात्काळ एक संस्कृत लावणी करून म्हटली. आधीं कविरायांचा

आवाज कर्णमधुर, त्यांत त्यांचें आवडीचें वृत्त, तेंही पुनः मधुर सुंदर व मनोहर संस्कृत शब्दरत्नांनीं खचून काढलेलें व मनाच्या प्रेमळअवस्थारूप कोंदणांत बसविलेलें मग त्या आनंदास काय पारावार! आचार्य प्रेमानंदानें डोलूं लागले. त्यांची मर्जी सुप्रसन्न झाली मग प्रसाद ठरावयास काय उशीर! त्यांनीं लागलेंच शागिर्दास पाणी उपसण्यास सांगून तेथेंच पंक्तीस भोजन करण्याविषयीं जोशीबावांस सांगितलें!

पुण्याच्या पौरजनांवरही आमच्या कविरायांनीं चांगलीच छाप बसविली होती. पुण्याची मंडळी ह्मणजे ' उत्तम परीक्षक ' असा त्यांच्या नांवाचा लौकीक फार दिवस गाजत आला आहे. या मंडळींच्या चित्तरूपी कसाला ज्यांचें गुणरूपी सुवर्ण उतरून तें बावनकशी ह्मणून एकदां ठरलें त्याला कोठें भय ह्मणून नाहीं. अशा मंडळीवर जय मिळविण्याचें काम लहान सहान नाहीं. असो! कविराय पुण्यास बहुतकरून दरसाल येत असत. पुण्यांत त्यांचा लौकीक फारच झाला. त्यांचें वाक्चातुर्य ऐकून निळकंठशास्त्री थत्त्यांसारख्या वेदपारंगतमंडळीनेंही त्यांची फार वाहवा केली. थत्तेशास्त्री तर एकदां इतके खुष झाले कीं, भरकथेंत त्यांनीं आपल्या अंगावरील शाल-जोडी काढून बुवांचे अंगावर घातली! थत्तेशास्त्री कांहीं सामान्य नव्हते. त्यांच्या विद्वत्तेचा लौकीक माहाराष्ट्रांतच काय पण साऱ्या हिंदुस्थानांत गाजून राहिला होता. अशांच्या तोंडून ' धन्य ' ह्मणवून घेणारांची बुद्धि-मत्ताही तशीच अपूर्व असली पाहिजे.

शके १७१४ त ह्मणजे इ० स० १८१२ त कविराय काशीयात्रेस जाण्याच्या उद्देशानें सर्व निरवानिरव करून व सर्वत्रांचा निरोप घेऊन घर सोडून निघाले. काशीयात्रेचा उद्देश मनांत धरून स्वारी घराबाहेर पडली खरी; पण जवळ पैसा कुठें होता! सरस्वतीबाईनीं यांना माळ घातल्या दिवसापासून लक्ष्मीबाईनीं यांच्यावर आग पाखडण्यास आरंभ केला होता. तुळजापुरीं सरस्वतीबाईनीं यांचे कसकसे धिंडवडे केले ते वाचकांनीं वाचलेच आहेत. त्या मधून मधून यांच्याकडे कृपादृष्टि फिरवून घरीं येत खऱ्या पण सरस्वतीबाईंचा थाटमाट व डामडौल पाहताच सवतीमत्सरानें बेहोष होऊन आल्यापायींच माघारीं जात. कविरायांच्या मनोभुवनांतील सरस्वती-बाईचें वर्चस्व त्यांना पहावत नसे. हा लक्ष्मीसरस्वतींचा झगडा आज-कालचा नसून पूर्वापार चालत आलेला आहे. बाणकवीसारखा यजमान भेटलाच तर मात्र त्या त्याच्या बाणाला भिऊन गुण्यागोविंदानें व सुखासमा-

धानानें एकत्र राहतात; बाकी असा योग कपिलाषष्ठीप्रमाणें एकादेवेळींच यायचा! त्याचप्रमाणें हेंही येथें सांगून ठेवतों कीं, अशाप्रकारें लक्ष्मीबाईनीं पिंगा घालून सरस्वतीबाईचा इंगा जिरविण्याचा किती जरी प्रयत्न केला तरी त्यांच्या ज्येष्ठ भगिनी ज्या आकाबाई त्या मात्र सरस्वतीबाईची पाठ क्षणभरही न सोडतां त्यांच्या पाठराखणीचें काम उत्तमप्रकारें बजावतात!!!

असो. अखेर कविरायांनीं द्रव्यसंपादनार्थ पुण्याकडे मोर्चा फिरविला व तेथें आल्यावर त्यांनीं आपला महायात्रेस जाण्याचा हेतु पुण्याच्या मित्रमंडळीस कळविला. त्यांनीही शक्य तितकी द्रव्यद्वारां मदत करून कविरायास अशी सल्ला दिली कीं, 'तुमचा हा हेतु येथील थोर थोर लोकांस कळवा म्हणजे कांहीं मिळालें तर मिळेल' कविरायांनीं ती गोष्ट कबूल केली व थोर लोकांची एक सभा जमवून त्यांच्यापुढें एक याद टाकिली. याद पाहतांच तीतील मतलब त्यांस कळावा म्हणून त्यांनीं तीवर असें लिहून ठेविलें होतें कीं,—

'वर्षें तीन पुण्यांत जो मिरविला तो रामजोशी पहा ॥
यात्रोद्देश धरूनिया तनुमुळें घेतो निरोपाशि हा ॥
या मागें न कधीं पुढें ही न कधीं मागावयाचा गुणी ॥
ऐसें जाणुनि द्या यशासह तुह्मीं ही याद ही लेखणी ॥ १ ॥'

ती यादी पाहतांच जमलेल्या थोर थोर लोकांनीं भराभर आंकडे टाकिले. एकंदर चौदा हजारांची रक्कम तात्काळ जमली. अशाप्रकारें पुण्यांतील धर्मात्म्या व कुलीन सद्गृहस्थांनीं कविरायांच्या गुणांची परीक्षा करून त्यांना जो उदार आश्रय दिला त्याबद्दल त्यांची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच! परंतु अखेर लिहिण्यास मोठें वाईट वाटतें कीं, कविरायांचें महायात्रेस जाणें झालें नाहीं. त्यांची प्रकृति उतारवयामुळें अगोदरच क्षीण झाली होती, त्यांत पुनः वाटेचे अतोनात श्रम झाल्यामुळें ते आजारी पडले व त्यांतच त्यांचा शेवट झाला! महाराष्ट्रभाषासुंदरी उघडी पडली, गीर्वाणसरस्वतीचे हातांतील शेवटचें रत्न हरपलें, लावणीबाईना हरिकीर्तनासारखें पुण्यकर्म सोडून तमाशांत डफ तुणतुण्यावर जाऊन बसण्याची पुनः पाळी आली, व्यवहारसागराला ओहोटी लागली व वैराग्याचा बोध करणारा प्रखरसूर्य अस्तिगत झाला.

वाचकहो! कविरायांनीं तर आपला निरोप घेतलाच आहे. आतां आपणही पण त्यांच्या काव्यासंबंधी दोन शब्द बोलून त्यांचा निरोप घेऊं!

यांनीं 'छंदोमंजरी' व 'मदालसाचंपू' असे दोन ग्रंथ केले आहेत, पैकीं शेवटचा ग्रंथ संस्कृत आहे. शिवाय त्यांनीं लावण्या, आर्या, श्लोक, कटिबंध वगैरे बरीच स्फुट कविता केली आहे. यांचेवेळीं **अनंतफंदी, होनाजीबाळ, सगनभाऊ, बाळाकारंजकर, बहिरू मल्हारी, गोविंद राव साळी** वगैरे बरीच लावण्या करणारी मंडळी होऊन गेली तरी कविरायांची बरोबरी करण्याजोगी योग्यता यांतून एकाचेही आंगीं नव्हती! कविरायांबद्दल शास्त्रीबुवा असें ह्मणतात कीं, 'यांच्याविषयीं लोक ज्या गोष्टी सांगतात त्यांवरून ही स्वारी मोठी रंगेल असावी असें दिसतें. हे पहिल्यानें मोठे फक्कड रंगेल व फंदी होते आणि ही वृत्ति यांच्या श्रृंगारपर लावण्यावरून स्पष्ट दिसते; पण पुढें मोरोपंतांच्या आर्यांनीं यांची मनोवृत्ति तन्मय करून टाकून इतकी परमार्थाकडे ओढली कीं, जो वाग्विलासाचा भर प्रस्तुत कवीनें असभ्य काव्यरचना करून रंगेल लोकांस अधिकच व्यसन निमग्न करण्याच्या अनुचित कार्याकडे योजिला होता, तोच पुढें जनांचें मन विषयपराङ्मुख करून आपल्या खऱ्या हिताकडे वळविण्यास त्यानें योजिला. ज्यानें विषयासक्त होऊन स्त्रियांच्या लावण्यांचें व विलासांचें 'कोण्या ग सुभगाची मदनमंजरी । सांग सखे सुंदरी ॥' अशी लावणी करून मनोवेधक वर्णन करावें त्याचेचठायीं 'दो दिवसांची तनु ही साची' अशी लावणी करण्याइतकी परमार्थाची वृत्ति दृढ व्हावी व त्यानें विषयसुखाचें अनर्थत्व व असारत्व हीं वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या हृदयांवर ठाम उठवून द्यावीं हें सकृद्दर्शनीं विरोधात्मक दिसतें खरें; कारण सामान्य प्राकृतजनांचेठायीं वरील दोन्ही गोष्टींचा मेळ कधींही दृष्टीस पडत नाहीं. जे एकदां विषयलंपट होऊन बसले व ज्यांची चित्तवृत्ति केवळ तदाकार बनून राहिली त्यांस वैराग्याच्या स्थितीची कल्पनाही होत नसते, पण विशाल मनाचे जे असतात त्यांचा प्रकार निराळा!'

अशीं उदाहरणें आणखीही कांहीं कवींचीं देतां येतील. **भर्तृहरीची** व त्याच्य तीन शतकांची ओळख निदान भारतवर्षीयांस तरी द्यायला नको आहे. त्यांतही असाच चमत्कार दृष्टीस पडतो. प्रत्येक शतकांतच काय पण प्रत्येक श्लोकांत कवीची अपूर्व करामत दिसून येते. 'जो भर्तृहरी 'श्रृंगारशतकांत' स्त्रियांची इतकी वाखाणणी करितो तोच पुढें 'वैराग्य शतकांत' त्यांस केवळ तुच्छ मानितो व त्यांचा तिरस्कार करितो.' 'नीतिशतकांत' नीतिशीं, 'वैराग्यशतकांत' वैराग्याशीं व 'शृंगार

शतकांत' शृंगाराशीं कवीची केवळ तादात्म्यता झालेली आढळते. 'पंडितरायांच्या 'भामिनीविलासाची' ही अशीच गोष्ट आहे. पहिला भाग शृंगाररसात्मक असतां शेवटल्या भागांत त्याच्या विरुद्ध विषय आहे! ज्या पंडितरायांनीं जातगोत न पाहतां केवळ सौंदर्याला भुलून व जनलज्जेला फांटा देऊन एका यवनीच्या पायांशीं आपलें प्रेम सर्वस्व वाहिलें त्यांनींच अखेरीस भक्तिरसाच्या महापुरांत वाहवत जाऊन 'गंगालहरी' सारखें लहरी मनुष्यांच्या हृदयांत देखील प्रेमाच्या लहरीवर लहरी उसळविणारें काव्य केलें हें काय लहानसहान नवल? ज्या पंडितरायांनीं आपली पत्नी मेली असतां एकाद्या प्राकृत मनुष्याप्रमाणें करुणरसपर गीतें गाऊन विलाप केला त्यांनींच आपल्या नातवास 'अश्वधाटी' नामक प्रसिद्ध काव्यांत संसाराबद्दल विरक्ति दाखवून भक्तिमार्गाचा उपदेश करावा हें केवढें आश्चर्य! तात्पर्य काय कीं, कवीच्या मनांत मानवी प्रकृतीच्या सर्व वृत्तींचा समावेश होतो व जिचा ज्यावेळेस पगडा बसेल ती त्यासमयीं त्यांचे कृतींत पुरतेपणीं उठते.' बरोबरच आहे कारण स्वच्छ पाण्यावर जी जी वस्तु धरावी ती ती त्यांत पूर्णपणें प्रतिबिंबित होते!

कविरायांनीं आपल्या लावण्यांत शृंगाररसाची जशी कमाल करून सोडली आहे तशीच त्यांनीं वैराग्याचीही अगदीं शिकस्त केली आहे. त्यांनीं आपल्या लावण्यांत याज्ञिकांवर व धर्माचें स्तोम माजविणाऱ्या दांभिकांवर, जे कोरडे उठविले आहेत त्यांवरून त्यांच्याठायीं असणारे उद्दामपणा, धीटपणा व आवेश हे गुण स्पष्टपणें व्यक्त होतात. प्रसिद्ध निबंधमालाकार ह्मणतात, "वर्णमाधुर्याची ज्याच्या कानास कांहीं लेश ह्मणून ओळख असेल, शब्दांचा सुंदरपणा व खुमारी हीं ज्यास यत्किंचित् कळत असतील, तसाच त्यांचा झोंक व प्रौढपणा ज्यास थोडासा तरी समजत असेल त्यास कविरायांच्या लावण्या केवळ तल्लीन करून सोडतील. यांच्या कवितेंत दुसरी अशी एक खुबी आहे कीं, संस्कृतकवींनीं योजलेल्या प्रौढ शब्दांची व अर्थांची शुद्ध लौकिक मराठी भाषेंतील केवळ व्यावहारिक अशा शब्दांशीं व अर्थांशीं मेसळ केलेली आढळते; व ती मेसळ सुद्धां इतकी बेमालूम केलेली असते कीं, त्यांच्या त्या मिश्रणचातुर्यानें तें सर्व एकरंगी दिसून त्यापासून एक जातीचा विशेष आनंद उत्पन्न होतो. सारांश, सरस, प्रौढ, झोंकदार आणि आवेशयुक्त असें मराठीभाषेचें स्वरूप ज्यास पाहणें असेल त्यास तें या कविरायांच्या लावण्यांत सांपडेल." हें संस्कृतप्राकृत शब्दांचें

अपूर्वमिश्रण तयार करण्याची हतोटी यांना मोरोपंतांच्या सहवासानें साधली असावी असें वाटतें. पंतांच्या आर्येस यांनींच प्रसिद्धीस आणिलें असें पंतांचे चरित्रांत सांगितलेंच आहे; यासंबंधीं आह्मांस एक आर्या आढळली आहे; ती अशीः—

'जैशी जनकें दिधली सच्चिद्घन राम जो सिता त्याला ।
तैशी दिधली मयुरें स्वार्या ती रामजोशितात्याला ॥ १ ॥'

वरील आर्येत ती रचणाऱ्याचें चातुर्य चांगलेंच नजरेस येतें. असो. कविरायांनीं बीभत्स शृंगारास प्रदीप्त करणाऱ्या व सर्व जनांस अत्यंत प्रिय वाटणाऱ्या लावणीछंदास तमासगिरांच्या फडावरून काढून हरिदासांच्या मृदंगावर आणिलें व त्यास आपल्या वाक्चातुर्यानें श्रोतृजनांच्या अंतःकरणांत वैराग्यवृत्ति बाणविण्यास साधनीभूत केलें. कविराय आपल्या लावण्या जेव्हां कथेंत गात होते तेव्हां श्रोतृजनांच्या मनावर त्यांचा परिणाम कांहीं विशेष होत असावा असें वाटतें, शिवाय त्यांची रसवंती रसाळ असून ते चतुर वक्ते असल्यामुळें त्यावेळच्या कीर्तनकारांत त्यांची मोठी चहा झाली असेल असेंही अनुमान होतें. जोंपर्यंत 'कीर्तनकला' हें नांव आमच्या देशांत अस्तित्वांत राहील तोंपर्यंत कविरायांचें नांव आबालवृद्धांच्या मुखीं—आतां आहे असेंच—अबाधित राहील अशी आमची खात्री आहे!

'नवनीत' 'रामजोशांच्या लावण्या,' व निबंधमाला' या ग्रंथरूप शिलाछापांत चित्तफलक घालतां त्यावर कविरायाचें जें चरित्रचित्र उमटलें त्यावरून आह्मीं वाचकांना दाखविण्याकरितां येथें हें कसेंबसें चित्र काढिलें आहे. हें पुष्कळ ठिकाणीं अपूर्ण राहिलें आहे असें आमचें मनच आह्मांला सांगत आहे, तरी पण आह्मीं या चित्राला—तें सुंदर दिसण्याकरितां आमची होती तेवढी शिकस्त करून—स्मरणशलाकेनें कल्पनामय रंग भरले आहेत. वाचकहो! शेवटीं तुह्मांला येवढेंच सांगतों कीं, तुह्मी हें चित्र पाहत असतां तुमच्या हृदयाकाशांतील हर्षसूर्याचे किरण ज्या ज्या ठिकाणीं पडतील त्या त्या ठिकाणचे रंग खुलून ते तुमच्या नेत्रकमलांना प्रफुल्ल करील व त्या प्रफुल्ल नेत्रकमलांच्या तेजाचें तुमच्या मुखाब्जावर परावर्तन झालें ह्मणजे तींही विकास पावतील—ह्मणजे त्यांवर हर्ष चमकूं लागेल!

---

## कविरायांच्या लावण्यांतील मेंचे.

'कोण्या ग सुभगाची मदन मंजरी । सांग सखे सुंदरी ॥ ध्रु० ॥ इच्या सौंदर्याची सिमा । झाली गडे रतिहुनि उत्तमा ॥ पाहुनिया मुखचंद्रमा । सखे गडे अमा गमति पौर्णिमा ॥ काय अधराची रक्तिमा । लाजवी नवकुंकुमविद्रुमा ॥ अंगि वसन जिच्या भर्जरी । कोण्या ग० ॥ १ ॥ मग वाटली विद्युन्नटी । भलि ग रुपाची उतरली भटी ॥ उरिं कंचुकि घट तटतटी । टिळक ललाटीं सुधारसघटी ॥ पाहुनि कृशा तव कटी । हरिचा कृशकटिपद लटपटी ॥ अशि अनंत गुणगुर्जरी । कोण्याग० ॥ २ ॥ शिरिं सुंदर नवमल्लिका । झटति वर मधुकर रस कौतुका ॥ नयनाननखंजनरंजिका । मधुर कंठांत लाजवी पिका ॥ अशि वर्णिल कोण सदालिका । इतर कवि कविरायाहुनि फिका ॥ मज वाटतसे निर्जरी । कोण्याग सुभगाची मदन मंजरी ॥ सांग सखे सुंदरी ॥ ३ ॥

२ लावणी.

'दो दिवसांची तनु ही साची, सुरतरसाची, करुनि मजा । गमजा करितां मनिं उमजाना हें सुख न पुढें पडल वजा ॥ भाइ सावध व्हा ॥ ध्रु० ॥ आज उद्यांचा पूर नद्यांचा वयलगद्यांचा बहर नवा । उलट्या झालया कुलटा रांडा मग कोठिल हो मालपुवा ॥ थाट बसाया पाट रुप्याचे ताट त्यामधें दूधरवा । धनां वयाला बसेल घसरा मग विसरा हो गोड खवा ॥ रांडा पोरें वंचक चोरें जंवर मिळवितां तंवर थवा । शितें तंवर तीं भुतें भोंवतीं कोण कुणाचा सखा जिवा ॥ जोंवरि पैसा तोंवरि बैसा मंचकिं ह्मणतिल घ्याल हवा । बेटाबेटीं हातिं नरोटी देतिल हा खरू समज ठिवा ॥ पातयात कीं घात होतसे हात जोडितों हरिसि भजा । फुका सुखाला मुकाल कथितों न कालचा दिन आज दुजा ॥ दो दिवसांची० ॥ १ ॥ कनकधनाचा मद मदनाचा वोसरल्यावर रंग फिका । रुका न पदरीं विकाल घर मग विलास भरजरी कुठून हुका । गजरथ घोडा कलगी तोडा पायीं जोडा लाल झुका । तोडा जाउनि खोडा येइल

बसेल एकादा धरमधका ॥ सुगंधशाला नरम दुशाला गरम मसाला पान पका । हार तुरे हे बरे न पुढतीं बुरे हाल खेळाल बुका ॥ कोकशाला नाटकशाला दासी यांचा घ्याल मुका । कामुक होउनि कां मुकतां परमार्थ सुखाला देह विका ॥ कदमबुलाजा या न भुला जा तुह्मां न लाजा मनिं समजा । दूत यमाचे मूत आणतिल नेला तुमचा बाप आजा ॥ दो दिव० ॥ २ ॥ पुरे कराया मौजा तेथुनि फौजा झाल्याचि रवाना । यमदूतांची ढाल विनीवर वालखफदी देखाना ॥ पुढें यमाचे खडे दूत हे बडे हरामी समजाना । मार मारतिल फार कुणी मग मामा काका गौसेना ॥ रांडा आतां मांडा चारिति खांडा ह्मणांतल करा चुना । मूळ कुणाचें भूल तुह्मांला चूल चालती तंवर ह्मणा ॥ तडका येतील सारे अडका हुडकायाला मरतांना । पीठ गिळेना मीठ मिळेना ऐसें करितिल एकाना ॥ वेडा होइल परिजन वेडा ह्मणतिल पेढा आदिस जा । अडा भुयर पडाल मग तुह्मी रडाल न ह्मणा काळ खुजा ॥ दो दिव० ॥ ३ ॥ सुभा करुन मनसुबा एखादा उभा करा परिवार भरा । काय तुह्मांला यांत सांचलें आंत वांचलें आयुखरा ॥ दारजनाला हार नगांचे भार मुलिस मुलग्यास तुरा । घाल पुन्हां जरि घ्याल न देतिल तुह्मांसि त्यांतिल जरा चुरा ॥ कां मरतां धनलोभें फिरतां पुरता याचा शोध करा । कोण तुह्मांला वाली तो वनमाली लाविल पैलतिरा ॥ लोह घनाच्या जाड कवाडा आड बसा कीं वाड चिरा । काळ सखत पाताळ तळांतुनि काढिल अंबुधिमाजि शिरा ॥ फार कशाला सार सांगतों बार बार जन्मा नवजा । कविरायाचा बोल नव्हे कीं फोल डोल ध्यानीं उमजा ॥ दो दिवसाची० ॥ भाइ सावध व्हा० ॥ ४ ॥

वरील दोन्हीं चित्रें एकाच चितान्यानें काढलेलीं आहेत; पण दोहोंत अंतर किती आहे ! पहिल्या चित्रांत वाग्वधूचें स्वरूप जें प्रकट झालें आहे तें;—

'लज्जा व्यालोल दृष्टीं स्मित रुचिरमुखीं भ्रूयुगीं नित्य नर्म ।
व्याहारीं कोमलांगीं अभिनव मिरवे घर्मरोमांच वर्म ॥'

अशा शृंगाररूपाचें आहे. ही आपल्या रसिककामुकजनांच्या हृदयदुर्गांचा

भेद करणाऱ्या नयनशरांनीं मदनाचें पंचशरत्व जणूंकाय अन्वर्थकच करून दाखवीत आहे असें भासतें! तरुणीच्या पदनूपुरांचा झणत्कार ऐकिल्याबरोबर मनाची काय स्थिति होते याचा थोडासा तरीं ज्याला अनुभव असेल त्यांचें तें देवांगनातुल्य लावण्य पहाण्याकरितां नेत्र कसे हपापलेले असतात याची यत्किंचित् तरि ज्याला कल्पना असेल; त्यांच्या मुखगंगेंतून स्त्रवणाऱ्या वाग्बिंदूंचें पान करण्याकरितां कर्णद्वयांची कशी धडपड चाललेली असते याची ज्यांना लेशभर तरी ओळख असेल; ज्यांतील मुक्ताफलकंकणें किण् किण् असा कर्णमधुर नाद करीत असतात असे ते त्यांचे केशरचर्चित गौरकरांबुज धरण्याकरितां हात कसा पुढें पुढें सरत असतो याची ज्यांना रतिभर तरी माहिती असेल; त्यांच्या नवकिसलयाला ही लाजविणाऱ्या आरक्त बिंबाधरावर व्रण करण्याकरितां दंत कसे शिवशिवत असतात याची ज्यांना अणुभर तरी कल्पना असेल; पुष्पासवप्राशनानें ज्यांची मुखें सुगंधित झालेलीं आहेत अशांच्या मुखचुंबनाकरितां मुखाला कसें पाणी सुटतें याचें ज्यांना लेशभर तरीं ज्ञान असेल; व त्या आपल्या प्रीतीला झिडकारून व कुपित होऊन नेत्रांवाटे अग्निवर्षाव करीत फणकाऱ्यानें जाऊं लागल्या असतां हृदयांत कशी कालवाकालव होत असते, पायांची त्या प्रतिचंडिकामूर्तीमागें धावण्याकरितां कशी लटपट व तारांबळ उडते व अंगाला कसा दरदरून घाम सुटतो याचा ज्यांना इवलासा तरी परिचय असेल ते वरील काव्यचित्र पाहून केवळ थरारून जातील यांत मुळींच संशय नाहीं! दुसऱ्या चित्रांतील कवितादेवीची मूर्ति चितारयानें जरी सर्वांगसुंदर व सर्व भूषणांनीं मंडित अशी काढली आहे तरी ती एकाद्या पोक्त व व्रतस्थ राजपत्नीप्रमाणेंच,—

> ' कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता ॥
> विराजे सिंदूरें धवलवसनें भूपवनिता ॥ १ ॥ '

दिसते किंवा बाहून तिचें जास्त वर्णन करावयाचें ह्मणजे, ती जिचें मुख प्रसन्न आहे व जिनें आपली दृष्टि सतारीच्या पडद्यावरून झराझर वर खालीं होणाऱ्या हस्ताकडे लाविली आहे, व जी स्वमुखानें सुबोध व सुरस पद्यें गात आहे अशा मयूरस्थ देवी सरस्वतीप्रमाणेंच हुबेहूब दिसते. तात्पर्य काय कीं एका लावणींत शृंगारवर्णनाची अगदीं कमाल करून सोडली आहे; संस्कृत कवितेंत स्त्रियांच्या वर्णनांत ज्या उपमा वगैरे असतात त्याच जरी साऱ्या हींत आल्या आहेत तरी पण पदरचनेची जी येथें अप्रतिम बहार केली आहे तीमुळें त्या साऱ्या नव्यासारख्याच शोभून जात आहेत; व दुसऱ्या

लावणींत ती वाचिली किंवा ऐकिली असतां हृदयांत पूर्ण विरक्ति बाणेल असा उत्तम बोध उतरला आहे!

ईश्वराच्या राज्यांत सर्वगुणसंपन्न असा मनुष्य सांपडणें विरळा! एकाच्या अंगीं एक गुण तर दुसऱ्याच्याठायीं दुसराच! चहूंठिकाणीं सारखा बसणारा चौकोनी चिरा दुर्मिळ! एक गणीत शास्त्रांत पारंगत तर दुसरा भाषाशास्त्रांत. एक गाण्यांत तरबेज तर दुसरा वाद्यकलेंत, एक काव्य करण्यांत तर दुसरा तें तालसुरानें ह्मणून दाखविण्यांत. सगनभाऊनें उत्कृष्ट लावण्या केल्या परंतु 'रामा गोंधळी' उत्पन्न होईपर्यंत त्यांची योग्यता समजून आली नाहीं. 'लावणी करावी अशी सगनभाऊनें व ती बजाऊन ह्मणावी रामा गोंधळ्यानेंच' असे रसिक लोकांनीं काढलेले उद्गार पुष्कळांच्या कानावरून गेले असतील. हा वर मांडलेला सिद्धांत रामजोशांना ही मान्य होता. 'बयाबाई' ह्मणून एक स्त्री होती ती त्यांच्या लावण्या फारच सुंदर ह्मणत असे, असें सांगतात. कविरायांनींही तिला उद्देशून एक लावणी केली आहे; ती अशी:—

**'दैवें ही गांठ बयाबाईची, मज पडली साची ॥ धृ० ॥ कविता इजसंगें रंगा आली, नानाविध चाली ॥ वाणी काशि काय परिक्षा झाली, गाणारी धाली ॥ ऐसी मति नरांत विरळ रसाची, बायकांत कैंची ॥ दैवें० ॥ १ ॥ आहे घरोघरिं पुण्यामधि गाणें, परि खोटें नाणें ॥ आलाफ् कंठामधिं घेति किराणे, हें लाजिरवाणें ॥ पुण्याविण कविता नच येयाची । शूद्रास कशाची ॥ दैवें० ॥ २ ॥ कवितारस मनांत झडकरि यावा । पुण्याचा ठेवा ॥ दाता परि नीरस काय करावा । जनमार्मिक व्हावा ॥ धन्या सत्कविता कविरायाची । रसिकता बयाची ॥ दैवें ही गांठ बयाबाईची ॥ मज० ॥ ३ ॥**

वरील लावणींत कविरायांचे नैसर्गिक गुण बरेच प्रकट झाले आहेत. त्यांनीं बयाबाईच्या रसिकत्वाची जी वर तारीफ केली आहे तिजवरून त्यांच्या अंगचें गुणग्राहकत्व चांगलें निदर्शनास येतें; शिवाय या लावणींत त्यांनीं स्वतःला 'शूद्र' असें ह्मणवून घेतलें आहे त्यावरून त्यांचा विनयही दृष्टोत्पत्तीस येतो.

कविरायांनीं वर्णनपर अशाही लावण्या बऱ्याच केल्या आहेत. 'पंढरपूरच्या, तुळजापूरच्या व गिरीवरील व्यंकटेशाच्या लावणींत त्यांनीं त्या

त्या ठिकाणचें वर्णनचित्र उत्तम वठवून दिलें आहे. त्यांच्या ऐतिहासिक लावण्याही चटकदार असून त्या तत्कालिन इतिहासावर चांगला प्रकाश पाडतात. त्यांनीं एका लावणींत दुष्काळाचें वर्णन केलें आहे, तें इतकें हृदयद्रावक आहे कीं, तें वाचिलें किंवा ऐकिलें ह्मणजे अंगावर कांटाच उभा राहतो. हें वर्णन बहुतकरून १८०२।१८०३ मध्यें पडलेल्या दुष्काळाचें असावें. ही लावणी फारच मोठी असल्यामुळें ती सबंध येथें देववत नाहीं, तरी पण तिचा कांहीं भाग येथें देतों. या कडव्यांत त्यांनीं त्या वेळच्या धान्याचे नीरख दिले आहेत, यावरून त्यांचें निरीक्षण किती बारीक होतें व त्यांची ऐतिहासिक माहिती देण्याची तऱ्हा किती अपूर्व होती हें चांगलें लक्षांत येतें.—

" सुधि ह्मणाति निरवधि काळ त्या मधीं दीड पायली । कधीं ऐकिलीं चिपटीं कधीं निपटीं कोळवीं चोळवीं कधिं पाहिलीं ॥ जुना जिन्नस वरी उणा वाट कुठें कुणांत पत राहिली । मणास रुपये तेरा तेलाला बारा तुपा शपथ वाहिली ॥ गुळ असो तोळाभर आहे कीं मूळ मिठाचीडली । खळ लवंगा पैशाच्या सवंगा मिरची पांच दीधली ॥ हुजूर वाणी रुजू तराजू खजुरी ती एकली । खिजूर घेती पैसा देतिल हो कैसा माखली नच जिभली ॥ गहूं ह्मणति जे बहु सवंग तें नऊ चिपटीं जाहलीं । मऊ नवे जे दाणे बेदाणे झाले अशि दशा साहिली ॥ मका रांड ही आकां इला परि शिका कोठडी केली । नको द्राड एरंडी हे रंडी आठ चिपटीं कधीं ऐकिलीं ॥ दुकाळ त्यामधीं बकाल मंडळी ठकापरिस ठक भली । दुकान घालुनि बसती वरि निर्मळ दिसती घातुकता वाइली ॥ नितळ सोनियां पितळ ह्मणाति निजपितळ पुतळी आटली । कुतळ बुडविले सारेही बारे वेळाचे सराफा लादिली ॥ सार हिऱ्याला गार ह्मणती सोनार देत पावली । चार शेर तांब्याला कां भ्याला ह्मणे कांसार देत आधिली ॥ पुरे काळ हा नुरे योग्यता विरे निघुनी चालली । अहो शालुच्या फरदा चवलीचा खुर्दा काय गोष्ट चांगली ॥चाल०॥ हें राहो भाजींत बागवान जोडका पैशाचा एकचि मुळा एकचि वोडका ॥ पैशास मक्याचा कंद एक मोडका । हा कांदा दों पैशांस

एक बोडका ॥ जळणास रुपया एक लहान खोडका । घोड्यास शिपाई काय करील बोडका ॥ काळानें देश या परी केला रोडका । मग हत्यार राज उपाय काय थोडका ॥ खाऊनी नाबद म्हणो मये गोड कां ॥ चाल० ॥ अजातरिपु हे मजा इतःपर मजा दृष्टि शिरकली । दुजी आस न कविरायाची कृति येथूनि उरकली ॥ उगाभ्रमांसे वाउगा कशाला युगांत खळ हा कलि । कलि मातला सारा धन दारा इच्छि राज्यास ही हाकली ॥ धृ० ॥ १ ॥"

एका रसिक पांथानें इच्छितस्थळीं लवकर जाऊन पोहोंचण्याच्या हेतूनें घोड्याला टांच देऊन त्याला भरधांव सोडिलें; परंतु मार्गावरील सृष्टचमत्कार पाहण्यांत त्याच्या मनोवृत्ति अगदीं तल्लिन झाल्या व त्यामुळें त्याच घोड्याचा लगाम खेंचून धरण्याचें भान राहिलें नाहीं. पुढें निघून गेल्यावर त्याची चूक त्याच्या लक्षांत आली व त्याच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली; तशीच याठिकाणीं आमचीही व्यवस्था झाली आहे. कविरायांच्या चरित्रारण्यांतून आम्ही परिभ्रमण करीत असतां त्यांनीं तयार केलेली लावणीरूप पुष्पवाटिका आमच्या दृष्टीस पडली व तिच्यांतील नैसर्गिक शोभा पाहण्यांत आम्ही इतके दंग होऊन गेलों कीं लेखणी रूप घोडीचा लगाम आकळून धरण्याचें अगदींच विसरलों व मुक्काम करण्याचें ठिकाण मागेंच राहून गेलें, तरी आपण आतां कविरायांनीं लावलेल्या या छेका आपन्हुतिरूप लताकुंजांत विश्रांति घेऊं.

'राधा सखि संवादीं छेकापन्हुति हे आयका । रसिकहो काय चतुर बायका ॥ ध्रु० ॥ अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी । काय हा धीट म्हणावा तरी ॥ तो नंदाचा मूल कायगे सांग कम्हय्या हरी ? । नव्हे गे मारुत मेघोदरीं ॥ सासु-सासरा पति यां देखत अधरामृत माधुरी । घेतसे काय वदावी परी ॥ तो नंदाचा मूल० ॥ नव्हे गे मधुप व्रज हा करी । पट विघटित कुचतटही वसंतीं हळुंच येउनी उरीं । शीतल स्पर्शें सुगंधित करी ॥ तो नंदाचा मू० ॥ नव्हे गे मलयज करी चातुरी । सुवर्ण पाहुनि तनुवरि वंचक रात्रीं शिरतो घरीं । टाकितो हस्त तसा तनुवरी ॥ तो नंदाचा मू० ॥ नव्हे हा दस्यु समज अंतरीं । सुंदर रतिजोगता पतिही मिळ्यां

सुभगा खरी । दूजीला असा मिळेल काय तरी ॥ तो नंदाचा मु० ॥ नव्हेगे रतिला मन्मथ वरी ॥ चाल० ॥ गुणवंत कुचावरी लोळे अति शोभला । तो कृष्ण काय नव्हे हार कळेना तुला । बाई अंगमर्दनीं अति सुखकर वाटला । तो कृष्ण काय ? नव्हे कर दूतीचा भला । मज शीतळ करितो श्रमि होउनियां भला । तो कृष्ण काय ? नव्हे व्यजन सु वंशांनला ॥ चाल पहि० ॥ यापरि निजसंतोषें वर्णी पुसतां यदुनायका । लोपवी मुरलीच्या गायका ॥ राधासखि० ॥ १ ॥ कंठीं लपटुनि सदा असावी सुभगा गुण-शालिनी । वाटे पुष्पवती शोभिनी ॥ वृषभानूची सुता काय ती राधा लकुचस्तनी । नव्हे रे माळ आठवली मनीं ॥ अधरचुंबिनी वंशसंभवा लालसमधुरध्वनी । आवडते मज फारच हृदयांतुनी ॥ वृषभानूची सुता० ॥ नव्हे रे मुरली जनमोहिनी । विपरीता ही तनुवरि घेतां सुहृशा सुखदायिनी । ब्रह्मनशी शामा गुणशालिनी ॥ वृषभानूची सुता० ॥ नव्हे रे मत्कंबलभोगिनी । सरला ती सद्वंशगौरा अतिशय संयोगिनी । येतसे करीं धरुनि जे वनीं ॥ वृषभानूची सुता० ॥ नव्हे रे यष्टी सहचारिणी । नखक्षतानें मृदुकणंतीं नव नव गुणरागिणी । धरावी वाटे कवटाळुनी ॥ वृषभानूची सुता० ॥ नव्हे रे वीणा मृदुभाषिणी ॥ चाल ॥ वांकडी दिसे परि बहिरंतर निर्मळा । ती काय नव्हे राधिका ? इंदुची कळा । जी चांगट ( किंवा नीचा घट बसली ) धरुनी रसेच्या तळा । ती काय राधिका ? नव्हे भुजंगा बळा । किति मंजु वसंतीं रसाळ जीचा गळा । ती काय राधिका ? नव्हे गड्या कोकिला ॥ चाल पहिली ॥ यापरि हरि राधेला वर्णुन पुसतां क्षणि लोपवी । चतुर हा यदुकुलपंकज रवी । श्रीकृष्णाची सख्यासवें ही छेकापन्हुति नवी । करि हा कविरायाहुनि कवि ॥ राधासखि० ॥ २ ॥

---



# महीपती.

सेवाधर्मासारखें कठिण व्रत दुसरें कोणतेंच नाहीं. सेवाकर्मरत मनुष्याला आपल्या सर्व सद्गुणांवर पाणी सोडावें लागतें. त्यांतल्यात्यांत धनी जर समंजस असला तर सेवकांचें जिणें कांहीं तरी सुखांत जातें, परंतु तोच धनी जर अविचारी, मूर्ख व कुटिल असला तर बिचाऱ्या त्या सेवकाचे हाल कुत्रासुद्धां खात नाहीं. तरी पण सेवक स्वाभिमानी असल्यास, त्याचा, धन्याकडे ह्मणजे अगदींच मान नसतो असें नाहीं. परंतु असे सेवाधर्मांत राहून स्वाभिमानानें वागणारे सेवक फार विरळा. स्वार्थाकरितां मिंधे राहून हांजी हांजी करणारेच अती. सांप्रत निदान आमच्या आर्यावर्तांत तरी बहुतेक जनसमुदाय सेवकांच्याच वर्गांत मोडणारा आहे आणि तोही पुन: हांजी हांजी करणारा ह्मणजे स्वाभिमानशून्य. अभिमानशून्य मनुष्याचे हातून कोणतेंही महत्कृत्य होत नाहीं. ' ज्या आर्यांनीं आपल्या अतुल पराक्रमानें व बुद्धिवैभवानें सर्व पृथ्वीवर आपली कीर्ति अमर करून सोडिली, व इतर परकीयांशीं झगडून आपलें स्वत्व व वैभव कायम ठेविलें त्याच नरशार्दूल आर्यवीरांचे वंशज आह्मीं आज अभिमानशून्य होऊन गेल्यामुळें परकीयांच्या अमलाखालीं निःशंक लोळत पडलों आहों, प्रत्येक बाबतींत त्यांच्याच ओंजळीनें पाणी पीत आहों व एवढ्याशा भाकरीच्या तुकड्याकरितां सुद्धां त्यांच्यापुढें लांगूलचालन करून तोंडें वेंगाडीत आहों. या सर्वांचें कारण आमची अभिमानशून्यता नव्हे तर काय ?

' आजमितीस इंग्रजलोक जे इतक्या रानटी स्थितीपासून सुधारणेच्या शिखरावर जाऊन पोहोंचले आहेत व पृथ्वींतील सर्व राष्ट्रांमध्यें सर्व गोष्टींनीं पुढें गेले आहेत त्याचें कारण त्यांच्या आंगीं झळकणारी स्वाभिमानाची अपूर्व ज्योत होय ! आमच्यांतही ही ज्योत नाहीं असें नाहीं, पण ती पारतंत्र्याच्या प्रभंजनानें अगदीं विझाली आहे. तिच्यावर सूक्ष्मविचाररूपी तेलाचे बिंदू सोडून ती प्रदीप्त केली पाहिजे. असो. त्यांच्यामधलें व आह्मांमधील अंतर इतकेंचकीं, त्यांना एवढासा देखील अपमान सहन होत नाहीं व आह्मीं त्याबद्दल कांहींच मानीत नाहीं ही केवढ्या शरमेची गोष्ट आहे बरें ! ' हेंच जर आह्मीं त्या नीच सेवेवर लाथ मारून दूर झालों तर आह्मीं उपाशी मरूं काय ? खात्रीनें नाहीं. ज्या दयाघन परमेश्वरानें आह्मांला निर्माण केलें आहे तो आमच्या निर्वाहाची कांहींच सोय लावणार नाहीं

काय ? अर्थात् हावीलच. पण इतके सुविचार आमच्या मनांत कोठून यावयाला. इसापनीतींतील हरक्युलिसाचे गोष्टीप्रमाणें 'आह्मी आपल्या पायांवर उभे राहवयाला जर शिकलों तर परमेश्वर हरघडी आमच्या साह्याला धावून येईल. येवढ्याकरितां आह्मी हा हांजीखोरपणा झुगारून देऊन स्वत्वाला ओळखावयास शिकलें पाहिजे. तात्पर्य प्रत्येक मनुष्यानें स्वाभिमान धरल्यास आमच्या राष्ट्राचा लवकरच अभ्युदय होऊन आह्मांला प्रत्येक बाबतींत परकीयांचे तोंडाकडे पहाण्याचा फारसा प्रसंग येणार नाहीं. प्रस्तुत चरित्रनायकाचा स्वाभिमानाशीं किती दाट परिचय होता व त्यामुळें त्याचा कीर्तिदुंदुभी आजतागाईत कसा सारखा दणदणत आहे, हें पुढील वृत्त वाचलें असतां लक्ष्यांत येईल.

ह्या कवीचा जन्म इ. स. १७१५ ह्या वर्षीं अहमदनगरापासून अठरा कोशांवर-राहुरी तालुक्यांत ताहाराबाद ह्मणून एक गांव आहे तेथें झाला. ह्याच्या वडिलांचें नांव दादोपंत कांबळे. ह्यांच्याकडे ताहाराबादचें कुळकर्ण असे. ते मोठे संभावीत आणि भाविक होते. ते ऋग्वेदी वासिष्ठगोत्री ब्राह्मण. त्यांच्या पत्नीचें नांव गंगाबाई. तीही मोठी साध्वी असून पराकाष्टेची पतिपरायण होती. दादोपंतांस आधीं सगळ्या मुली होऊन, साठीच्या सुमारास एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यांनीं ' महीपती ' असें ठेविलें. तोच प्रस्तुत चरित्राचा नायक होय. महीपती रूपानें सुंदर असून स्वभावानें अगदीं आपल्या वडिलांसारखा होता. त्याच्या बाळपणाबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. तरी पण तो परम तेजस्वी, करारी व मानी असा होता. तो सोळा सत्रा वर्षांचा होतांच कुळकर्ण्याचें काम करूं लागला. त्यावेळीं नुकताच मुसलमानी अंमल नाहींसा होऊन, मराठ्यांचा अंमल बसला होता, आणि श्रीछत्रपती शाहूमहाराज गादीवर होते.

एकेदिवशीं महीपती स्नानसंध्या करीत बसला असतां, त्यास बोलावण्याकरितां सरकारी कचेरींतून एक मुसलमान शिपाई आला. त्याला त्यांनीं सांगितलें कीं, मी पूजा झाली कीं लागलींच येतों. आधींच तो मुसलमान, त्यांत तो सरकारी पट्ट्यांनीं भूषित झालेला मग त्याच्या उर्मटपणास काय पारावार असणार ! हें ऐकून तो शिपाई त्यांस कांहीं अपशब्द बोलला. महीपती जात्याच तेजस्वी व मानी असल्यामुळें त्यास अतिशयित चीड आली व त्या झटक्यासरशी कचेरींत जाऊन त्यानें जेमतेम त्या दिवसाचें कचेरींतील काम आटोपलें. घरीं आल्यावर त्यानें कानांवरची लेखणी काढून देवापुढें ठेविली, आणि इतःपर आपण गांवकीचें काम करणार नाहीं व

आपल्या पुढच्या सात पिढ्यांनींही त्या कामास हात लाऊं नये म्हणून शपथ घेतली. सुमारें दोनशें वर्षांमागचे ब्राह्मण आणि सध्यांचे ब्राह्मण ह्यांच्या तेजस्वितेमधील हें अंतर ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. आलीकडे आम्हा ब्रह्मवृंदाची तेजस्विता कोणत्या बाजूला वळली आहे, याचें वर थोडकेंसें दिग्दर्शन केलेंच आहे. सध्या कुळकर्ण्याचें काम किती अपमानास्पद झालें आहे याचा अनुभव कुळकर्ण्यांशिवाय इतरांना येणें दुरापास्त आहे. येथळ्याशा सात रुपयांच्या शिपुर्ड्यानेंसुद्धां बिचाऱ्याला दडपीत असावें. जो जो सरकारी अंमलदार येईल तो तो कुळकर्ण्याचा नवराच! बिचाऱ्यानें त्यांची सर्व सोय लावावी. त्यांना जेवावयाला आपल्या घरीं न्यावें. हाडूगडू करावे. त्यांच्या घोड्यांना चंदी-वैरण द्यावी. असे एकना दोन. हजारोप्रकारचे उपसर्ग बिचाऱ्याला प्रतिदिनीं लागत असतात इतकें करून त्याला मुशाहिरा तरी मुबलक मिळतो काय? छे! त्याच्या नांवानेंही पांचजन्यच! बरें असो.

या सुमारास महीपतीचे वडील वृद्धापकाळामुळें अगदीं थकलेच होते. तेव्हां त्यांच्या पंढरपूरच्या वाऱ्या महीपती करूं लागला. तो नुसता वारकरी साधु होऊनच राहिला नाहीं तर तो ग्रंथकारही झाला. त्याचें कारण असें सांगतात कीं, 'एकेरात्रीं तुकाराममहाराजांनीं स्वप्नांत येऊन त्यास असें ह्मटलें कीं, नामदेवांचा शतकोटी अभंगांचा संकल्प माझ्या मुखें पूर्ण झाला आहे, तसें संतचरित्रांचें वर्णन तूं करावें.' असें बोलून मस्तकावर हात ठेवून ते गुप्त झाले. तीच महीपतीस ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ति झाली.

सदरहु गोष्ट केवळ दंतकथांतच जमा धरण्यासारखी नसून तिजमध्यें कांच तथ्यांश आहे, हें महीपतीच्याच खालील ओंवीवरून सिद्ध होतें. संतलीलामृताचे प्रथमाध्यायांत सांप्रदायाप्रमाणें गुरुवंदन करीत असतां तो ह्मणतो.—

'ज्यानें मस्तकिं ठेविला अभयकर। दुस्तर भवाब्धि केला पार॥
तो तुकाराम सद्गुरु वैष्णववीर। ग्रंथारंभीं नमस्कार तयासीं॥ १॥
मृत्युलोकीं दाविली अघटित करणी। देहासमवेत गेले वैकुंठभुवनीं॥
अद्यापि शुद्धभाव देखोनी। देती स्वप्नीं उपदेश॥ २॥'

'ह्या दोन गोष्टींच्या योगानें महीपतीच्या वृत्तींत जो फेरफार झाला, त्याचा विचार केला ह्मणजे असें दिसतें कीं, ज्यांवर परमेश्वराची कृपा असते, त्यांस दुष्टांचीं दुर्वचनें आणि सत्पुरुषांचे साक्षात्कार ह्या दोहींपासून लाभच

होतात; हानी कशानेंच होत नाहीं. आणखी साधु जे आहेत, ते दुष्टांस देखील चांगले ह्मणत असतात—त्यांच्या अल्प गुणांवरून त्यांस वाखाणीत असतात—ह्यांतलें बीज तरी हेंच असावें.' महात्मा धर्मराज दुर्योधनाला सर्वजण 'दुर्योधन' ह्मणत असतांही स्वतः 'सुयोधन' ह्मणत असे, ही गोष्ट सर्वविश्रुतच आहे. खरे साधु जे आहेत त्यांना द्वेष ह्मणून कसला तो माहीतच नसतो. उत्तमांना मात्र धारण करावें आणि अधमांना टाकून द्यावें, हें पृथ्वीला समजत नाहीं, किंवा राजाच्या देहाला मात्र चालवावें आणि रंकादिकांना वर्ज्य करावेत, असें कृपाळू प्राण ज्याप्रमाणें कधीं ह्मणत नाहीं अथवा गायीची तहान भागवावी आणि वाघाला विष होऊन मारून टाकावें असें करण्याचें ज्याप्रमाणें उदकाला कधीं माहीत नाहीं त्याच-प्रमाणें सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं त्याची समदृष्टि व समबुद्धि असते असो.

महीपती अत्युत्तम भगवद्भक्त झाला; त्याला सर्व चराचर विश्व ब्रह्ममय दिसूं लागलें. त्याच्याजवळ माझें आणि तुझें हा भेदभावच राहिला नाहीं. त्याची वृत्ति 'वसुधैव कुटुंबकम्' अशी झाली; ह्मणजे तो विश्वाकडे आपलें कुटुंब याच दृष्टीनें पाहूं लागला. एकदां त्यावेळीं मोठा दुष्काळ पडला. त्यास 'करंड्याचें साल' असें ह्मणत. त्या दुष्काळांत लोक उपाशी मरूं लागले, ह्मणून महीपतीनें आपल्या घरावर तुळसीपत्र ठेवून तें गरीब लोकांकडून लुटविलें. हें वर्तमान गांवांतील जहागीदारास समजलें; तेव्हां त्यानें पुष्कळ गाड्या भरून साहित्य पाठविलें, परंतु महीपतीनें तें सर्व नाकारलें आणि आपला चरितार्थ भिक्षेवर चालविला. ह्याप्रमाणें प्रति तीन वर्षांनीं आपलें घर लुटविण्याचा क्रम त्यानीं ठेविला. पुढें कांहीं लोकांनीं सांगितलें कीं, 'आपण घर लुटवितां खरें परंतु आपले पुढें असा क्रम चालणें कठीण आहे. ह्याकरितां जें सतत चालेल तें करावें.' तेव्हां महीपतीनें आषाढ वद्य दशमीपासून अमावास्येपर्यंत प्रतिवर्षीं श्रीपांडुरंगाचा उत्साह करण्याची योजना केली. तो उत्साह अद्यापपर्यंत चालू आहे असें ऐकतों.

आपल्या इतर पूर्वकालीन साधुकवींप्रमाणेंच महीपतीनेंही आपले सर्व ग्रंथ केवळ भक्तिभावासाठीं लिहिले; ह्मणजे आपलें तनमन परमेश्वराचेठायीं लागावें, ह्याकरितांच त्यानें हा ग्रंथरचनेचा अकटोविकट प्रयत्न केला. त्यांत तो इतका मग्न असे कीं, आपण जें कांहीं लिहीत आहों, तें देवाच्या प्रेरणेनें लिहीत आहों, अशी त्याची दृढ समजूत असे. भक्तविजयाच्या शेवटच्या अध्यायांत त्यानें ह्मटलें आहे.—

'जैशी आज्ञा केली रुक्मिणीवरें । तितुकींच ग्रंथीं लिहिलीं अक्षरें
जैसा वाजविणार फुंकितो वारें । तैशीं वाजंत्रें वाजती ॥ १ ॥
क्षेत्रांत बीज पेरिलें जाण । अंकूर येणें जीवनाधीन ।
कीं बाहुल्यांचें नाचणें जाण । कळसूत्राधीन असे ॥ २ ॥'

त्याचप्रमाणें श्रीसंतलीलामृतांत तो ह्मणतो.—

'तें हें संतचरित्रसार । प्रेमरसाचें भांडार ॥
जैशी आज्ञा केली रुक्मिणीवरें । तितुकींच अक्षरें जोडिलीं ॥१।
मी तरी तृणाचें बुझावणें । निमित्तमात्र असें जाण ।।
जो विश्वव्यापक जनार्दन । तो प्रभंजनें हालविला ॥ २ ॥
सद्गुरु तुकाराम समर्थ । अंतरसाक्ष चैतन्यनाथ ॥
तेणें होवोनि हृदयस्थ । आठव मातें दीधला ॥ ३ ॥
अंतरसाक्ष जाणती देव । हृदयस्थ बैसोनि देती ठाव ॥
महीपती हें निमित्त नांव । सभाग्य वैष्णव जाणती ॥ ४ ॥

ग्रंथ चांगला निपजण्यास साहित्य काय काय लागतें, हें महीपतीस चांगलें ठावूक होतें; आणि तें साहित्य आपणाजवळ नाहीं, असें त्यास नेहमीं वाटत असे. भक्तविजयाच्या आरंभीं तो ह्मणतो.—

'मंदमती मी अज्ञान । नाहीं केलें काव्यपठन ॥
नाहीं पाहिलें ग्रंथपुराण । गीर्वाणभाषा नेणें मी ॥ १ ॥
नेणें मी चातुर्य व्युत्पत्ति । नव्हे बहुश्रुत अध्यात्मग्रंथीं ॥
येणें संस्कृतवाणी निश्चितीं । श्रीरुक्मिणीपति जाणतसे ॥ २ ॥'

संतलीलामृताचे आरंभींही त्यानें असेच अत्यंत विनयसंपन्न उद्गार काढिले आहेत.

महीपतीच्या विद्याध्ययनासंबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं; तरी त्याच्या ग्रंथरचनेवरून एवढें अगदीं स्पष्ट दिसतें कीं, त्याचा विद्याभ्यास चांगल्यापैकीं झालेला असावा; आणि त्याचें वाचनही दांडगें झालेलें असावें. शिवाय भक्तविजय, संतलीलामृतादि ग्रंथ साधुचरित्रात्मक आहेत. त्यांत वर्णिलेल्या साधूंचीं चरित्रें पूर्वीं कोठें लिहिलेलीं नव्हतीं, तीं दंतकथांत होतीं. त्यांविषयीं शोध करून, त्यांचें साहित्य मिळवून, तीं त्यांनीं चांगल्याप्रकारें रचिलीं आहेत. 'ह्यावरून असें दिसतें कीं, इतिहासाचीं साधनें मिळविण्याचें

सामर्थ्य जें सांप्रतकाळीं इतकें वर्णनीय झालें आहे, तें महीपतीच्या ठायीं फार चांगलें होतें. संस्कृतादि भाषांतले ग्रंथ पुढें ठेवून त्यांचें भाषांतर करण्यापेक्षां अशाप्रकारें साहित्य मिळवून त्याची यथोचित योजना करणें विशेष बुद्धिमत्तेचें काम आहे हें उघडच आहे.'

त्यानें एकंदर बारा ग्रंथ लिहिले. भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय, संतलीलामृत, अनंतव्रत, दत्तात्रेयजन्म, कथासारामृत, तुळशीमाहात्म्य, पंढरीमाहात्म्य, गणेशपुराण, हरितालिकाव्रत आणि ऋषिपंचमीव्रत. श्रीधराप्रमाणेंच महीपतीनेंही आपल्या कांहीं ग्रंथांच्या शेवटीं स्थलाचा व कालाचा निर्देश केला आहे. संतलीलामृताचे शेवटीं त्यांनीं ह्मटलें आहे.—

'शके सोळाशें एकूणऐंशीं । सर्वजित नाम संवत्सरासी ॥
फाल्गून शुद्ध चतुर्थीसी । ग्रंथ सिद्धीसी पावला ॥ १ ॥'

ह्याप्रमाणेंच भक्तविजयाचे शेवटींही त्यानें ग्रंथ समाप्तीचा शक दिला आहे.—

'शके सोळाशें चौऱ्यायशीं । चित्रभानु नाम संवत्सरासी ॥
वैशाख वद्य द्वादशीशीं । ग्रंथ सिद्धीस पावविला ॥ १ ॥
प्रवरेपासोनि दक्षिणेस । ताहराबाद गांव पांच कोस ॥
भक्तविजय अति सुरस । झाला असे त्या ठायीं ॥ २ ॥'

पूर्वी नामाजी आणि उद्धवचिद्धन यांनीं ग्वालेरी ह्मणजे हिंदुस्थानी भाषेंत भगवद्भक्तांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत; त्यांचा आधार घेऊन महीपतीनें वरील भक्तविजयादि ग्रंथांची रचना केली. त्याची कविता सरळ आणि सुगम आहे. दुसरा याच्या ग्रंथांत जो मोठा गुण आढळतो तो हा कीं, कोणतीही एकादि गोष्ट श्रोत्यांच्या मनांत ठसविण्यासाठीं दृष्टांताची जशी काय वृष्टि करावयाची. तो गुण बहुतेक ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, श्रीधरांच्या इतका त्याच्याठायीं होता असें दिसतें. ह्याचीं प्रमाणें त्याच्या ग्रंथांत जागोजाग आढळतात. प्रसंगोपात व्यवहारनीति सांगण्याचा प्रसंग आल्यास तो न टळूं देण्याविषयीं महीपती फार जपत असे.

महीपती शालिवाहान शकाच्या श्रावण कृष्ण द्वादशीस ह्मणजे इ. स. १७९० त समाधिस्थ झाला. त्यावेळीं त्याचें वय पाउणशें वर्षांचें होतें. त्यानें ताहाराबाद येथें श्रीपांडुरंगाचें देवालय अयाचित वृत्तीनें बांधून श्रीविठ्ठलाची स्वयंभू वाळुकेची मूर्ति स्थापिलेली आहे. त्याचें कुळदैवत 'श्रीविठ्ठलच' असें त्याबद्दल तो भक्तविजयांत असा उल्लेख करितो.—

'आमचें कुळींचें दैवत । उभयपक्षीं श्रीरुक्मिणीकांत ॥
तयास नमितां देवां समस्त । तृप्त होती निर्धारें ॥ १ ॥'

त्याची मतें पूर्ण अद्वैती होतीं. तो हरि, हर, गणेश, देवी असा भेदभाव पाळीत नसे. त्यानें आपल्या ग्रंथारंभीं गणेशरूपानेंच श्रीविठ्ठला स्मरण केलें आहे.—

'जयजयाजी भीमातीरविहारा । भक्तवत्सला कृपासागरा ॥
व्यापूनियां चराचरा । अससी निराळा सर्वातीत ॥ १ ॥
गणेशसरस्वतीरूप । तूंचि नटलासी अनेक ॥
म्हणउनी सारजा विनायक । ग्रंथारंभीं नमियेला ॥ २ ॥'

भक्तविजय.

'जयजयाजी पुराणपुरुषा । अलक्ष निरंजना अविनाशा ॥
विश्वव्यापका सर्वेशा । पंढरी अधेशा पांडुरंगा ॥ १ ॥
तूं आदिमायेचा निजवर । निगमा शास्त्रांसीं अगोचर ॥
अचळ निश्चळ निर्विकार । नेणवे पार श्रुतिशास्त्रां ॥ २ ॥
तूंचि झालासी गजवदन । चौदाविद्यांचें आदिकारण ॥
यालागीं मंगलारंभीं नमन । निज प्रीतीनें तुज देवा ॥ ३ ॥'

संतलीलामृत.

वरील उताऱ्यांवरून हें स्पष्ट आहे कीं, तो पूर्ण अद्वैतवादी होता; त्याचें आपल्या मातापितरांवर अवर्णनीय प्रेम असे. तो त्यांना सकल तीर्थांहूनही पूज्य मानीत असे.

'आतां नमूं मातापिता । जे सकल तीर्थांसी वरिष्ठता ॥
ज्याचेनि नरदेह तत्वतां । लाधला अवचितां निजभाग्यें ॥ १ ॥'

भक्तविजय.

महीपती मोठा वैराग्यशील साधु होता हें मागें लिहिलेल्या एक दोन गोष्टींवरून लक्ष्यात येईलच. त्याला 'विठ्ठल' नांवाचा एक मुलगा होता. तोही आपल्या बापाप्रमाणेंच मोठा ईश्वरभक्त होता. तो आपल्या नांवापुढें 'गोसावी' असें पद जोडीत असे; यावरून तो कीर्तनकार असावा असें वाटतें. मोरोपंतांनीं अनेक साधुसंतांवर सुंदर आर्या केल्या, पण आपल्या जगत्प्रसिद्ध पित्यावर आर्या केल्या नाहींत हें बरें न वाटून विठोबा गोसावी

ताहराबादकर यांनीं पंतांस पत्र लिहून महीपतीबोवांवर कांहीं आर्या करण्याची विनंति केली. पंतांनींही या आपल्या समकालीन कवीवर खरा अभिप्राय देऊन त्याची योग्य स्तुति केली; ती अशीः—

'महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेंवि गंगेतें ।
विषयांत रंगलें जें जनमानस, सद्यशींच रंगे तें ॥ १ ॥
ज्ञानोबाची जैशी, एकोबाची सुधा जशी वाणी ।
कीं मुक्तेश्वर कविची, महिपतिची सेविती तशी प्राणी ॥ २ ॥

'आमच्या महाराष्ट्रकवींची परंपरा चांगदेवांपासून सुरू झाली ती अद्याप चालली आहे; आणि ती तशीच पुढेंही चालावयाची आहे. पण तींत जुन्या पद्धतीप्रमाणें पौराणिक कथांचे ग्रंथ लिहिणारे जे कवि झाले त्यांत महीपती ~~बहुतेक~~ शेवटचाच ह्मटला तरी चालेल. तरी कालाच्या अर्वाचीनत्वाच्या मानानें त्याच्या काव्यरचनेमध्यें जो फरक पडावयाला हवा होता तो मुळींच पडला नाहीं हा मोठा चमत्कार आहे. त्याचे ग्रंथ अगदीं मुक्तेश्वर-श्रीधरांच्या ग्रंथांशेजारीं बसविण्याजोगे आहेत हें वरील व पुढील उताऱ्यांवरून वाचकांचे लक्ष्यांत येईल.

उपलब्ध असलेली बहुतेक माहिती वर दिली आहे; याहून या सत्पुरुषाविषयीं जास्ती माहिती मिळत नाहीं हें देशाचें व त्याबरोबरच पर्यायानें आपलेंही दुर्भाग्यच होय ! असो. एकवार मयूराच्याच केकारवानें महीपतीचे स्वर्गीय दिव्य आत्म्यास प्रेमपूरःसर वंदन करून हें त्याचें चरित्र आटोपतों.—

त्या महिपतितें पाहुनि, ऐकुनि, सच्चित्त कां न लोभावें ? ।
शोभावें यश ज्याचें चिर, नमिला विष्णुदास तो भावें ॥ १ ॥'

---

## महीपतीच्या ग्रंथांतील वेंचे.

' द्रव्य नसतां आपुले पदरीं । बंधु ह्मणती आमुचा वैरी ॥
पिशुन हांसती दुराचारी । ऐसी परी मायेची ॥ १ ॥
देखोनि निजपुत्र नयनीं । पिता कंटाळे तये क्षणीं ॥
ह्मणे आमुचे पोटीं येऊनी । अपकीर्ति तुवां केली ॥ २ ॥
शेजारी लोक होती कष्टी । ह्मणती उगाच पडतो आमुचे दृष्टी ॥
कन्या भगिनीच्या जातां भेटी । लज्जित पोटीं त्या होती ॥ ३ ॥

दुर्बळ भ्रतार असतां जाण । कांता नेदीच आलिंगन ॥
पुत्र ह्मणती आह्मांसि ऋण । करूनियां ठेविलें ॥ ४ ॥
पुरुष झालिया द्रव्यहीन । त्यासी न पुसती सोयरे पिशुन ॥
जेवीं वृक्षाचीं पत्रें गेलिया झडोन । तेथें विलासी जन न रमती ॥५॥
कीं रणीं पडतांचि नृपती । देहलोभी रण टाकोनि पळती ॥
तेंवि दरिद्र येतां पुरुषाप्रती । पिशून करिती अपमान ॥ ६ ॥ '

भक्तविजय.

निर्धन मनुष्याचें कवीनें हें वर रेखाटलेलें चित्र किती हुबेहुब वठलें आहे! विपद्ग्रस्त मनुष्याची स्थिति पराकाष्टेची वाईट असते. रिकामी पिशवी ज्याप्रमाणें ताठ राहूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें दारिद्री मनुष्याला लोकांमध्यें तोंड दाखविण्याला जागा रहात नाहीं. लोकांमध्येंच काय पण घरच्या स्वतःच्या माणसांतही त्याचा किती बोज असतो, हें कवीनें वरील ओव्यांत उत्तमप्रकारें दर्शविलें आहे.

' ऐशी आशा महावैरीण । मुमुक्षु साधक ठकविले येण ॥
श्रीहरि कृपा करितां जाण । तरीच मन स्वस्थ राहे ॥ १ ॥
सेवितां प्राण्यास वाटतें सुख । परी परिणामीं होय दुःख ॥
विषय सेवितां थकले लोक । अंतीं नरक प्राप्त तयासी ॥ २ ॥
शब्दविषय मृगांकारणें । परम आवडे जिवाहून ॥
नादीं लुब्ध होतांचि जाण । पारधी विंधोनि मारिती ॥ ३ ॥
स्पर्शविषय तो स्त्रीसंग । तेणेंचि नाडिले अवघे मातंग ॥
रूपविषयीं लाधला पतंग । जळालें अंग तयाचें ॥ ४ ॥
रसविषय मत्स्याकारणें । आमिष गिळितां सुखावे मन ॥
गळ आसुडितां हिसकानें । अचुक मरण चुकेना ॥ ५ ॥
गंधविषय भ्रमर सेविती । कमळमकरंदीं लुब्ध होती ॥
अस्तमानासी जातां गभस्ती । गुंतती त्यामाजीं ॥ ६ ॥
एक एक आवड एकाचे ठायीं । त्यांची गति ऐशीच पाहीं ॥
आणि पंचविषय नरदेहीं । परिणाम नाहीं उत्तम ॥ ७ ॥
परि रसनाविषय अवघ्यांत दुष्ट । याचोनि इंद्रियें होतात पुष्ट ॥
यालागीं जे कां सज्ञान श्रेष्ठ । रसना स्पष्ट जिंकावी ॥ ८ ॥

वानसाक्षय नव्हेचि ज्यासी । गोड अन्न पाहिजे खावयासी ॥
यास्तव जाहले संन्यासी । वृथा गुरुसी नाडिलें ॥ ९ ॥
मरणसमयीं इंद्रियें क्षीण । तिळमात्र न खाववे अन्न ॥
परि वासना ह्मणे मी पदार्थ सेवीन । तरी जन्म घेणें चुकेचिना १०
सहज समयीं मिळेल जैसें । क्षुधाहरणार्थ सेविजे तैसें ॥
तरीच निर्विघ्न मुमुक्षुस । वासनानाश सहजची ॥ ११ ॥'

संतविजय.

आशेसारिखें जबरदस्त दुःख दुसरें कोणतें नाहीं; व निराशेसारखें परमसुख नाहीं प्रत्येक वस्तूला शेवट ह्मणून आहे, परंतु आशेला मात्र नाहीं. ही बारा महिने व अठराकाळ सारखीच तरुण असते. तिला कधीं वृद्धापकाळ नाहीं व मरण नाहीं. मरावयास टेंकलेल्या मनुष्यालासुद्धां मी अजून जगेन अशी आशा असतेच. वरील ओंव्यांत कवीनें 'आशेचें' केलेलें वर्णन फारच बहारदार आहे. आचार्यांचेंही असेंच मत आहे. 'वृद्धो याति गृहित्वा दन्डं तदपि न मुंचत्याशापिंडम्,' ही ओळ बहुतेकांच्या कानावरून गेलीच असेल!

'जवळ द्रव्य असतां पाहे । एकट्यानें निद्रा करूं नये ॥
द्रव्यासी महाभय । सावध असावें सर्वदां ॥ १ ॥
द्रव्य आशा धरिली जरी । सखे बंधु होती वैरी ॥
द्रव्य तारी द्रव्य मारी । दोन्हींपरी असती कीं ॥ २ ॥'

भक्तविजय.

पहिल्या ओंवींत व्यवहार कसा ओतप्रोत भरला आहे! द्रव्य जवळ असून निष्काळजीपणानें वागलें असतां कसे दंगेधोपे होतात याचा अनुभव निदान प्रत्येकाला आहे. दुसऱ्या ओंवींत कवीनें धनाची व्याख्या अगदीं यथायोग्य केली आहे. राहणी सरळ ठेविली असतां धन तारक होतें, पण जेथें राहणींत वक्रतेचा किंवा विरोधाचा भाव उत्पन्न होतो तेथें तें मारक होतें. या गोष्टीचाही अनुभव प्रत्येकाला पदोपदीं येणारा आहे.

'आलियासि बसा न ह्मणे । तो काय घालील मिष्टान्नभोजनें ॥
कीं प्रयोगा नायकेचि करितां स्नानें । तो दक्षिणादान करील काय ?
जो तुळसीसी न घाली जीवना । तो घालील काय प्रदक्षिणा ॥
सज्जन देखोनि न करी नमना । तो सदना घेउनि न जाय ॥ २ ॥

जो वाट सांगेना पांथिकांसी । तो मंदिरीं कैसा ठाव देईल त्यासी ॥
जो स्वमुखें निंदी देवभक्तांसी । तो हरिकीर्तनीं न जाय ॥ ३ ॥'

भक्तविजय.

धनलोभी मनुष्याची ओळख पटण्याकरितां कवीचे दृष्टांत खरोखरच मनोरम आहेत. जो फुकाचें तोंडानें 'या, बसा' सुद्धां ह्मणत नाहीं तो जेवावयाला काय वाढणार! जो तुळसीला नुसतें पाणी देखील घालीत नाहीं तो तुळसीला प्रदक्षिणा घालतो असें सांगणें ह्मणजे सशाला शिंग असतें असें ह्मणण्यासारिखेंच आहे. त्याचप्रमाणें जो मनुष्य तोंडानें देवभक्तांची निंदा करितो तो मनुष्य हरिकीर्तनाला कितपत जात असेल बरें!

तुकाराम महाराजांचे अभंगांस दुष्ट मूर्खजन नावें ठेवीत असत. त्याविषयीं तो ह्मणतो.—

'सूर्यप्रकाश देखोन दृष्टी । डुडुळ उगेंच जळपती पोटीं ॥
कीं पूर्वेस चंद्र येता निकटीं । तस्करांसी नावडे ॥ १ ॥
दातयाची ऐकोनि कीर्ति । कृपण उगेंचि धिःकारिती ॥
कीं दिव्यौषधी चमकतां रातीं । रोग तळमळती चित्तांत ॥ २ ॥
पंडितांची देखोन वक्तृत्वता । अजापाळ ह्मणती बडबडकथा ॥
गंधर्व सुस्वर गायन करितां । गर्दभ भुंकतां न राहती ॥ ३ ॥
बकुळीस सुगंध येता पाहें । पंगुळ वेलीस मानेल काय ॥
सुंदर कपिला असली गाय । तरी यवन काय पूजिती ॥ ४ ॥
ब्राह्मण प्रतिमेची पूजा करिती । अविंध तयांसि फोडूं पाहती ॥
भाविक तुकयाचें कीर्तन ऐकती । विकल्पी निंदिती निजमुखें ५'

वरील उताऱ्यांत कवीनें दृष्टांतांची कशी अगदीं रेलचेल उडवून दिली आहे पहा! एवढ्यावरून सहज लक्ष्यांत येईल कीं प्रतिपाद्य विषयाशीं तादात्म्य पावणें व आपलें ह्मणणें श्रोत्यांच्या मनांत चांगलें निंबवणें हे जे कवीचे मुख्य गुण ते महिपतीच्याठायीं चांगले वसत होते.

गोपीचंदाचें आणि त्याच्या पत्नीचें जें भाषण झालें त्याचें वर्णन कवि करितो.—

'परम सुकुमार तुमची कांती । वरी चर्चिली शुभ्र विभूती ॥
नाना उपचार भोग संपत्ती । टाकोनि अनुतापी कां झाला ॥१॥

तुमचे चरण नृपनाथा । कोणती येऊनि धुईल कांता ॥
हेच बहुत वाटे चिंता । सांगा तत्वतां मजपाशीं ॥ २ ॥
गोपीचंद देत उत्तर । गंगा यमुना सरिता थोर ॥
माझे चरण निरंतर । धुतील माते सर्वथा ॥ ३ ॥
यावरी बोले कुरंगनयनी । कोण तुम्हां बैसवील भोजनीं ॥
हे चिंता अपार मनीं । मजलागोनी वाटती ॥ ४ ॥
गोपीचंद बोले प्रत्युत्तरीं । तुजऐशा माता घरोघरीं ॥
करतल भिक्षा निर्धारीं । निरंतर घालतील ॥ ५ ॥'

वरील प्रश्नोत्तरांत वैराग्याचें स्वरूप कवीनें किती प्रखर दाखविलें आहे! ज्याचे दिवस जन्मादारभ्य सुखांत, विलासांत व राजकीय डामडौलांत गेलेले त्या राजपुत्राच्या तोंडून निघालेले वरील उद्गार वाचून कोणाचें मन थक्क होणार नाहीं! हा कसला प्रभाव! संतवचनाशिवाय दुसरा कसला असणार! संतोपदेशाचें सामर्थ्यच असें अद्भुत आहे. मनांतल्या अनेक क्षुद्र विकारांना व तुच्छविषय बुद्धीला दटावण्याचें सामर्थ्य संतवचनांत आहे; चित्ताची शुद्धि करून तें ईश्वराकडे वळविण्याचें तेज संतांच्या उपदेशांत आहे; जीवाचें जीवपण मोडून त्याला ब्रह्मपदीं बसविण्याचें व स्वानंदांत नाचविण्याचें अद्भुत तेज संतवचनांत आहे; आतां अनुभवीक अशी एक लावणी देऊन हें प्रकर्ण आटोपतें घेऊं.

### कलिमहात्म्य—लावणी.

पहातां पहातां धर्म बुडाला अधर्म झाला चहूंकडे । जिकडे तिकडे कली मातला कठिण काळ हा आला पुढें ॥ धृ० ॥ दात्याचे घरिं दरिद्र आलें कृपण धनाढ्य झाले कीं । पापि चिरायु पुण्यशील ते अल्पायुषि गेले कीं । सत्कर्माचा लोप झाला दुष्कर्मि जन भुलले कीं । स्वधर्म सांडुनि अधर्म वाटे कैसें कलियुग आलें कीं । पातकाचे डोंगर दिसती पुण्यलेश ना दृष्टि पडे ॥ जि० ॥ १ ॥ ब्राह्मण अनाचारी झाले शूद्राचार करतिल कीं । आसन घालुनि प्राणायामें उघडे करीत बसतिल कीं । देवतार्चन गीता पठणहि सदा सोंवळे राहतिल कीं । हस्त जोडुनि उभे विप्र हे करितील त्यांस विनंती कीं । अस्नात हो सुस्नात पाहुनि तो विधाता मनीं रडे ॥ जिकडे तिकडे०

॥ २ ॥ शास्त्रि पुराणिक वैदिक पंडित व्याज दुहोत्रा घेतिल कीं। गृहस्थ बेरोजगारि बसले खुशाल शेती कारितिल कीं। तरवार बांधुनि शिपायी झाले हातांत भाले घेतिल कीं। कन्या विक्रय करूं लागले कैक पोटें भरतिल कीं। जारकर्मी झाल्या गर्ती वेश्या बसल्या एकीकडे ॥ जिकडे० ॥ ३ ॥ पुत्र पित्याचा द्वेष करीतो कांता पतीस मानीना। मायलेकिंचें भांडण होतें सासूवर जिव देति सुना। गुरु शिष्याच्या प्राण घेतो शिष्य गुरुकडे पाहेना। बंधुबंधुशीं वैर चाललें बहिण भावासि बोलेना। सेवक स्वामिसि मारूं पहातो स्वामी सेवका वैर पडे ॥ जि० ॥ ४ ॥ कीर्तनसमयीं निद्रा येती नाचामध्यें दंग पडे। साधुसंतासीं दृष्टिस पहातां कपाळासि तें पित्त चढे। नाम स्मरणी वाचा बसली विषयी गाणे चित्तीं जडे। नरहरि-[illegible] भजनी महिपती जडला हा मज समज पडे। कडकड कडकड वाजाव टाळी उगाच पहातो तोंडाकडे ॥ जिकडे० ॥ ५ ॥

तात्पर्य संतोपदेशांत व संतवचनांत अशी कांहीं अपूर्व जादू भरली आहे कीं, संतवचन एकदां कानांत फुंकण्याचाच काय तो अवकाश कीं, 'ब्रह्मानंदीं लागली टाळी। कोण देहातें सांभाळी ॥ १ ॥' अशी अवस्था झालीच! त्याच्या अंगीं अपूर्व वैराग्य बाणतें व त्याला सर्वत्र ईश्वराचें व्यापक स्वरूप दिसूं लागतें. असें तेज महीपतीच्या वचनांत भरलेलें आहे; तें वाचकांनीं अजमावून पहावें. एका शितावरून हंडाभर भाताची परीक्षा होते, या न्यायानें वर दिलेल्या दहा पांच उताऱ्यांवरून महीपतीच्या काव्याची वाचकांना परीक्षा करितां येईल.

---

